इंग्रजी शाळांतील खालच्या वर्गांसाठीं

मॅकमिलनचीं

# मराठी वाचन पुस्तकें

## पुस्तक दुसरें

मॅकमिलन आणि कंपनी, लिमिटेड
मुंबई

१९३४

# अनुक्रमणिका


| विषय | | | | पान |
|---|---|---|---|---|
| १ महाराष्ट्रगीत | ... | ... | श्री. कृ. कोल्हटकर | १ |
| २ मातृभाषेचें प्रेम | ... | ... | मधुप | ३ |
| ३ मनाचे श्लोक | ... | ... | रामदास | ८ |
| ४ सुएझचा कालवा | ... | ... | गो. ग. आगरकर | १० |
| ५ माझी ताई | ... | ... | ना. वा. टिळक | १३ |
| ६ समाजसेवक कर्वे | ... | ... | वा. गो. मायदेव | १४ |
| ७ अनाथ बालिकाश्रमांतील आरंभीची खोली | ... | ... | गिरीश | १८ |
| ८ कार्नेलिआचीं रत्नें | ... | ... | रा. प. सवनीस | १९ |
| ९ विदुलासंजयसंवाद | ... | ... | मोरोपंत | २१ |
| १० शंकराचार्य | ... | ... | गो. चि. भाटे | २४ |
| ११ रानांत एकटेंच पडलेलें फूल | | ... | ना. वा. टिळक | २७ |
| १२ ज्वालामुखी पर्वत | ... | ... | ( केसरी निबंध ) | २९ |
| १३ सह्याद्रि | ... | ... | गं. रा. मोगरे | ३१ |
| १४ काबुलीवाला | ... | ... | रा. प. सवनीस | ३३ |
| १५ एकनाथचरित्र | ... | ... | महिपति | ४४ |
| १६ देवजीचा संदेश | ... | ... | श्री. रा. पारसनीस | ४९ |
| १७ गाई घरा आल्या | ... | ... | वा. गो. मायदेव | ५२ |
| १८ स्वर्ड्यांची स्वारी | ... | ... | वा. वा. खरे | ५३ |
| १९ गोकुळ विसरभोळे | ... | ... | रा. ग. गडकरी | ५८ |
| २० कुबडीतीर्थ | ... | ... | माधवानुज | ६२ |
| २१ पेशवाईतील रामलक्ष्मण | | ... | ना. के. बेहेरे | ६४ |

| विषय | | | | पान |
|---|---|---|---|---|
| २२ प्रसन्नता | ... | ... | ग. र. दंडवते | ६९ |
| २३ घड्याळ | ... | ... | केशवसुत | ७४ |
| २४ चपला राक्षसी | ... | ... | ( करमणूक ) | ७५ |
| २५ रामाच्या बाललीला | ... | ... | मोरोपंत | ८२ |
| २६ अशोक | ... | ... | म. वि. काथवटे | ८४ |
| २७ स्फुट अभंग | ... | ... | तुकाराम | ८९ |
| २८ म्हातारपणाचे फायदे | | ... | श्री. कृ. कोल्हटकर | ९१ |
| २९ उत्तरगोग्रहण | ... | ... | मोरोपंत | ९७ |
| ३० ईसाप | ... | ... | ह. ना. आपटे | १०१ |
| ३१ इसापनीति | ... | ... | स. का. छत्रे | १११ |
| ३२ विश्वामित्रींच्या कांठीं | | ... | दत्त | ११५ |
| ३३ जिब्राल्टर | ... | ... | न. चिं. केळकर | ११७ |
| ३४ सुभाषितें | ... | ... | वामनपंडित | १२० |
| ३५ पोलो बंधू | ... | ... | वि. अ. मोडक | १२२ |
| ३६ टॉमस आल्व्हा एडिसन | | ... | गो. रा. परांजपे | १३१ |
| ३७ बाळ व आरसा | ... | ... | ना. के. बेहेरे | १४० |
| ३८ पाउणशें रुपयांचें लोणचें | | ... | रमाबाई रानडे | १४२ |
| ३९ शिवराजदर्शन | ... | ... | विनायक | १४५ |
| ४० शाप नव्हे वर | ... | ... | नी. शं. नवरे | १४७ |
| ४१ केवढें क्रौर्य हें | ... | ... | ना. वा. टिळक | १५० |
| ४२ अतिलोभो न कर्तव्यः | | ... | ( अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी ) | १५२ |

या पुस्तकांत घेतलेले उतारे छापण्यास परवानगी दिल्याबद्दल प्रकाशक पुढील सद्गृहस्थांचे ऋणी आहेत:—

महाराष्ट्रगीत व म्हातारपणाचे फायदे—श्री. श्री. कृ. कोल्हटकर, खामगाव; मातृभाषेचें प्रेम—श्रीमती राधाबाई गोखले, पुणें; सुएझचा कालवा—श्री. य. गो. आगरकर, अकोला; माझी ताई व केवढें क्रौर्य हें—श्री. दे. ना. टिळक, नाशिक; समाजसेवक कर्वे व गाई घरा आल्या—प्रो. वा. गो. मायदेव, पुणें; अनाथ बालिकाश्रमांतील आरंभीची खोली—श्री. शं. के. कानेटकर, फलटण; कार्नेलिआचीं रत्नें- प्रो. रा. प. सबनीस, पुणें; व व्यवस्थापक कर्नाटक प्रिंटिंग प्रेस, मुंबई; देवजीचा संदेश—प्रो. श्री. रा. पारसनीस, सातारा; खड्यांची स्वारी—श्री. य. वा. खरे, मिरज; गोकुळ विसरभोळे—श्री. शं. ग. गडकरी, पुणें; कुबडीतीर्थ—श्री. चिं. का. मोडक, कल्याण; पेशवाईंतील रामलक्ष्मण व बाळ व आरसा—प्रो. ना. के. बेहेरे, नागपूर; प्रसन्नता—व्यवस्थापक, विश्वनाथ गणेश आणि मंडळी; घड्याळ—श्री. प. चिं. दामले, राहुरी; चपलाराक्षसी व ईसाप—व्यवस्थापक, आर्यभूषण छापखाना, पुणें; अशोक—श्री. म. वि. काथवटे, वांई; विश्वामित्रीच्या कांठीं—श्री. वि. द. घाटे, अहमदाबाद; जिब्राल्टर—श्री. न. चिं. केळकर, पुणें; पोलो बंधू—श्री. वि. अ. मोडक, हिंगणें; टॉमस आल्व्हा एडिसन—संपादक, सृष्टिज्ञान, मुंबई; पाऊणशें रुपयांचं लोणचें—श्री. गो. कृ. देवधर, पुणें; शिवराजदर्शन—श्री. एन्. व्ही. करंदीकर, धुळें; शाप नव्हे वर—श्री. नी. शं. नवरे, सोलापूर; अतिलोभो न कर्तव्यः—व्यवस्थापक, चित्रशाळा प्रेस, पुणें.

# महाराष्ट्रगीत

बहु असोत सुंदर संपन्न कीं महा
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा।
गगनभेदिगिरिविण अणु नच जिथें उणें
आकांक्षा पुढतिं जिथें गगन ठेंगणें
अटकेवरि जेथील तुरंगि जल पिणें
तेथ अडे काय जलाशयनदांविणें ?
पौरुषासि अटक गमे जेथ दुःसहा
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा।

प्रासाद कशास जेथ हृदयमंदिरें
सद्भावांचींच भव्य दिव्य आगरें ?
रत्नां वा मौक्तिकांहि मूल्य मुळिं नुरे
रमणीची कूस जिथें नृमणिखनि ठरे.
शुद्ध तिचें शीलहि उजळवि गृहा गृहा
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा।

नग्न खड्ग करिं, उघडें बघुनि मावळे
चतुरंग चमूचेंही शौर्य मावळे.
दौडत चहुंकडुनि जवें स्वार जेथले
भासत शतगुणित जरी असति एकले.
यन्नामा परिसुनि रिपु शमितबल अहा !
प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा।

## २. मातृभाषेचें प्रेम

आज सकाळीं मला शाळेला जायला उशीर झाला, आणि शिवाय मला भीति वाटत होती कीं, आज मास्तर आपली शोभा खूप करतील. कारण, त्यांनीं मला मुद्दाम आदल्या दिवशीं बजावलें होतें कीं, उद्यांला 'भविष्यकाळ' तयार करून ये, आणि मीं तर एक अक्षरसुद्धां तयार केलें नव्हतें! म्हणून थोडा वेळ माझ्या मनांत मोह पडला कीं, आज मुळीं शाळेला गुंगाराच द्यावा आणि तेवढा वेळ बाहेर कोठेंतरी काढून घरीं जावें. ऊन छानदार पडलें असल्यामुळें रानांत जिकडे तिकडे मोठी मौज दिसत होती. पक्षी आनंदानें किलबिल करीत होते. जर्मन शिपाई उत्तम पोषाख करून परेड करीत होते, तींहि पहायला मौज होती. पण मीं तो सर्व मोह निश्चयानें दूर सारला आणि एकदम शाळेची वाट धरली.

मध्यें वाटेंत गांवची चावडी लागली; तिकडे नजर टाकली, तों तेथें एक नवीन जाहिरनामा लागलेला मला दिसला. तो वाचीत कांहीं लोक उभे होते. पण मी तिकडे वळलों नाहीं. अलीकडे दीड दोन वर्षांत असे कैक तरी दुःखकारक जाहिरनामे तेथें लागलेले आम्हीं पाहिले होते. आज काय अमुक लढाईत पराजय झाला, आज काय लढाईवर जायला आणखी लोक पाहिजेत, परवां काय लढाईकरितां अमुक रकम जरूर पाहिजे; असे एक न् दोन! मी तिकडे लक्ष न देतां तडक पुढें चाललों. चावडीशीं एक लोहार कायसेसें करीत उभा होता, तो मोठ्यानें म्हणाला: "अरे बाळा, आज एवढी गर्दी कशाला करतो आहेस शाळेची? केव्हांहि गेलास, तरी आतां एकच आहे!" मला वाटलें कीं, हा माझी चेष्टा करतो आहे; म्हणून मी पुढें झटकलोंच.

मीं असा विचार मनांत केला होता कीं, वर्गाच्या बाहेर खेळायच्या जागेंत पोरांचा रोजच्यासारखा गलगा चालला असेल. त्या गडबडीमध्यें मी हळूच आपल्या वर्गाचें दार उघडून मास्तरांच्या नकळत आंत शिरून

बसेन. पण आज तिथें बिलकुल गलगा ऐकूं येईना. इतकेंच तर काय, जिकडे तिकडे अगदीं शुक होतें. अशा स्थितींत दारांतून मास्तरांच्या देखत वर्गांत जायला मी किती तरी भ्यायलों म्हणतां! पण इलाज नाहीं, असें समजून हिय्या करून आंत शिरलों. पण आज आमचे मास्तर मजकडे फक्त सौम्यपणानें पाहून म्हणाले: “ आलास कां, फ्रान्झ? ठीक केलेंस. आम्ही अगदीं सुरुवात करणारच होतों. झटकन् बैस जा तुझ्या जागेवर. ”

मी गपचीप आपल्या जागेवर जाऊन बसतों, तों काय चमत्कार! आज आमच्या मास्तरांनीं सणासुदीच्या दिवसाचा पोषाख केला आहे —सुंदर हिरवा बनातीचा कोट, काशिद्याचें काम केलेलें शर्ट आणि काळी रेशमी टोपी! हा पोषाख फक्त विशेष प्रसंगीं, परीक्षेला डिपुटी यायचे असले म्हणजे किंवा बक्षिससमारंभाच्या समयीं, ते घालीत असत. मग आज काय कारण होतें कोण जाणे! मी असा विचार करीत इकडे तिकडे पहातों, तों आणखी एक चमत्कार! आमच्या शाळेंत पूर्वी शिकलेले असे गांवांतील बहुतेक म्हातारे प्रतिष्ठित लोक आम्हां मुलांच्या मध्यें आज येऊन बसले आहेत आणि तेहि अगदीं गपचीप! मला कांहींच उमज पडेना.

इतक्यांत आमचे मास्तर खुर्चीवर जाऊन बसले आणि अत्यंत गंभीर स्वरानें बोलूं लागले: “ मुलांनो, तुम्हांला शिकवायचा आज माझा अगदीं अखेरचा दिवस आहे. बर्लिनहून जर्मनसरकारनें असा हुकूम पाठवला आहे कीं, या आल्सेस प्रांतांतल्या शाळांमध्यें आजपासून जर्मन भाषेशिवाय दुसरी भाषा कोणचीच शिकवायची नाहीं. तेव्हां तुमची मातृभाषा शिकण्याची आज इतिश्री झाली आहे. जर्मन शिकवणारा मास्तर उद्यांपासून सुरुवात करायला येईल. तेव्हां फ्रेंच भाषेचा आज तुमचा शेवटचा धडा आहे. आजच्या प्रसंगीं तरी नीट लक्ष द्या, एवढीच आतां विनंति आहे. ”

एकदम माझ्या डोक्यांत लखकन् प्रकाश पडला. आमच्या मास्तरांनीं आज मोठा पोषाख कां केला, आणि आज ही म्हातारी मंडळी शाळेला पुनः कां आली, तें मी आतां पुरतें समजलों. काय? आमच्या फ्रेंच भाषेच्या अभ्यासाची इतिश्री! भलतेंच कांहीं तरी! मला तर अजून चार ओळी देखील नीटपणें लिहितां येत नव्हत्या. अरेरे, आजपर्यंत टंगळमंगळ करून शिकण्याकडे दुर्लक्ष केलें, त्याचें मला आतां कितीतरी वाईट वाटूं लागलें एकदम. जीं बुकें आजपर्यंत मला डोळ्यांसमोर नको असत, तींच आज मला दूर निघून जायला तयार झालेल्या प्रिय मित्राप्रमाणें अत्यंत प्रिय वाटूं लागलीं!

मास्तरांनीं माझें नांव घेतलेलें माझ्या कानीं पडलें. आज जर भविष्यकाळाचे सर्व नियम मला बिनचूक सांगतां आले असते तर मीं काय पाहिजे तें खुषीनें दिलें असतें. पण आतां काय उपयोग? मी खालीं मान घालून नुसता उभा राहिलों. मला अतिशय वाईट वाटत होतें; पण वर मानसुद्धां करणें मला अशक्य झालें. मी नेहमींप्रमाणें कोरडा ठणठणीत आहें, असें पाहून मास्तर रागावले नाहींत. उलट ते आज मृदु स्वरानें मला म्हणाले: "अरे मुला, आज मी तुला बिलकुल रागें भरत नाहीं. देवानेंच तुम्हांआम्हांला आज रगड शिक्षा दिली आहे. आजपर्यंत रोज तूं म्हणत आला आहेस कीं इतकी घाई काय आहे, उद्यां शिकतां येईल मला. अन् आज आतां काय परिणाम झाला आहे, तो पहा. या आल्सेसमध्यें आपल्या सर्वांची मोठी चूक जी झाली ती हीच कीं, आजच कशाला उद्यां शिकतां येईल असें आपण सारे म्हणत आलों आणि आतां जर्मन सरकार आम्हांला म्हणणार कीं, जर तुम्हांला आपली मातृभाषा लिहितांवाचतां येत नाहीं, तर तुम्ही आपणांला फ्रेंच लोक कसे म्हणवतारे?"

येथें आमच्या मास्तरांना मातृभाषेच्या प्रेमाचा उमाळा आला. ते म्हणाले: "अहाहा! आमच्या फ्रेंच भाषेसारखी सुंदर, तिच्याप्रमाणें जोरदार, अन् इतक्या विपुल शब्दांनीं भरलेली अशी दुसरी भाषा त्रिभुवनांत

देखील सांपडायची नाहीं. असल्या या आपल्या मातृभाषेची आपणांशीं कायमची तुटातूट होण्याचें संकट आपणांवर गुदरत आहे. तर आतां आपण एकमेकांना ती भाषा शिकवून आणि एकमेकांशीं त्या भाषेंत बोलून तिची ओळख कायम ठेवली पाहिजे, आणि तिची जागृति ठेवली पाहिजे. कारण, राष्ट्राला कोणचीहि जरी आपत्ति प्राप्त झाली, अथवा पारतंत्र्याची कोणतीहि पायरी जरी राष्ट्रानें गांठली असली तरी जोंपर्यंत राष्ट्रानें आपली मातृभाषा कायम राखली असेल तोंपर्यंत त्या राष्ट्राचें कल्याण त्याच्या स्वाधीन आहे, असें खास समजावें."

नंतर मास्तरांनीं व्याकरण उघडून आमचा धडा आम्हांला समजावून देण्यास सुरुवात केली. आज मला त्यांचा प्रत्येक शब्द अगदीं सहज समजूं लागला, हें किती तरी आश्चर्य ! आजच्याइतकें मींहि कधीं धड्याकडे लक्ष दिलें नव्हतें, आणि आजच्याइतकी फोड करून मास्तरांनींहि जणूं काय कधीं सांगितली नव्हती. आज असा कांहीं त्यांनीं निश्चय केलासा दिसला कीं, त्यांच्या डोक्यांतलें ज्ञान सगळें आमच्या डोक्यांत एकदम खच्चून भरून सोडायचें !

नंतर लेखनविषयाकडे ते वळले. आज आमच्याकडून लिहून घ्यायला त्यांनीं अगदीं नवीनच शब्द सांगितले; ते "फ्रान्स आल्सेस, फ्रान्स आल्सेस" हे होत. प्रत्येक विद्यार्थी मनापासून ते शब्द लिहूं लागला; कागदांवर कुरुकुरु पेनें चाललीं होतीं, त्यांच्या आवाजाशिवाय दुसरें कांहींहि ऐकूं येईनासें झालें होतें. एक फुलपांखरूं वर्गामध्यें घिरट्या घालूं लागलें; पण आज कोणी देखील त्याच्याकडे पाहीना. छपरावर पारवे घुमत होते, तें ऐकून मीं मनांत म्हटलें: "त्या बिचाऱ्या प्राण्यांनींहि उद्यांपासून जर्मन भाषेंत घुमावें असा हुकूम येईल काय ?'

आम्ही अक्षर लिहीत असतांना आमचे मास्तर स्वस्थपणें आपल्या खुर्चीवर बसून राहिले होते. आज कांहीं नाहीं तरी चाळीस वर्षें ते आमच्या गांवांत मास्तर होते, आणि उद्यां ते नोकरी सोडून येथून

कायमचे निघून जाणार होते, व दुसऱ्या मजल्यावर त्यांची रहाण्याची जागा होती तेथें त्यांच्या सामानसुमानाच्या पेट्या त्यांची बहीण बांधीत होती, तें आम्हांला ऐकूं येत होतें. इतकी त्यांची तयारी झाली होती तरी अत्यंत धिमेपणानें ते आपला वर्ग आज शिकवीतच होते. इतक्यांत घड्याळामध्यें बारांचे ठोके झणाणले, व त्याच वेळीं आमच्या शाळेच्या खिडक्यांखालीं जर्मन शिपाई परेड करीत आले होते, त्यांचीं बिगुलें वाजलेलीं आमच्या कानांवर आदळलीं !

आमचे मास्तर एकदम उठून उभे राहिले. त्यांची चर्या अत्यंत म्लान झाली होती, तरी त्यांची ऐट कायम होती. खोल स्वरानें ते म्हणाले: "गडे हो, मित्रांनो ..मी आतां..." पण त्यांच्यानें वाक्य पुरें करवेना ! नंतर ते फळ्याकडे वळले, आणि खडूचा तुकडा हातीं घेऊन त्यांनीं सर्व फळाभर मोठ्या अक्षरांनीं पुढील वाक्य लिहिलें: "VIVE LA FRANCE—फ्रान्स देश चिरायु होवो !"

लिहून होतांच ते थांबले. क्षणभर त्यांनीं भिंतीला टेंकून आम्हांकडे पाहिलें. त्यांचा कंठ दाटून आला होता. त्यांच्या तोंडांतून शब्द निघेना. त्यांनीं फक्त आपले हात हालवीत 'संपलें, आतां जा' अशा अर्थाचा आम्हां सर्वांला निरोप दिला.

## ३. मनाचे श्लोक

मना सज्जना भक्तिपंथेंचि जावें ।
तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें सर्व सोडूनि द्यावें ।
जनीं वंद्य तें सर्व भावें करावें ॥ १ ॥

मना वासना दुष्ट कामा नये रे ।
मना सर्वथा पापबुद्धी नको रे ॥
मना सर्वथा नीति सोडूं नको हो ।
मना अंतरीं सार वीचार राहो ॥ २ ॥

मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें ।
मना बोलणें नित्य सोशीत जावें ॥
स्वयें सर्वदा नम्र वाचे वदावें ।
मना सर्व लोकांसि रे नीववावें ॥ ३ ॥

तनू त्यागितां कीर्ति मागें उरावी ।
मना सज्जना हेचि क्रीया धरावी ॥
मना चंदनाचे परी त्वां झिजावें ।
परी अंतरीं सज्जनां नीववावें ॥ ४ ॥

जनीं सर्वसूखी असा कोण आहे ।
विचारें मना तूंचि शोधूनि पाहें ॥
मना त्वांचि रे पूर्व संचित केलें ।
तयासारिखें भोगणें प्राप्त झालें ॥ ५ ॥

मना मानसीं व्यर्थ चिंता वहाते ।
अकस्मात होणार होवोनि जातें ॥
घडे भोगणें सर्वही कर्मयोगें ।
मतीमंद तो खेद मानी वियोगें ॥ ६ ॥

मना सर्वथा सत्य सोडूं नकोरे ।
मना सर्वथा मिथ्य मांडूं नको रे ॥
मना सत्य तें सत्य वाचे वदावें ।
मना मिथ्य तें मिथ्य सोडूनि द्यावें ॥ ७

दिनाचा दयाळू मनाचा मवाळू ।
स्नेहाळू कृपाळू जगीं दासपाळू ॥
तया अंतरीं क्रोध संताप कैंचा ।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ ८

विवेकें क्रिया आपुली पालटावी ।
अती आदरें शुद्धक्रीया धरावी ॥
जगीं बोलण्यासारखें चाल बापा ।
मना कल्पना सोडि संसारतापा ॥ ९ ॥

फुकाचें मुखीं बोलतां काय वेंचे ।
दिसंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे ॥
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ।
विचारें तुझा तूंचि शोधूनि पाहें ॥ १०

## ४. सुएझचा कालवा

ज्या प्रसिद्ध फ्रेंच एन्जिनिअरनें सुएझच्या कालव्याची कल्पना अंमलांत आणून दाखविली त्याचें नांव एम्. डी. लेसेप्स्. जोंपर्यंत भूमध्य-समुद्र आणि तांबडा समुद्र यांस जोडणारा सुएझचा कालवा चालू राहील तोंपर्यंत याचें नांव ज्याच्या त्याच्या तोंडून निघत राहील. ज्याप्रमाणें हिंदुस्तानांत राज्य स्थापित करण्याची कल्पना इंग्लिश लोकांस सुचवून देण्यास ड्युप्ले नांवाचा फ्रेंचमन मार्गे कारण झाला, त्याप्रमाणें आतां त्यांचा अंमल पक्का बसवून देण्यासही फ्रेंचमनच कारण झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण आजमितीस या प्रचंड कालव्यापासून इंग्लिश लोकांस जितका फायदा होत आहे तितका दुसऱ्या कोणत्याहि राष्ट्रास होत नसेल.

एका प्रसंगीं इजिप्त देशाच्या नकाशाकडे काळजीनें पहात असतां लेसेप्स यास असें वाटलें कीं, भूमध्यसमुद्र व तांबडा समुद्र यांचे दरम्यान असलेली संयोगीभूमि नाहींशी करून तिच्या जागीं सामुद्रधुनी करून टाकली तर यूरोप व आशिया या दोन खंडांतील व्यापार व प्रवास किती सुलभ व सुखावह होणार आहे! एकदा कल्पना मात्र आली, मग काय पुसतां? त्या दिवसापासून लेसेप्सला झोंप नाहींशी झाली. अहोरात्र डोळ्यांपुढें दोन्ही समुद्र आणि त्यांस जोडणारी संयोगीभूमि. संयोगी-भूमीचा कालवा करण्याची कल्पना केवळ अशक्य नाहीं अशी लेसेप्सची खात्री होतांच तो लागलीच सुएझच्या संयोगीभूमीवर येऊन दाखल झाला व तिची मोजणी करूं लागला. ही संपविण्यास त्याला पक्कीं चार वर्षें लागलीं. हीं चार वर्षें त्यानें या वालुकामय ऊष्ण प्रदेशांत किती कष्टानें काढलीं असतील तें त्याचें त्यालाच ठाऊक. संयोगीभूमीची मोजणी होऊन कालव्याची रेघ मारल्यानंतर अशा शंका निघाल्या कीं, कदाचित् भूमध्यसमुद्र तांबड्या समुद्रापेक्षां अधिक उंचीवर असेल; तसें असल्यास कालवा वाहून जाईल. तसेंच, दुसरे कोणी असा आक्षेप घेऊं लागले

कीं, संयोगीभूमीची जमीन बळकट नसल्यास दलदल होईल, आसपासच्या प्रदेशांतील वाळू आंत भरून तो कालवा जागोजाग भरून येईल, किंवा त्याच्या बाजू ढांसळतील. परंतु लेसेप्सनें आपली व आपल्या मित्रांची खात्री करून घेतली कीं, वरील अडचणींपैकीं पहिली अडचण मुळींच येत नाहीं, कारण दोन्ही समुद्रांची उंची सारखी आहे, व बाकीच्या अडचणी सहज दूर करण्यासारख्या आहेत.

इतकी तयारी झाल्यावर पुढें भांडवलाची व मजूरांची काय सोय करावी ही काळजी पडली. लेसेप्स यानें फ्रेंच लोकांपुढें हें प्रकरण आणिलें तेव्हां त्यांनीं तें मोठ्या वीरश्रीनें हातीं धरून पार पाडण्यासाठीं बराच पैसा व माणसें उभीं केलीं. पण हें प्रचंड कृत्य फ्रान्स देश कितीहि दिलदार व साहसी झाला तरी त्याच्या एकट्याच्यानें होण्यासारखें नव्हतें. त्यामुळें लेसेप्सला दुसऱ्या देशांची पायधरणी करावी लागली. प्रथम त्यानें इजिप्तच्या खेदिवास या कामीं मदत करण्याविषयीं विनंति केली व सुदैवानें सय्यद महंमदास लेसेप्सच्या परिश्रमांचें आणि शोधकपणाचें कौतुक वाटून त्यानें कालवा खणण्याविषयीं ताबडतोब परवानगी दिली. एवढेंच नव्हे तर तीस हजार मजूर देण्याचेंही अभिवचन दिलें. येवढें झाल्यावर फक्त पुरेसें भांडवल उभें करण्याची काळजी राहिली. फ्रेंच लोकांनीं बरेंच भांडवल थोड्या दिवसांत गोळा केलें; पण आणखीहि बरेंच पाहिजे होतें. जर्मनी तर बोलून चालून कंगाल ! टर्की कर्जबाजारी ! स्पेन व इटली गतवैभव ! बाकी सारी चिलीपिली मंडळी ! राहतां राहिला एक इंग्लंड देश. त्यांत मात्र असले दहा कालवे बांधावयाचे झाले तरी त्यांना पुरेसें भांडवल पैदा होण्याची पंचाईत नव्हती ! पण ते लोक पक्के मारवाडी ! भांडवल दिलें आणि फायदा झाला नाहीं तर मग लेसेप्सचें काय घ्यावयाचें ? अशा शंका त्या देशांत निघूं लागल्या. आपणहून लेसेप्स इंग्लंडला गेला आणि पांचचार महिन्यांच्या आंत त्यानें तेथील मोठमोठ्या व्यापाऱ्यांची व शास्त्रज्ञांची हा कालवा फायदेशीर झालाच पाहिजे अशी खात्री करून

दिली. ती केल्यावर मग भांडवलाला काय तोटा! थोड्या दिवसांत तें हवें होतें त्याहून अधिक मिळेल असें दिसूं लागलें.

याप्रमाणें सर्व अडचणी दूर झाल्यावर लेसेप्स यानें एका दिवसाचा सुद्धां विलंब न लावतां १८५९ च्या आगष्ट महिन्याच्या २५ व्या तारखेस या कामास प्रारंभ केला. कालव्याची एकंदर लांबी ८८ मैल असून त्यापैकीं ६६ मैल खोदीव काम होतें. १४ मैल सरोवरांतील गाळ व भर काढून तीं हवीं तितकीं खोल व रुंद करावयाचीं होतीं आणि ८ मैल मात्र जसेच्या तसे ठेवावयाचे होते. पाण्याच्या पृष्ठभागाखालीं कमींत कमी २६ फूट खोली व तळाशीं कमींत कमी ७२ फूट रुंदी ठेविली आहे. कांहीं काम झाल्यावर खेदिवसाहेबांची लहर फिरल्यामुळें त्यांनीं एकाएकीं आपले तीस हजार मजूर काढून नेले. या पोरकटपणाचा लेसेप्स याला फार संताप आला. पण बिचारा करतो काय? त्यानें असा बेत केला कीं, सढळ मजूरी देऊन जितके मजूर मिळतील तितके तर लावावयाचेच; पण तसें करूनहि जितके कमी पडतील तितक्यांच्या जागीं यंत्रांची योजना करावयाची. ही युक्ति सुचल्याबरोबर यंत्रें ओतण्यास काय उशीर? १५ पासून ७५ घोड्यांच्या सामर्थ्याचीं (हॉर्सपॉवरचीं) अनेक एंजिनें तयार करविलीं व त्यांकडून जमीन, वाळू व दगड खोदण्याचें, खोदलेली माती, वाळू व दगड वर उचलण्याचें, व वर उचलून आणलेली माती व वाळू किना-यावर वाहून नेण्याचें काम तो झपाट्यानें करवूं लागला. या कालव्याचें काम दहा वर्षेपर्यंत चाललें; आणि इ. स. १८६९ सालाच्या नोव्हेंबर महिन्याच्या सतराव्या तारखेस व्यापाराचीं आणि प्रवाशांचीं गलबतें व आगबोटी कालव्यांत वावरूं लागल्या. या कालव्यास एकंदर सतरा कोटी व पन्नास लक्ष रुपये खर्च लागला.

## ५. माझी ताई

ताइ, तूं फूल गडे माझें, ताइ तूं नक्षत्रही माझें !
ताइ, तूं रत्न गडे माझे,
ताइ, तूं पांखरूं गे माझे,
या सर्वांहुन गोड गोड गे शील रूप तुझें
यांची उपमा नच साजे !

फुल हें हंसतें, तूं हंसशी,
परी तव अर्थ किती हास्यीं !
काय फुलांच्या मला पाकळया दावितील मौजे
जसे हे ओठ गडे तूझे ?

तं तर तेजस्वी करिशी
येईल जवळ तुझ्या त्याशीं;
नक्षत्रांचा गण चमके हा उसन्या तेजें
निराळें वैभव तव तें जें !

रत्नें चम चम चम करिती
परी तीं कठिण किती असती;
सांठविलेलें तेज किती तें वाढत नाहीं जें
वाढतें तेज गडे तूझें !

गाई पांखरुं गानाला
एकविध अर्थ नसे त्याला;
गान तुझें परिसुनी स्वर्गिंचे दूत गानपटु जे
नाचती सुखें, ताइ माझे !

# ६. समाजसेवक कर्वे

प्रोफेसर धोंडोपंत कर्वे यांचें नांव माहीत नाहीं असा सुशिक्षित महाराष्ट्रांत बहुतकरून सांपडणार नाहीं. याचा अर्थ हा कीं, प्रो. कर्वे यांची कामगिरी महाराष्ट्रांतल्या प्रत्येक सुशिक्षिताचे कानीं पडली असून, त्या कामगिरीचें महत्त्वहि त्यास अल्पस्वल्प प्रमाणांत मान्य झालें आहे. पुष्कळ वेळां थोर व्यक्तींनीं संपादिलेलें यश सर्वांच्या ध्यानांत येतें, परंतु तें यश संपादण्यासाठीं त्या व्यक्तीनें कोणती तयारी केलेली असते याची जाणीव सर्वांसच असते असें नाहीं. सर्वसाधारण समाज त्या व्यक्तीनें घडवून आणलेल्या यशावर संतुष्ट असतो. मागें जाऊन त्या यशाची गुरुकिल्ली कशांत आहे हें पाहण्याची आवश्यकता त्यास वाटत नाहीं.

या दृष्टीनें पाहूं गेल्यास प्रो. कर्व्यांची कीर्ति ऐकलेल्या जनतेस त्यांच्या जाज्वल्य तपस्येची व लोकोत्तर संयमनाची जाणीव नसल्यास दोष देण्याचें कारण नाहीं. मात्र याची योग्य जाणीव झाल्यास तो समाज अशा समाजसेवकांचा ऋणी राहील व इतर होतकरू समाजसेवकांचा गौरव करून त्यांस उत्साहानें कार्य करण्यास उद्युक्त करील. या हेतूनें प्रो. कर्वे यांच्या अंगच्या गुणांची मी चर्चा करणार आहे व आदर्शभूत समाजसेवकास जरूर असणाऱ्या गोष्टी त्यांच्यांत उत्कटत्वानें कशा वसत आहेत हें दाखविणार आहे.

ज्या जनतेनें या महात्म्यास एक वेळ अतिशूद्राप्रमाणें मानलें तीच जनता आज त्यास एकाद्या विभूतीप्रमाणें वंद्य समजत आहे. त्यानें अवलंबिलेल्या पुनर्विवाहाची हेटाळणी जनतेनें एके काळीं केली; पण तोच उपाय न्यायाच्या दृष्टीनें बालविधवांचे बाबतींत आवश्यक आहे असें तीच जनता आज म्हणत आहे. जे ज्ञानकिरण पुरुषांस पोषक झाले, ते स्त्रियांनाहि होतील हें सामान्य तत्त्व ज्या जनतेला एके काळीं पटत नव्हतें तीच जनता जरूर पडल्यास शिक्षणाचें तत्त्व पुरुषापेक्षां स्त्रियांचे बाबतींत आधीं लागू

करा असें म्हणावयास तयार झाली आहे. हा परिणाम कशाचा? या फरकांत बदललेल्या काळाचा व परिस्थितीचा शेष मुळींच नाहीं असें नाहीं. परंतु हें मतपरिवर्तन घडवून आणण्यांत ज्यांनीं आपल्या सुखाकडे पाहिलें नाहीं, संसारांतील संकटांची पर्वा केली नाहीं, कार्यावरील निंदेस जुमानलें नाहीं व सारखी स्त्री-उद्धाराची घोषणा व आचाराची चालना चालूं ठेवली त्या महात्म्याला आपण धन्यवाद जरूर दिले पाहिजेत.

स्त्री, तिचें शिक्षण, तिचे हक्क व तिचा दर्जा या बाबतींत ज्यांनीं एवढी क्रांति घडवून आणवली त्या प्रो. कर्वे या विभूतींत एवढे गुण तरी कोणते आहेत कीं, ज्यांचें स्मरण सर्वांना उद्बोधक होऊन भावी समाजसेवकांस तर विशेष रीतीनें मार्गदर्शक होईल, हें आपण पाहूं.

असामान्य व्यक्तींत त्या व्यक्तींतच असूं शकतील असे कांहीं अति उच्च गुण असावयाचेच. हे गुण, केवळ प्रयत्नानें सर्वांस साध्य होतील असें नाहीं. प्रो. कर्वे यांचे ठिकाणीं असे कांहीं गुण आहेत. त्यांचा निदान उच्चार करावा हें उचित, ते गुण म्हणजे द्रव्यसंन्यास, विहार-नियमितता व चुका कबूल करण्याचें मनोधैर्य हे होत. हे गुण अतिशय उच्च मनोभूमिकेच्या माणसांतच आढळून येणें शक्य आहे. ह्या गुणांनीं त्यांच्या कार्यास तेज चढलें आहे. परंतु हे गुण सामान्य माणसांचे दृष्टीनें यत्नसाध्य नसल्यानें त्यांचा नुसता उल्लेख करून होतकरू समाज-सेवकांचे दृष्टीनें उपयोगी पडणाऱ्या व इष्ट असणाऱ्या गुणांकडे वळणें बरें!

आपल्याकडील कार्यकर्ती माणसें आपणांतून अकालीं नाहींशीं होण्याचें मुख्य कारण माझ्या मतें तरी त्यांचेमध्यें आढळून येणारी अनियमितता हें होय. शरीर हें यंत्र आहे; तें गंजूं न देतां त्यास जरूर तेवढी विश्रांति देऊन तें घांसून पुसून स्वच्छ ठेवलें व त्यास लागणाऱ्या पोषक द्रव्यांचा त्यास पुरवठा केला म्हणजे तें सहसा न बिघडतां पुष्कळ वेळपर्यंत आपल्या उपयोगीं पडूं शकतें. या सामान्य गोष्टीबद्दल पुष्कळांची

खात्री झालेली नसते. कांहींची खात्री झालेली असते, परंतु खात्रीप्रमाणें वागण्याचें लहानपणापासून वळण नसल्यामुळें पटलेल्या गोष्टीप्रमाणें वागणें त्यांस साधत नाहीं. व शेवटीं खाण्यांत, झोंपेच्या बाबतींत व मुख्यतः व्यायामाचे बाबतींत दुर्लक्ष होऊन त्यांची प्रकृति ढासळते व त्यांचेवर काळाची अकालीं झडप पडते.

प्रो. कर्वे यांस आतां ७३ वें वर्ष चालू आहे. उठल्याबरोबर तीन चार मैल चालून आल्याशिवाय रहावयाचें नाहीं हा त्यांचा निश्चय. युरोपच्या प्रवासांत बोट फार हालत असतां त्यांस डेकवर फिरतां आलें नाहीं, त्या वेळेस केबिनची लांबी रुंदी मोजून त्यांनीं खोलींत फेऱ्या घातल्या व आपला चार मैल चालण्याचा रोजचा व्यायाम पुरा केला. हिंगण्यास पाऊस धूम पडत असला व बाहेर जाणें शक्य नसलें तर प्रो. कर्वे व्हरांड्याची लांबी लक्षांत घेऊन ४ मैल फिरणें पदरांत पाडून घेतात. सकाळीं व संध्याकाळीं फिरण्याचा हा नियम एखाद्या कट्ट्या कर्मठाप्रमाणें त्यांनीं पाळल्यामुळें त्यांस एवढें काम करतां आलें आहे.

प्रो. कर्वे यांस कळून चुकलें आहे कीं, चांगल्या कार्याबद्दल लोकांना सहानुभूति वाटते, व लोक मदतही करावयास तयार असतात. पण पुष्कळ वेळां समाजसेवक ही सहानुभूति आपल्या कार्यदक्षतेनें टिकवीत नाहींत व त्यामुळें ह्या सहानुभूतीचा झरा आटतो. लोकांनीं दिलेल्या पैशाला आपण वास्तविक प्राणापेक्षां जास्त जपलें पाहिजे. त्याची गफलत होऊं देतां कामाची नाहीं, त्याची योग्य नोंद असावी, दात्यास ती कळावी, त्या पैशाचा योग्यच कारणाकडे उपयोग व्हावा ह्याविषयीं प्रो. कर्वे यांचा अतिशय रोख असतो. यासाठीं खर्चाच्या काटकसरीकडे ते अवश्य जपत असतात.

ते इतके म्हातारे झाले आहेत तेव्हां प्रचाराचे वेळीं त्यांनीं दुसऱ्या वर्गानें प्रवास केला तर त्यांना कोण दोष देणार आहे कां ? पण नाहीं, दिवसां विश्रांतीची जरूर नसते, तेव्हां ते तिसऱ्या वर्गानेंच प्रवास

करतात व विद्यापीठाचे पैसे वांचवितात. जादा खर्च करणें त्यांस बिलकुल आवडत नाहीं. जे खर्च कायमचे करण्याची शक्ति संस्थेला नसेल ते तिनें आपल्या शिरावर घेऊं नयेत, असें ते आग्रहानें सांगत असतात.

पैसा आणणें व तो योग्य कामींच खर्च करणें ही एक प्रकारची सचोटी आहे. ही समाजसेवकास अत्यंत अवश्य आहे. त्यासाठीं समाजसेवकास साधी राहणी अतिशय जरूर आहे असें ते सांगत असतात. "आधीं केलें मग सांगितलें" याचें उत्तम उदाहरण त्यांच्या स्वतःच्या साध्या राहणींत आहे. उत्पन्न वाढण्याची खात्री नसतांना आपल्या स्वतःच्या केवळ गरजा फाजील वाढवून त्या गरजा भागविण्यासाठीं जन्मभर आटापीट करणें शहाणपणाचें नाहीं हें कोणीहि समंजस मनुष्य कबूल करील. आपल्यास व आपल्या कुटुंबांतील मंडळीस जी मीठमिरची व कपडा आनंदानें पुरवतां येईल त्या तोलाची राहणी प्रत्येक समाजसेवकानें आपले स्वतःसाठीं ठेवली पाहिजे; व हे विचार त्यांच्या राहणीवरून स्पष्ट ध्यानांत येतात.

कोणत्याही यत्नांत हमखास यश येईलच असें कोणीं धरून चालूं नये. यश येवो अगर न येवो त्या कार्यासाठीं प्रयत्नाची शिकस्त करीत राहणें येथेंच आपलें कर्तव्य संपतें. पुष्कळ समाजसेवक आपल्या कार्यांत विजय व त्याचें यश हीं आपणांस लौकर मिळालीं नाहींत हें पाहून उतावळे व हताश झालेले दृष्टीस पडतात. परंतु शतकेंच्या शतकें उराशीं बाळगलेले विचार सोडण्यास समाज एकदम केव्हांहीं तयार होणें शक्य नाहीं; यासाठीं समाजसेवकानें धिमेपणानें पाऊल टाकणें अवश्य आहे व धीर न सोडतां हातीं घेतलेलें काम चिकाटीनें पार पाडण्यांत त्याच्या हातून खरी समाजसेवा होणार आहे.

## ७. अनाथ बालिकाश्रमांतील आरंभीची खोली

मन किती बघुनि तुज कौतुकतें
अभिमानें हृद्या ये भरतें ॥ ध्रु० ॥

तरंगिणीची बघुनि भव्यता
जळविस्तारीं मधुर दिव्यता
अवलोकाया उगमरम्यता
दृष्टि झणीं मागें फिरते  १

किती पसरलीं किरणें शीतल
वृक्षलतांना करुनी निर्मळ
जींतुन परि तीं आलीं कोमल
तीस पहाया मन वळतें  २

भक्तिरसाची जणुं अधिराणी
दूर पसरली अभंगवाणी
जींतुन, वीणा ती निजनयनीं
पहावया मन उत्सुकतें  ३

कार्यभव्यता तुज भंवतीची
पाहुन उठती हृदयीं वींची
सहानुभूती सादर मनिंची
पहावया तुज आतुरते  ४

## ८. कॉर्नेलिआचीं रत्नें

दोन हजारापेक्षां जास्त वर्षें होऊन गेलीं. रोम शहरांतील एका सुंदर बागेंत द्राक्षाच्या वेलींनीं आच्छादित अशा एका मंडपांत दोन मुलें उभीं होतीं. त्यांची आई व तिची एक मैत्रीण अशा दोघी फुलझाडांतून व झाडांच्या सावलींतून हिंडत होत्या; त्यांच्याकडे तीं पहात होतीं.

त्या दोघांपैकीं लहान होता तो मुलगा म्हणाला, " आपल्या आईची मैत्रीण किती सुंदर आहे, नाहीं ? तिचा पोषाख राणीला साजेसा आहे."

त्याचा वडील भाऊ म्हणाला, " पण ती आपल्या आई इतकी सुंदर नाहीं. तिचा पोषाख झोंकबाज आहे खरा, पण तिच्या मुद्रेवर औदार्य व वात्सल्य प्रतिबिंबित झालेलीं नाहींत. आपली आईच राणी शोभते."

पहिला म्हणाला, " तूं म्हणतोस तें खरें आहे. सबंध रोममध्यें आपल्या आईसारखी दुसरी स्त्री नाहीं."

लौकरच कॉर्नेलिआ ( हेंच त्यांच्या आईचें नांव ) आपल्या मुलांशीं बोलण्याकरितां त्या ठिकाणीं आली. तिनें एक पांढरा शुभ्र झगा परिधान केला होता. तिचे हात व पाय उघडेच होते; तिच्या गळ्यांत सोन्याच्या माळा चकाकत नव्हत्या; तिच्या बोटावर तेजस्वी रत्नें लखलख करीत नव्हतीं. पिंगट रंगाच्या मऊ केशकलापाशिवाय दुसरें कोणतेंहि भूषण तिच्या डोक्यावर नव्हतें.

मुलांच्या प्रेमपूर्ण डोळ्यांकडे तिनें जेव्हां पाहिलें, तेव्हां वात्सल्यदर्शक स्मितानें तिची मुद्रा प्रकाशमान झाली. ती म्हणाली, " मुलांनो, मला तुम्हांला एक गोष्ट सांगावयाची आहे."

दोन्ही मुलांनीं तिला वंदन करून विचारलें, " काय आई ? "

" आज आपण या बागेंत येथें जेवावयास बसूं. जेवण झाल्यावर माझी मैत्रीण आपल्या त्या विलक्षण करंडकांत भरलेलीं रत्नें आपल्याला दाखवील."

त्या मुलांनीं आपल्या आईच्या मैत्रिणीकडे आश्चर्यचकित मुद्रेनें पाहिलें. तिच्या बोटांत आंगठ्या होत्या; त्यांशिवाय आणखी इतर आंगठ्या तिच्याजवळ असतील काय? तिच्या गळ्यांत रत्नमाला चमकत होत्या; त्याशिवाय आणखी रत्नें तिच्याजवळ होतीं काय?

त्या दिवसाचें साधें वनभोजन संपल्यानंतर एका चाकरानें घरांतून तो मौल्यवान करंडक आणिला. त्या बाईनें तो उघडला मात्र, त्या मुलांचे डोळे रत्नांच्या प्रभेनें दिपूनच गेले. दुधासारख्या शुभ्र व रेशमासारख्या मऊ अशा मोत्यांच्या माळा, निखाऱ्यासारख्या लालभडक माणिकांच्या राशी, गवतासारखे हिरवेगार पाचेचे मणि, आकाशासारखे निळे नीळमणि, सूर्यकिरणाप्रमाणें लकाकणारे हिरे त्यांत होते.

किती वेळ तरी तीं मुलें त्या भास्वर रत्नांकडे पहात बसलीं. धाकटा मुलगा हळूंच म्हणाला, “आपल्या आईजवळ जर अशीं रत्नें असती, तर किती छान झालें असतें!”

शेवटीं हें पाहणीचें काम संपलें व करंडक झांकून त्या बाईनें तो घरांत पाठवून दिला.

हलक्या आवाजांत ती बाई म्हणाली, “काय ग, कार्नेलिआ, तुझ्याजवळ रत्नें नाहीं म्हणतात तें खरें काय? तुझ्याजवळ कांहीं तरी रत्नें असलींच पाहिजेत.”

कार्नेलिआनें उत्तर केलें, “आहेत तर, हीं पहा माझीं रत्नें.” असें म्हणून तिनें आपल्या दोन्ही मुलांना जवळ ओढिलें. “जगांतील सर्व रत्नें मी यांच्यावरून ओंवाळून टाकीन.”

# ९. विदुलासंजयसंवाद

स्वरथीं चढोनि भगवान् मग जाय पुसावयासि आतेला ।
तेंचि वदूं, कोण रसिक गोघृत सोडुनि करील आतेला ? ॥ १ ॥
मागे सुयोधनाचें मत संक्षेपें यदूद्वह सतीतें ।
धर्मासि निरोप पुसे सुतमार्दव आठवूनि हसतीतें ॥ २ ॥
कुंती म्हणे, ' वद असें त्या मत्तनयासि कमळनयना ! की ।
परिसोत पूर्वज तुझा प्रेमें सुरगीत अमळनय नाकीं ॥ ३ ॥
वाटे सुभटें पुत्रें मेळविला विप्रसेवनीं नव ट ।
वर्षोष्णसह जटिलवर, तरि काय बहू तसे वनीं न वट ? ॥ ४ ॥
जें सिंधुराजविजितस्वसुतातें बोलिली सती विदुला ।
तें परिस सांगत्यें तुज यदुकुळकमळाकराचिया विधुला ॥ ५ ॥
विदुला म्हणे, " अहा ! रे ! क्लीबा ! मंदा ! कसा पळालास ? ।
कां वांचलासि, अयशस्कर ऐसा तूं न कां गळालास ? ॥ ६ ॥
अरि हरिल राज्य, मग तूं वरशिल वृत्त्यर्थ काय माधुकरी ? ।
सुखकर सुकर्म टाकुनि असुखकर कुकर्म कोण साधु करी ? ॥ ७ ॥
मद्यौवन, संजय हें निजनामहि, बुडविलें तुवां दगडें ।
झगडे यशोर्थ, अरिरथचक्रांही स्पष्ट लोष्टसा रगडे ! ॥ ८ ॥
जेणें लज्जित व्हावें स्वर्गीं सहपूर्वजें तुझ्या तातें ।
परमानुचित पलायन कैसें केलें तुवां कुजाता ! तें ? ॥ ९ ॥
मरण विहित, न पलायन, भीती धर्मज्ञराजकन्या या ।
अन्या याहुनि अधिका घडल्याही न गणतीच अन्याया ॥ १० ॥
साधूंसि बाहुजाचा मत विजय जसा, तसाचि वध मत रे ।
निजधर्माश्रित न बुडे, निजधर्मच्युत कधीं न अधम तरे ! ॥ ११ ॥
अधमा ! तुवां मरावें, क्षणहि न बुडवूनि मान वांचावें ।
काळा ! यासम अन्यहि जे असतिल, त्यांहि मानवां चावें " ॥ १२ ॥

तो संजय तीस म्हणे, " पुत्राच्या इच्छितीस कां मरणा ? ।
वांछिति शमा अकामप्राज्ञ, इतर इच्छिती सकाम रणा ॥ १३ ॥

रडशील सस्नुषा कीं मज जरि देईल परासुता समर ।
न म्हणेल स्वप्नींही शतपुत्राही परा सुतास मर " ॥ १४ ॥

" जी व्यर्थ उभयलोकानुपयुक्त अपत्य वाढवी, तीतें ।
स्पष्ट खरीवात्सल्य, ज्ञाते जन म्हणति ' गाढवी ' तीतें ॥ १५ ॥

निजलासि काय ? उठ रे; जय पावतसे सदा समरशील ।
उत्साह टाकितां तूं दैन्यें सांगन उदास मरशील " ॥ १६ ॥

संजय म्हणे, " नमस्ते जननि, जन निशाकरें जसा निवतो ।
बोधें तसा निवालों, न हितकर गुरुपदेशसा शिव तो " ॥ १७ ॥

विदुलोक्त करी संजय जिंकुनि समरांत सिंधुराजाला ।
सिंहीला तोचि उचित सुत, जो मारूनि सिंधुरा जाला ॥ १८ ॥

सांग स्वसख्यासि असें, झाली त्वत्सूतकीं गगनवाणी ।
कीं "कुंति ! हा अरि वधुनि पद साधिल, तुज सुखा मग न वाणी"॥१९॥

तें सत्य असो, तेंही जें युद्ध पुरांतका महेशासीं, ।
मद्वीरसूत्वहि, श्रीस्त्रीकीर्त्यपहारकाम हे शासीं ॥ २० ॥

भीमासि म्हणे, " द्यूतीं नेलें जिंकून वित्त भीमा ! जे ।
तें न स्मरे; न तुमच्या वनवासालाहि चित्त भी माजें ॥ २१ ॥

सलतें मनांत, दुष्टें ओढुनि नेली सभेंत कृष्णा ते ! ।
स्मरली, त्वांहि उपेक्षा करितां हरितां निरीस, कृष्णातें ॥ २२ ॥

त्या स्मरणें मन पडलें तापीं बहु, जेंवि तळमळत डागें ।
हृदयें मोह उघडिला, जैसा ग्रीष्मांत तळमळ तडागें" ॥ २३ ॥

दावावें, यश जोडुनि, कुलजानें सुप्रसन्न वदन कुळा ।
प्रथम पुसोनि कुशल मग जगदीशा ! तूं असेंचि वद नकुळा ॥ २४ ॥

" अयशस्कर तोक पळहि मळवाया धाम बा ! न रांगावें ।
जरि न गमेचि, तरि सुखें चित्ररचितरामवानरां गावें ॥ २५ ॥
हें क्षत्रियेसि समुचित, " ऐसाचि निरोप सांग सहदेवा ।
जो पांचांत यशस्कर, तो माजा पुत्र मूर्तमह देवा ॥ २६ ॥
कृष्णेसि सांग कृष्णा ! " तिळभरिहि तुजें उणें नसो शील ।
त्वां साहिलें, असें पळमात्रहि सर्वसहा न सोशील ! ॥ २७ ॥
त्वां रक्षिलें, न झालें क्षम रक्षायाहि मत्तनय नातें ।
असते क्षम, चरणनखां स्पर्शों देते न मत्त-नयनातें ॥ २८ ॥
जरि बुडविलीस माझ्या पुत्रांहीं व्यसनगर्तलीनांहीं ।
तरि न विटलीस, यापरि सत्वें कोणीहि वर्तली नाहीं " ॥ २९ ॥
किंबहुना सांग तया समयीं जें काय चांगलें कांहीं ।
कृष्णा, मन्मत हें कीं, यश रक्षावें न आंग, लेंकाहीं ' ॥ ३० ॥

# १०. शंकराचार्य

शंकराचार्यांचा जन्म केरल देशांतील नंबुद्री ब्राह्मण कुळांत कालटी या गांवीं झाला. त्यांच्या वडिलांचें नांव शिवगुरु होतें व आईचें नांव सती किंवा आर्यांबा होतें. त्या दांपत्याला बहुतकाळपर्यंत अपत्य नव्हतें म्हणून ते महादेवाची मनोभावेंकरून सेवाचाकरी करूं लागले. तपश्चर्येनें महादेव प्रसन्न झाला व त्यानें त्या दांपत्याला स्वप्नांत दृष्टांत देऊन, सर्वज्ञ पण अल्पवयी सुपुत्र तुम्हांस होईल असा वर दिला. वरप्रसादानें सती गरोदर राहिली व पूर्ण दिवस भरल्यावर ती प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. शिवाचा प्रसाद म्हणून त्याचें शंकर नांव ठेविलें. हा मुलगा अद्वितीय बुद्धीचा होता. यामुळें तीन वर्षांच्या आंत त्याला लिहावयास व वाचावयास येऊं लागून त्याला पुष्कळ ज्ञान झालें. शंकराचे वडील त्याच्या वयाच्या तिसऱ्या वर्षीं वारले. शंकराचें उपनयन पांचव्या वर्षीं झालें. त्यानंतर तो गुरूजवळ अध्ययन करूं लागला व त्याला सर्व इतिहास व पुराणें अवगत झालीं. आठव्या वर्षीं तो सर्वशास्त्रपारंगत झाला. त्यानें संन्यास घेण्याची इच्छा दर्शविली पण आई परवानगी देईना. याच सुमारास तो नदींमध्यें स्नानास गेला असतां त्याला मगरानें धरलें. संन्यासाची परवानगी मिळण्यास ही संधि बरी आहे असें पाहून शंकरानें आईला बोलावून सांगितलें कीं, संन्यासाची परवानगी देत असल्यास मी या मगरमिठींतून सुटेन. सतीनें मग आढेवेढे न घेतां शंकराला संन्यास घेण्याची परवानगी दिली. शंकरहि आईची व्यवस्था करून तिला जरूर तेव्हां भेट देईन असें आश्वासन देऊन प्रवासास निघाला. दऱ्याखोऱ्या, जंगलें व गांवें टाकून तो नर्मदाकांठीं गोविंदयतीच्या आश्रमाला आला. गोविंदशिष्यत्व पत्करून त्यांचे सन्निध राहून शंकरानें वेदांतशास्त्रांत पारंगतता मिळविली. नंतर गोविंदयतींनीं शंकरास काशीस जाऊन बादरायणसूत्रांवर भाष्य करण्यास व तेथून सर्व मानव जातीच्या उद्धाराकरितां संचार करण्यास आज्ञा केली.

येथपासून शंकर शंकराचार्य बनले व त्यांना शिष्य मिळूं लागले. काशीस ग्रंथलेखन पुरें करून शंकराचार्य आपल्या शिष्यांसह प्रयागास आले. तेथें त्यांना कुमारिलभट्ट आपल्या पापाकरितां चिताप्रवेश करण्याच्या तयारींत असलेले भेटले व त्यांच्या इच्छेनुरूप शंकराचार्य कुमारिलाचा पट्टशिष्य मंडनमिश्र याच्याशीं वाद करण्याकरितां माहिष्मतीनगरीस गेले. वादांत मंडनमिश्र हरले; व नंतर त्यांनीं संन्यास घेतला आणि ते शंकराचार्यांचे सुरेश्वर नामाभिधानाचे एक मोठे विद्वान् शिष्य बनले.

येथून शंकराचार्य दक्षिणेकडे वळले. त्यांनीं आपले ग्रंथ महाराष्ट्रामध्यें प्रसिद्ध केले; आणि नंतर शिष्यांसहवर्तमान ते शृंगेरीस गेले. या वेळीं अंतर्ज्ञानानें आपली आई अत्यवस्थ आहे असें शंकराचार्यांना कळल्यावरून शिष्यांना मागें ठेवून ते कालटी येथें गेले. त्यांनीं तिला गूढ वेदांत शिकविण्याचा प्रयत्न केला, पण तिला तो समजेना म्हणून त्यांनीं तिला शिवाचें किंवा विष्णूचें स्मरण करावयास सांगितलें. त्याप्रमाणें तिनें केलें व तिच्या मनाचें समाधान झालें. माझी क्रिया यथाविधि कर अशी आज्ञा करून त्यांची आई वारली. शंकराचार्यांनीं आईची आज्ञा शिरसावंद्य मानून संन्यासधर्माविरुद्ध असतांना सुद्धां तिचें क्रियाकर्म यथाविधि करण्याचा बेत करून आप्तेष्टांस बोलाविलें. पण संन्याशाला अंत्यविधि करण्याचा अधिकार नाहीं असें म्हणून त्या आप्तेष्टांनीं शंकराचार्यांच्या बोलावण्याचा अनादर केला. तेव्हां शंकराचार्यांनीं कोणाचीहि मदत न घेतां स्वतःच आईच्या प्रेताचें यथाविधि दहन केलें व तिची उत्तरक्रियाही केली.

दक्षिणेकडे मठ स्थापून व त्याची नीट व्यवस्था लावून शंकराचार्य पुनः उत्तरदिशेकडे गेले ते थेट काश्मीरदेशांत जाऊन त्यांनीं तेथल्या विद्वानांना वादांत जिंकलें. उत्तरेकडेहि त्यांनीं पुष्कळ मठ स्थापले. तिकडे प्रवास करीत असतांनाच त्यांचें निर्याण झालें असें कांहीं म्हणतात, तर ते परत कांचीस येऊन तेथें त्यांचें निर्याण झालें व तेथेंच

त्यांची समाधि बांधण्यांत आली असें कोणी म्हणतात. हें त्यांचें निधन वयाच्या बत्तिसाव्या किंवा अडतिसाव्या वर्षी झालें असेंही निरनिराळ्या ग्रंथांत म्हटलें आहे.

शंकराचार्यांची विलक्षण बुद्धिमत्ता व त्या बुद्धिमत्तेचा अल्पकाळांतच झालेला विलक्षण विकास किती आश्चर्यकारक आहे! त्यांनीं वयाच्या बारा चवदा वर्षांचे आंतच सर्व विद्यांत पारंगतत्व मिळविलें व लौकरच संस्कृतांतील दशोपनिषदें, ब्रह्मसूत्रें व भगवद्गीता या प्रमुख ग्रंथांवर विद्वत्ताप्रचुर अशा विस्तृत टीका लिहिल्या. किती तरी स्तोत्रें व स्वतंत्र प्रकरणेंही त्यांनीं लिहिलीं. केवढी अचाट ही बुद्धिमत्ता! शंकराचार्यांच्या चरित्रांतील हा भाग विलक्षण वाटला तरी अश्रद्धेय मानण्याचें कारण नाहीं. त्याचप्रमाणें शंकराचार्यांचा सर्व हिंदुस्थानचा प्रवास व धार्मिक विजय हेहि आश्चर्यकारक आणि विलक्षण असले तरी ते अश्रद्धेय मानण्याचें कारण नाहीं. जरी शंकराचार्यांनीं पुष्कळच मठ स्थापन केले असें चरित्रग्रंथांतून सांगितलें आहे तरी पण हिंदुस्थानच्या चार दिशेला-उत्तरेस बदरीश्वरीं, पूर्वेस पुरीस, पश्चिमेस द्वारकेस व दक्षिणेस शृंगेरीस--चार मठ स्थापन केले व हिंदुस्थानचे चार भाग करून प्रत्येक मठाला एक एक भाग वांटून दिला असें दिसतें. या चार मठांवर आपल्या चार मुख्य शिष्यांची स्थापना करून त्यांना धर्माधिकार दिले.

हिंदुधर्माच्या बाबतींत शंकराचार्यांचें मुख्य कार्य परस्परांशीं भांडणाऱ्या पंथांचा समेट घडवून आणण्याचें होतें. तसेंच तात्त्विक दृष्ट्या ज्ञानमार्ग, भक्तिमार्ग व कर्ममार्ग असे परस्परविरोधी व परस्परांपासून स्वतंत्र असे मोक्षमार्ग जे समजत त्यांचेमध्येंहि शंकराचार्यांनीं समेट घडवून आणला. पूर्वीच्या चार आश्रमांचें व विशेषतः संन्यासाश्रमाचें पुनरुज्जीवन त्यांनीं केलें. शंकराचार्यांच्या मतांचा पगडा हिंदीजनमनावर अद्यापपर्यंत कायम आहे. शंकराचार्यांच्या अलौकिक कामगिरीचा हाच विशेष होय.

## ११. रानांत एकटेंच पडलेलें फूल

वन सर्व सुगंधित झालें,
मन माझें मोहुनि गेलें—कितितरी !

मी सारें वन हुडकीलें
फुल कोठें न कळे फुललें—मज तरी.
स्वर्गांत
दिव्य वृक्षांस
बहर ये खास
असें कल्पीलें—असें कल्पीलें;
मन माझें मोहुनि गेलें—कितितरी !

परि फिरतां फिरतां दिसलें
फुल दगडा आड लपालें—लहानसें;
दिसण्यांत
फार तें साधें
परी आमोदें
जगामधिं पहिलें—जगामधिं पहिलें;
मन माझें मोहुन गेलें—कितितरी !

मी प्रेमें वदलों त्याशीं
"कां येथें दडुनी बससी—प्रिय फुला ?
तूं गडे
फुलांची राणी
तुला गे कोणी
रानिं धाडीलें—रानिं धाडीलें ?"
मन माझें मोहुन गेलें—कितितरी !

तें लाजत लाजत सुमन
मज म्हणें थोडकें हंसुन :
" निवडलें
प्रभूनें स्थान
रम्य उद्यान
तेंच मज झालें—तेंच मज झालें."
मन माझें मोहुन गेलें—कितितरी !

# १२. ज्वालामुखी पर्वत

सृष्टिवैभव पाहण्याची ज्यास खरी गोडी आहे व ज्यानें सृष्टि-व्यापाराचा विचार करण्यांत आपला बराच काळ घालविला आहे, त्यास सहज कळून येईल कीं, सृष्टींतील अनेक कार्यांशीं मानवी कृतींची तुलना केली असतां आमच्या मोठ्या आश्चर्यकारक कृतीहि अगदीं क्षुल्लक दिसतात व मानवी प्राण्यास अद्यापि सृष्टीपासून पुष्कळ गोष्टी शिकून घेणें अवश्य आहे असें स्पष्ट सुचवितात. आमच्या साध्या डोळ्यांस जें अगदीं अदृश्य अशा परिमाणूंतहि सृष्टीनें इतकें चातुर्य खर्च केलें आहे कीं, सूक्ष्मदर्शकादि यंत्रांनीं हे परिमाणू पाहिले असतां आमची मति अगदीं थक्क होऊन जाते. तसेंच भूकंप, ज्वालामुखी पर्वत इत्यादि सृष्टीचे प्रचंड व्यापार पाहिले असतांहि मनुष्यास आपल्या अल्पशक्तित्वाचा खेद वाटतो व या आकस्मिक भव्य चमत्काराचा विचार करतां त्याच्या मानसिक शक्ति स्तब्ध होऊन त्याचें अंतःकरण अगदीं भयभीत होतें.

ज्वालामुखी पर्वतांतून वारंवार जे चमत्कार दृष्टीस पडतात त्यांचीं खरीं कारणें काय आहेत हें अद्यापि निश्चित झालें नाहीं. कारण हे चमत्कार सुरू असतां आसपास राहण्याचें किंवा जाण्याचें कोणाचेंही सामर्थ्य नाहीं. ह्या चमत्कारांचा मूळ उगम पृथ्वींत इतका खोल असतो कीं, त्या प्रदेशाची मनुष्यास अनुमानाखेरीज कांहींच माहिती नाहीं; व हीं अनुमानें वरील चमत्कार होऊन गेल्यावर मागील वस्तुस्थितीवरून केलेलीं असतात. पृथ्वीचा अंतर्भाग अत्यंत उष्ण आहे; तेथें सर्व पदार्थ प्रवाही स्थितींत आहेत; पृथ्वीच्या पृष्ठभागास आंतून मोठ्या भेगा असून त्यांतून पाणी पृथ्वीच्या अत्युष्ण भागांत प्रवेश करूं शकतें; इत्यादि प्रथम अनुमानें गृहीत धरून सांप्रतकाळीं ज्वालामुखी पर्वतांचीं आदिकारणें ठरविण्याचा तत्त्ववेत्त्यांनीं प्रयत्न केला आहे.

हे पर्वत बहुधा वाटोळे असून वरतीवरती निमुळते होत गेलेले असतात. त्यांच्या शिखरांच्या मध्यंतरीं एक खोल नळी असते व ह्या नळीचा

व्यास कोठें कोठें सात आठशें फूटपर्यंत आढळतो. ह्या नळ्यांची खोलीही पुष्कळच असते. भूगर्भांत कांहीं मोठा क्षोभ झाला असतां आसपासच्या ज्वालामुखीपर्वताखालीं मेघगर्जनेसारखा मोठा ध्वनि होतो. नंतर एकाएकीं या पर्वताच्या नळ्या उघडून त्यांतून धुराचे लोटचे लोट बाहेर पडूं लागतात. या धुरांत पाण्याची वाफ पुष्कळच आढळते व तिच्या बरोबर एक प्रकारची बारीक राख वरती उडून तिचा भोंवतालीं वर्षाव होतो. हा धूर व ही राख, हवा स्थिर असल्यास, आकाशांत हजारबाराशें फूट समोर उंच जाऊन पसरते व त्या योगानें एकाद्या मोठ्या नारळाच्या झाडाप्रमाणें त्यांचा आकार दिसतो. पुढें ही राख, फारच हलकी असल्यानें, वाऱ्याच्या वरील प्रवाहाबरोबर वाहून तिचे दूरपर्यंत पातळ किंवा जाड असे थर भूपृष्ठावर बसतात. अशी राख कधीं कधीं ४८ तासपर्यंत उघड असते; ज्वालामुखीच्या आसपास यावेळीं इतका काळोख पडतो कीं, आपल्या शेजारचा मनुष्य आपणांस ओळखूं येत नाहीं. सूर्य व चंद्र खग्रासाप्रमाणें अंधुक व अस्पष्ट होतात. ही इतकी राख जमिनीवर बसण्यास निदान १५–२० दिवस लागतात, व या काळीं वर सांगितल्याप्रमाणेंच बहुधा सर्वत्र अंधुकपणा असतो. या राखेस चांगला वारा लागल्यास ती ७००–८०० किंवा अधिकही मैलपर्यंत उडून जाते. ही राख उडण्याची राहिल्यावर कांहीं वेळपर्यंत लहान मोठ्या दगडांचा वर्षाव होऊं लागतो. खंडी खंडी वजनाचे मोठे दगड आंतील जोरानें फेकले जाऊन उंच उडून पर्वताच्या पायथ्याशीं येऊन पडतात. एक वेळ तर पांच खंडी वजनाचा ५०० घनफूटाएवढा दगड कॅटोपॅक्सी नांवाच्या ज्वालामुखींतून निघून नऊ मैलांवर जाऊन पडला. ही दगडांची वृष्टि संपल्यावर पुढें लाव्हा किंवा वितळलेला खडक यांचा मोठा प्रवाह वाहूं लागतो. त्याचा थर ज्वालामुखीच्या आसपास १० फुटांपासून तो ५०० फुटांपर्यंत जमिनीवर बसतो. व त्या प्रदेशाचें पूर्वीचें सर्व स्वरूप बदलून जातें.

# १३. सह्याद्रि

कोठें दुर्गम उंच उंच शिखरीं भेदोनि तारापथा ।
विंध्याद्रिव्रत आचरोनि अडवूं पाहे रवीच्या रथा ॥
कोठें भार्गवराममार्गणभयें जो भीरु मागें पळे ।
त्याचा मारहि साहुनी पुरवितो प्रेमें मुलींचे लळे ॥ १ ॥

कोठें खोल महाभयानक दरी पाहोनियां ज्यांकडे ।
सूर्याचे करही भयें दचकुनि माघारती बापडे ॥
कोठें घोष करीत पुण्यतटिनी जातां समुद्राकडे ।
खालीं आदळती धडाधड जणूं पापाचलाचे कडे ॥ २ ॥

कोठें शीतळ वाहती झुळझुळां अच्छोदकाचे झरे ।
ज्यांच्या केवळ दर्शनेंच सगळी तृष्णा जनांची हरे ॥
कोठें रम्य सरोवरें; स्फटिकभा शुद्धोदकें ज्यांचिया ।
केली लज्जित शारदेंदुकिरणां देवोनियां आश्रया ॥ ३ ॥

कोठें व्योमपथें महीरुह शिरें उंचावुनी आपलीं ।
घालाया बघती जणूं निजगळां निःसार मेघावली ॥
कोठें पालवतां लता रुचिरता साऱ्या प्रदेशास ये ।
वाटे पांघुरली सुरम्य हिरवा शेला वनश्री स्वयें ॥ ४ ॥

ताराया भजकां सदाशिव कुठें ज्योतिःस्वरूपें वसे ।
कोठें येउनि ही हिमालयसुता ह्या सप्तशृंगीं बसे ॥
कोठें ह्या विवरीं लपोनि बसती बौद्धादिकांच्या कृती ।
होते कुंठित ज्यांकडे निरखितां कारागिरांची मती ॥ ५ ॥

कोठें हे उंच माना करुनि गड यशस्तंभ राया शिवाचे ।
देती आम्हां मराठ्यां स्मरण घडिघडी आमच्या वैभवाचें ॥
गेला ! तो काळ गेला निघुनी विभवही नष्ट तें सर्व झालें ।
गेलें तें तेज गेलें ! पुरुषवरहि ते भाग्यशाली निमाले ! ॥ ६ ॥

नाहीं घोरपडीशिवाय शिवली भिंतीस ज्याच्या शिडी ।
फेंकाया शकले न दृष्टि रिपुहि ज्याच्याकडे वांकडी ॥
तान्हाजीसम वीरसिंह पडला ज्या कारणें संगरीं ।
त्या ह्या सिंहगडीं निरंतर शिवा स्वाराज्य आतां करी ! ॥ ७ ॥

ज्याचा मावळुनी प्रतापतरणी केव्हांच गेला तरी ।
गर्वे मान वरी करोनि बसला जो ह्या गिरीच्या शिरीं ॥
तो हा पाहुनियां प्रतापगड त्या राया शिवाची कृती ।
त्याच्या वाघनखांसह स्मरुनियां तल्लीन होते मती ॥ ८ ॥

जेथें ऐकुनि चौघडे धडकतां राज्याभिषेकोत्सवीं ।
नाचें हर्षभरें विरक्तहि तरी तो जावळीचा कवी ॥
त्या ह्या रायगडावरोनि भगवा झेंडा पडे खालती ।
ऐसें पाहुनियां गळे सहजची त्या मावळयांची धृती ॥ ९ ॥

सह्याद्रे, तुज पाहुनि प्रथम जो आनंद झाला मला ।
त्याचा एकहि लेश यावरि नसे चित्तांत ह्या राहिला ॥
आतां राहुनियां इथें असुखची होणार आहे मना ।
दुःखें यास्तव आज सोडुनि तुला ही चालली कल्पना ॥ १० ॥

# १४. काबुलीवाला

माझ्या मिनीला पांचवें वर्ष आहे. कांहीं तरी बडबडावयाला असल्याशिवाय तिला एक क्षणहि चैन पडत नाहीं. स्वस्थ बसून तिच्या आयुष्यांतील एकहि क्षण फुकट गेलेला नाहीं, याबद्दल मी खात्री देऊं शकेन. तिच्या आईला याचा पुष्कळ वेळां राग येतो व तिला तिची बडबड थांबवावी असें वाटतें. पण मला अशी इच्छा कधींच होत नाहीं. मिनीनें स्वस्थ बसणें म्हणजे अगदीं अब्रह्मण्य होय. व मला तें फार वेळ सहन करितां येत नाहीं. मी जेव्हां जेव्हां तिच्याशीं बोलतों, तेव्हां तेव्हां गमतीला तोटा नसतो.

एके दिवशीं सकाळीं मी माझ्या कादंबरीचें सतरावें प्रकरण लिहिण्याच्या ऐन रंगांत होतो. इतक्यांत मिनी हळूच पाऊल न वाजवितां खोलींत आली, व माझ्या हातांत हात घालून म्हणाली, "बाबा, रामदयाळ भय्या कावळयाला 'काग' म्हणतो; त्याला कांहींच कसें समजत नाहीं हो?"

दोन भाषांतील फरक मी तिला समजावून देण्याला आरंभ करितों न करितों तोंच तिनें दुसऱ्या विषयावर उडी मारली होती. "बाबा, भोला म्हणतो कीं ढगांत एक मोठा हत्ती आहे; तो सोंडेंत पाणी घेऊन उडवितो आणि मग पाऊस पडतो. खरं कां हो?"

उत्तराचा विचार करीत मी हताश बसलों. तिचा सपाटा कायम होता. "बाबा, आई तुमची कोण हो?"

गंभीर चेहेरा करून मीं कसेंबसें म्हटलें, "मिनी, आतां जा, आणि भोलाबरोबर खेळ बघूं. मी कामांत आहे."

माझ्या खोलीची खिडकी रस्त्यावर होती. मिनी टेबलाखालीं माझ्या पायांजवळ बसून गुडघ्याचा तवला करून फारसा आवाज न करितां

खेळत होती. मी सतराव्या प्रकरणांत गढून गेलों होतों; यांत नायक प्रतापसिंग नायिका कांचनलतेला घेऊन किल्ल्याच्या तिसऱ्या मजल्यावरील खिडकींतून निसटण्याच्या बेतांत होता. इतक्यांत एकदम खेळबीळ टाकून 'ओ हो, काबुलीवाला, काबुलीवाला' म्हणून ओरडत मिनी खिडकीकडे धांवत गेली. आणि खरोखरीच खालीं रस्त्यांतून एक काबुलीवाला सावकाश रेंगाळत चालला होता. अफगाणी लोकांचा नेहमींचा सैल, मळका पोषाख व उंच फेटा त्यानें घातला होता. त्याच्या पाठीवर एक मोठी पिशवी होती, व हातांत एक पेटी होती.

या मनुष्याला पाहिल्यावर मिनीच्या मनांत काय विचार चालले होते हें कांहीं मला सांगतां येणार नाहीं, पण ती त्याला मोठ्यानें हांक मारूं लागली. मी विचारांत पडलों, "आतां काय करावें? हा आंत येणार, आणि माझें सतरावें प्रकरण थांबणार." याच वेळीं काबुलीवाल्यानें मागें वळून मिनीकडे पाहिलें. ती घाबरली व आईचा आश्रय करण्याकरितां आंत पळाली. तिची खुळी कल्पना होती कीं, त्याच्या पाठीवरच्या मोठ्या पिशवींत आपल्यासारखीं दोनतीन मुलें असावीं. एवढ्या वेळांत तो फिरता व्यापारी दारांतून आंत आला, व हंसत हंसत त्यानें मला सलाम केला.

माझ्या नायकनायिकांची स्थिति इतकी अनिश्चित झाली कीं, माझा पहिला विचार, 'मिनीनें याला बोलाविलें आहे तर आतां थांबावें व कांहीं तरी विकत घ्यावें' असा होता. मीं कांहींबाहीं खरेदी केली, व मग सुलतान अबदुर रहमान, रशियन, इंग्रज, सरहद्दीवरील राजकारण. वगैरे विषयांवर आमचें बोलणें सुरू झालें.

निघायचें तेव्हां त्यानें विचारलें, "पण साहेब, मुलगी कुठें आहे?"

उगीचच्या उगीच मिनीनें भितां उपयोगी नाहीं म्हणून मीं मिनीला बाहेर आणविलें.

ती माझ्या खुर्चीजवळ उभी राहिली, आणि काबुलीवाला व त्याची पिशवी यांकडे पाहूं लागली. त्यानें तिला काजू व मनुका दाखविल्या; पण तिला मोह पडेना व ती त्याच्याकडे जाईना. उलट अधिकच भिऊन ती मला जास्त जास्त बिलगूं लागली.

ही त्यांची पहिली भेट.

कांहीं दिवसांनीं मी सकाळीं घरांतून बाहेर पडत होतों तेव्हां मिनी दाराजवळच्या बाकांवर व तो धिप्पाड काबुलीवाला तिच्या पायांजवळ बसलेला असून दोघेंहि बोलत व हंसत आहेत असें मीं पाहिलें. तेव्हां मी थोडासा चकित झालों. 'बाबा' शिवाय इतका निमूटपणें ऐकत बसणारा श्रोता माझ्या मिनीला जन्मांत कधीं लाभला नसेल असें दिसलें. तिच्या छोट्या साडीच्या पदरांत पाहुण्यानें बहाल केलेले बदाम आणि मनुका खच्चून भरल्या होत्या. 'कशाला दिलेंस तिला हें?' असें म्हणून मीं त्याच्या हातावर एक अधेली काढून ठेविली. कांहीं आढेवेढे न घेतां त्यानें ती घेतली व खिशांत टाकिली.

अरेरे! एका तासानें मी जों परत येतों तों त्या बिचाऱ्या अधेलीनें केवढा अनर्थ करून टाकिला होता! कारण काबुलीवाल्यानें ती मिनीला दिली; मिनीच्या हातांत रुप्याचें चकचकीत नाणें दिसल्याबरोबर तिच्या आईनें तिच्यावर झडप घातली. "कोठून घेतलीस ती अधेली?"

मिनीनें हंसत हंसत उत्तर दिलें, "मला काबुलीवाल्यानें दिली."

"हो, काबुलीवाल्यानें दिली!" तिची आई अंगावर कांटा येऊन ओरडली; "कारटे, तूं घेतलीस कशी त्याच्याजवळून?"

मी त्याच क्षणीं घरांत आलों, आणि मिनीवर येऊं घातलेल्या संकटां-तून तिला सोडवून मीं स्वतः चौकशी आरंभिली.

मला असें आढळून आलें कीं, या दोघांच्या एकदा दोनदाच नव्हे तर पुष्कळ वेळां गांठी पडल्या होत्या; काजू आणि बदाम यांचें आमिष

वासून मोठ्या खुबीनें काबुलीवाल्यानें तिची भीति घालविली होती, व त्या दोघांची आतां मोठी गट्टी जमली होती.

त्यांचे कांहीं विलक्षण थट्टेचे विषय होते; दोघांनाहि त्यांपासून फार करमणूक होई. त्याच्यापुढें मिनी बसे, जशी काय एखादी राणीच अशी; त्याच्या अगडबंब शरिरावरून दृष्टि फिरवी, व गालाला खळी पडेल अशा रीतीनें हंसत त्याला विचारी, "ए काबुलीवाल्या, तुझ्या पिशवींत काय आहे रे ?"

आणि तो आपल्या लोकांप्रमाणें नाकांत बोलत उत्तर देई, "हत्ती आहे, हत्ती !" काय याच्यांत मौज असावी ? पण तीं दोघें जीं यावर हंसावयाचीं तीं कांहीं विलक्षण. मला तर ती जेव्हां जेव्हां मोठ्या माणसाबरोबर बोले तेव्हां तेव्हां तिच्या बोलण्यांत एक प्रकारची जादू आहे असें वाटे.

पण काबुलीवालाहि कांहीं कमी नव्हता. तो तिला विचारी, "बरं, पोरी तूं सासऱ्याच्या घरीं कधीं जाणार ?"

हिंदु घरांत अगदीं लहान मुलींना देखील सासऱ्याच्या घराविषयीं माहिती नाहीं असें होत नसतें. पण आम्ही पडलों जरासे सुधारकी थाटाचे. त्यामुळें आम्हीं मिनीला या गोष्टी सांगितल्या नव्हत्या. मिनी अर्थात्च थोडी बुचकळ्यांत पडल्यासारखी होई. पण ती हें बाहेर दाखविणार थोडीच. हजरजबाबीपणानें ती त्यालाच पुन्हां विचारी, "पण तूं जाणार आहेस का तिकडे ?"

अफगाण लोकांत 'सासऱ्याचें घर' या शब्दाला दोन अर्थ आहेत. तुरुंगाला हें गोंडस नांव आहे; कारण बिनखर्चानें आपली उत्तम बरदास्त या ठिकाणीं ठेविली जाते. या अर्थानें तो धडधाकट फेरीवाला माझ्या मुलीच्या प्रश्नाला उत्तर देई. अदृश्य अशा शिपायाला बुक्की मारण्याचा आविर्भाव करून तो म्हणत असे, "मी ? मी आपल्या सासऱ्याला चांगला ठोक देईन."

हे ऐकून व त्या बिचाऱ्या मार मिळालेल्या सासऱ्याचें चित्र डोळ्यां-पुढें आणून मिनी खदखदां हसूं लागे, व तिचा दांडगा मित्र तिला सामील होई.

हे दिवस शरदृतूचे होते. या दिवसांत पूर्वीचे राजे दिग्विजया-साठीं स्वारीवर निघत असत, आणि मी कलकत्त्याच्या लहानशा खब-दाडांत बसून आपल्या मनाला सर्व जगांतून संचार करून येण्यास परवानगी देत असे. दुसऱ्या देशाचें नांव काढिल्याबरोबर माझें मन तेथें जाई, व परदेशांतील कोणताहि मनुष्य रस्त्यांत पाहिला कीं, स्वप्नांतल्याप्रमाणें नाना प्रकारच्या कल्पनांचें जाळें विणण्यास मी आरंभ करीं. तिथले डोंगर, तिथल्या दऱ्या, तिथलीं अरण्यें, त्यांमधली त्याची झोंपडी, त्याची रानांतील स्वतंत्र राहणी, या सर्व कल्पनाचित्रांचा पट माझ्या अन्तश्चक्षूंपुढें एकसारखा मागेंपुढें होत राही. माझी कल्पना-शक्ति इतकी चालण्याचें कारण कदाचित् असें असेल कीं, मी एखाद्या रोपासारखा एका जागेला चिटकून राहिलों होतों, व प्रवासाला जाण्याचा प्रसंग मला वज्राघातासारखा वाटला असता. काबुलीवाला माझ्यासमोर असला कीं, मी रखरखीत पर्वतांच्या पाय-थ्याशीं, गगनचुंबी शिखरांच्यामधील खिंडींत जाऊन संचार करूं लागे. माल वाहणाऱ्या उंटांची रांग व कांहींच्या हातांत त्या जुन्या-पुराण्या बंदुका, कांहींच्या हातांत भाले अशा थाटानें सखल प्रदेशाकडे येत असलेल्या उंचउंच फेटे घातलेल्या व्यापाऱ्यांचा तांडा माझ्या डोळ्यांपुढें उभा राही; पण अशा गोष्टी स्वप्नांत दिसत असतां मिनीची आई मध्येंच येई, व 'त्या माणसाला जपावें' म्हणून मला विनवी.

दुर्दैवाची गोष्ट म्हणजे अशी कीं, मिनीची आई फार भित्री आहे. रस्त्यांत आवाज झालेला ऐकिला किंवा घराकडे माणसें येतांना पाहिलीं कीं, ते चोर किंवा दारुडे साप किंवा वाघ किंवा विषारी वायु किंवा झुरळे किंवा सुरवंट असले पाहिजेत हे तिचे तर्क ठेविलेले. अगां-[illegible] इतके पावसाळे तिला गेले आहेत तरी तिची भीति कांहीं कमी

होत नाहीं. म्हणून काबुलीवाल्याबद्दल तिला नानाप्रकारच्या शंका येत, व त्याच्यावर नजर ठेवण्याबद्दल ती मला बजावी.

मी हें थट्टेवारी नेऊं लागलों म्हणजे ती गंभीरपणें मला विचारी,

" मुलें कधीं कोणी पळवून नेलीं आहेत कीं नाहीं?

काबुलांत गुलाम विकीत असतात कीं नाहीं?

एवढ्या धिप्पाड माणसाला एखादें चिमुकलें पोर उचलून नेणं जड आहे कां?"

मी म्हणें हें अशक्य नसलें तरी असंभवनीय आहे. पण तिचें समाधान होईना, व तिची भीति कायम राहिली; पण ही भीति जवळ-जवळ निराधार असल्यामुळें त्या माणसाला घरांत येण्याची बंदी करणें मला बरोबर दिसेना, व म्हणून त्या दोघांच्या मैत्रींत व्यत्यय न येतां ती कायम राहिली.

—२—

दरवर्षी अर्धा जानेवारी संपण्याच्या सुमारास काबुलीवाला रहमान आपल्या देशाला परत जात असे. कर्जाऊ दिलेले पैसे घरोघर जाऊन वसूल करण्याच्या घाईत तो या वेळीं असावयाचा. तथापि त्याला मिनीला भेटावयापुरता वेळ सांपडे. या दोघांचा कांहीं तरी कट असावा असें नवख्या माणसाला वाटणें साहजिक होतें; कारण तो सकाळीं आला नाहीं तर संध्याकाळीं हटकून यावयाचा.

हा ताडमाड उंच, मैल कपडे घातलेला, पिशव्यांचें ओझें वागविणारा मनुष्य अंधाऱ्या खोलीच्या कोंपऱ्यांत बसलेला पाहिला म्हणजे कधींकधीं मला सुद्धां दचकल्यासारखें होई. पण 'ए काबुलीवाला' म्हणून ओरडत व खिदळत मिनी धांवत आली, व वयांत इतका फरक असलेले ते दोघे मित्र नेहमींप्रमाणें हंसूं व चेष्टा करूं लागले म्हणजे माझ्या जिवांत जीव येई.

त्यानें जावयाचें ठरविलें होतें त्यापूर्वी कांहीं दिवस मी सकाळीं छापखान्यांतून आलेलीं प्रुफें तपाशीत होतों. हवेंत बराच गारठा होता. खिडकींतून आलेले सूर्याचे किरण माझ्या पायांवर पडले होते, व त्यांचें

ऊब येऊन मला बरें वाटत होतें. आठ वाजण्याचा सुमार होता. सकाळीं फिरावयाचा परिपाठ असलेले लोक घरीं परत चालले होते. एकदम रस्त्यांत दंगा झालेला मीं ऐकिला, म्हणून मीं रस्त्याकडे पाहिलें. दोन पोलिसांच्या मध्यें हात बांधून रहमानला नेत होते, व त्यांच्यामागें 'काय झालें ? काय झालें' म्हणून चौकशी करीत पुष्कळशीं मुलें चाललीं होतीं. रहमानच्या कपड्यांवर रक्ताचे डाग होते, व पोलिसांपैकीं एकाच्या हातांत सुरा होता. मी घाईघाईनें बाहेर गेलों, व त्यांना थांबवून 'या सर्व प्रकारचा अर्थ काय ?' म्हणून विचारलें. कांहीं याच्याकडून, कांहीं त्याच्याकडून माहिती गोळा करितां मला असें समजलें कीं, 'शेजारच्या एका माणसानें रहमानकडून एक शाल विकत घेतली होती, पण आतां तो तें नाकारीत होता; त्यामुळें भांडण झालें व रहमाननें त्याला मारिलें.'

आतां संतापाच्या भरांत कैद्यानें आपल्या शत्रूला शिव्या हांसडण्यास सुरवात केली होती; इतक्यांत एकदम मिनी बाहेरच्या व्हरांड्यांत आली, व नेहमींप्रमाणें 'ए काबुलीवाला' म्हणून तिनें हांक मारिली. त्याबरोबर रहमानचा चेहेरा खुलला. त्याच्याजवळ पिशवी नव्हती, यामुळें हत्ती-बद्दलची गंमत आज होण्यासारखी नव्हती. म्हणून तिनें नेहमींचा दुसरा प्रश्न विचारिला, "आपल्या सासऱ्याच्या घरीं चाललास काय ?" रह-मान हंसला व म्हणाला, "होय, पोरी, तिकडेच चाललों आहे." पण मिनीची या उत्तरानें करमणूक झाली नाहीं हें पाहून त्यानें आपले बिड्या अडकविलेले हात वर करून म्हटलें, "अरे अरे ! मी त्या सासऱ्याला चांगला ठोक दिला असता; पण काय करूं ? माझे हात बांधिले आहेत."

खून होण्याचा संभव अशी मारामारी केल्याच्या आरोपावरून रह-मानला बरेच वर्षांच्या सक्तमजुरीची शिक्षा देण्यांत आली.

एकामागून एक दिवस चालले होते, व आम्ही त्याला विसरून गेलों. आमचें नेहमींचें काम नेहमींप्रमाणें चाललें होतें; व एके वेळीं डोंगरांत स्वतंत्र असलेला तो गडी तुरुंगांत कसे दिवस घालवीत असेल हा विचार

कधींच आमच्या मनांत आला नाहीं. सांगण्यास लाज वाटते, पण मिनी देखील आपल्या जुन्या मित्राला विसरली. नवे मित्र तिला मिळाले. ती मोठी झाली तशी ती जास्त वेळ बरोबरीच्या मुलींमध्यें घालवूं लागली. तिचा इतका वेळ त्यांच्या सहवासांत जाई कीं, पूर्वीप्रमाणें ती माझ्या खोलींत यावयाची बंद झाली, व मला तिच्याशीं बोलण्याची संधि बहुतेक कधींच मिळेनाशी झाली.

वर्षें हां हां म्हणतां गेलीं. पुन्हां पावसाळा संपण्याचा सुमार होता, व आम्हीं आमच्या मिनीच्या लग्नाची तयारी चालविली होती. दसऱ्याच्या सुमाराला हें लग्न ठरलें होतें. दुर्गा कैलासाला जाते त्याच वेळीं आमच्या घरांतील लक्ष्मीहि आपल्या सासरीं जावयाची होती, व आमचें घर सुनें व्हावयाचें होतें.

सकाळीं ऊन चक्क पडलें होतें. पाऊस पडून गेल्यानें हवा स्वच्छ धुवून गेल्यासारखी झाली होती, व सूर्याचीं किरणें शुद्ध सोन्यासारखीं चकाकत होतीं. तीं इतकीं चकचकीत होतीं कीं, कलकत्त्याच्या बोळांतल्या दरिद्री विटांच्या भिंती देखील शोभिवंत दिसूं लागल्या. पहांटेपासून वाजंत्र्या सुरू झाल्या होत्या; प्रत्येक सुराबरोबर माझें हृदय कंपायमान होत होतें. भैरवीचा करुणामय राग ऐकून समीप येऊन ठेपलेल्या वियोगाचें दुःख असह्य वाटत होतें. माझ्या मिनीचें आज संध्याकाळीं लग्न व्हायचें होतें.

अगदीं पहांटेपासून घरांत नुसता दंगल उडून राहिला होता. अंगणांत मांडव घालावयाचा होता; प्रत्येक खोलींत व प्रत्येक सोप्यांत रुणझुण आवाज करणारीं झुंबरें लावावयाचीं होतीं. जिकडे तिकडे जी घाई चालली होती तिला सीमाच नव्हती. हिशेब पहात मी स्वतःच्या खोलींत बसलों होतों. इतक्यांत कोणी तरी आंत येऊन मला अदबीनें सलाम केला. कोण म्हणून पाहतों तों काबुलीवाला रहमान! मी प्रथम त्याला ओळखिलें नाहीं. त्याच्याजवळ पिशवी नव्हती, त्याचे केंस लांब्या-

बरोबर कापिले होते, व त्याचा पूर्वीचा जोम नाहींसा झाला होता; पण तो हंसला, व मीं त्याला ओळखिलें.

"केव्हां आलास तूं रहमान ?" मीं विचारलें.

"मी काल संध्याकाळीं तुरुंगांतून सुटलों."

ते शब्द कानावर पडतांच मला कसेसेंच झालें. दुसऱ्या मनुष्याला जखम करणाऱ्या माणसाशीं मी यापूर्वी कधीं बोललों नव्हतों, व आतां हा प्रसंग आला हें मनांत येऊन माझें मन खचलें; मला वाटलें हा सकाळच्या प्रहरीं आला हा शुभ शकुन झाला नाहीं.

"आज घरीं कार्य असल्यानें मी जरा कामांत आहें. पुनः कधीं तरी आलास तर बरें होईल."

तो ताबडतोब जावयास निघाला; पण दाराजवळ गेल्यावर तो जरा घुटमळला व म्हणाला, "साहेब, छोटी मिनी मला एक क्षणभर भेटणार नाहीं कां ?" त्याची कल्पना होती कीं, मिनी पूर्वींइतकीच लहान राहिली होती. 'ए काबुलीवाला' करीत आपल्याकडे ती धांवत येईल, असें चित्र त्यानें आपल्या मनापुढें काढून ठेविलें होतें. पूर्वींप्रमाणेंच आपण दोघें हंसूं व बोलूं असेंहि तो समजत होता, आणि खरोखरच पूर्वींच्या दिवसांची आठवण ठेवून त्यानें कोणातरी आपल्या मित्राकडून कसेतरी मिळविलेले बदाम, मनुका व द्राक्षें काळजीपूर्वक कागदांत गुंडाळून आणिलीं होतीं; कारण त्याच्याजवळ जे थोडे पैसे होते त्यांतलें कांहीं एक उरलें नव्हतें.

मी पुनः म्हणालों, "घरांत कार्य आहे, व आज तुला कोणी भेटणार नाहीं."

त्याचें तोंड उतरलें. माझ्याकडे उत्कंठेनें एक क्षणभर त्यानें पाहिलें, व 'सलाम, साहेब' म्हणून तो बाहेर गेला.

मला जरासें वाईट वाटलें, व मीं त्याला परत बोलाविणार होतों; पण तो आपण होऊनच परत येत आहे असें मीं पाहिलें. तो माझ्या अगदीं

जवळ आला, व बरोबर आणिलेलीं फळें माझ्यापुढें करून म्हणाला, " साहेब, आपल्या मुलीसाठीं मीं हीं दोन चार फळें आणिलीं आहेत. तीं आपण तिला द्याल कां ? "

मीं तीं घेतलीं, व त्याला मी पैसे देणार तों त्यानें माझा हात धरिला व म्हटलें, " साहेब, तुम्ही फार दयाळु आहां. मला पैसे नकोत; माझी आठवण ठेवा म्हणजे झालें. आपल्याला एक लहान मुलगी आहे तशी मलाहि आहे. मला तिची आठवण होते, व आपल्या मुलीसाठीं मी हीं फळें आणितों; पैशासाठीं नव्हे ? "

असें बोलून त्यानें आपल्या पोकळ अंगरख्यांत हात घातला व कागदाचा एक बारीक मळका तुकडा बाहेर काढिला. अतिशय बेतानें त्यानें तो उलगडला व मेजावर ठेवून दोन्ही हातांनीं तो सरळ केला. त्यावर एका चिमुकल्या हाताचा ठसा होता. फोटो नव्हे, चित्र नव्हे, शाई फांसून कागदावर पालथा ठेवून उमटविलेला हाताचा ठसा. हा आपल्या लहानशा मुलीच्या हाताचा ठसा त्यानें वर्षानुवर्षें आपल्या हृदयाशीं जतन करून ठेविला होता.

माझ्या डोळ्यांला पाणी आलें. तो गरीब काबुली फळेंविक्या व मी बडा हें मी विसरलों. पण छे, मी त्याच्यापेक्षां श्रेष्ठ कसा ? तोहि बाप होता.

त्याच्या हजारों कोस लांब असलेल्या डोंगराळ घरांतील बालपार्वतीच्या हाताच्या ठशानें लहानपणींच्या माझ्या मिनीची आठवण मला झाली.

मीं तावडतोब मिनीला आंत बोलावणें पाठविलें. अनेक प्रकारच्या अडचणी उपस्थित करण्यांत आल्या; पण मीं त्या सर्व धुडकावून दिल्या. लग्नाच्या दिवसाला योग्य अशी तांबडी साडी नेसलेली, कपाळावर चंदनाचा मळवट भरलेली, तरुण वधूचे अलंकार अंगावर घातलेली मिनी बाहेर आली व विनयानें माझ्यासमोर उभी राहिली.

हा अकल्पित देखावा पाहून तो काबुलीवाला चकित झाला. जुनी मैत्री पुढें चालविणें शक्य नव्हतें. शेवटीं त्यानें मंदास्मित करून म्हटलें: "पोरी, मग तूं सासऱ्याच्या घरीं निघालीस काय ?"

पण आतां मिनीला 'सासरा' या शब्दाचा खरा अर्थ कळूं लागला होता. तिला पूर्वीप्रमाणें उत्तर देणें अशक्य होतें. तो प्रश्न ऐकून ती लाजली व मान खालीं घालून उभी राहिली.

काबुलीवाला व माझी मिनी यांची पहिल्यानें गांठ पडली तो दिवस मला आठवला व मी खिन्न झालों. ती गेली तेव्हां रहमाननें लांब सुस्कारा सोडिला व तो जमिनीवर बसला. आपण इतका वेळपर्यंत घरापासून लांब राहिलों तेव्हां आपली मुलगीहि मोठी झाली असली पाहिजे व तिच्याशींहि पुनः नवी मैत्री केली पाहिजे अशी एकदम त्याला कल्पना आली. जशी तिला त्यानें सोडिली तशी ती त्याला खास भेटणार नव्हती; आणि शिवाय या आठ वर्षांत तिला कांहीं झालें तर नसेल !

मंगलवाद्यें वाजूं लागलीं; शरदृतूचें सौम्य ऊन सभोंवार पडलें होतें; पण रहमान कलकत्त्याच्या एका आळींत बसलेला होता, व त्याला स्वतःपुढें अफगाणिस्तानचे भुंडे डोंगर दिसत होते.

मी एक नोट काढून त्याला दिली, व म्हटलें, "रहमान जा, आपल्या देशांत जाऊन आपल्या मुलीला भेट. त्या भेटीनें तुम्हांला जो आनंद होईल त्यानें माझ्या बाळीला सुखाचा लाभ होवो !"

ही देणगी दिल्यानंतर इतर बाबींचा खर्च मला कमी करावा लागला. विजेची रोषणाई मला करितां आली नाहीं, लष्करी बँडहि बोलावितां आला नाहीं, घरांतल्या बायकांची बरीच निराशा झाली. पण एका दूरच्या देशांत पुष्कळ वर्षांनीं बापाची व त्याच्या एकुलत्या एक मुलीची भेट पुनः झाली या विचारानें मला लग्नाचा समारंभ दुप्पट आनंददायक झाला.

## १५. एकनाथ चरित्र

त्या भानुदासास पुत्र सद्गुणी ॥ त्याचें नांव ठेविलें चक्रपाणी ॥ तो परम भाविक वैष्णव ज्ञानी ॥ श्रीहरिभजनीं निमग्न ॥ १ ॥ त्याचा पुत्र सूर्यनारायण ॥ जो ज्ञानप्रकाशें देदीप्यमान ॥ त्याची कांता सुलक्षण ॥ नांव रुक्मिणी तियेचें ॥ २ ॥ ते निजउदरीं प्रसवला सुत ॥ नाम तयाचें एकनाथ ॥ तो जगद्गुरु अवतरला साक्षात ॥ परिसा चरित्र तयाचें ॥ ३ ॥ तो दिवसेंदिवस जाहला थोर ॥ व्रतबंध लग्न केलें सत्वर ॥ मायबापें तयावर ॥ कृपा अपार करिताती ॥ ४ ॥ तेथें जनार्दनपंत सुज्ञानरासी ॥ दत्तात्रेयदर्शन होतसे त्यासी ॥ एकनाथ उठोनि एके दिवसीं ॥ गेला दर्शनासी तयाच्या ॥ ५ ॥ आंगडें टाकोनि मस्तकावरी ॥ सद्भावें तयासि नमस्कार करी ॥ जनार्दन देखोनि ते अवसरीं ॥ विस्मित अंतरीं होतसे ॥ ६ ॥ म्हणे तूं कोणाचा सांग त्वरितें ॥ कशास्तव आलासी एथें ॥ जनार्दन संबोखून होते ॥ वृत्तांत पुसत तेधवां ॥ ७ ॥ कीं टाकोनि मातापितयांसी ॥ रुसोनि आलासि आम्हांपाशीं ॥ हें यथार्थ सांगावें मजपासीं ॥ संकोच मानसीं न धरितां ॥ ८ ॥ मग जोडोनियां दोन्ही कर ॥ एकनाथ बोले मधुरोत्तर ॥ म्हणे ऋग्वेदी ब्राह्मणकुमार ॥ दर्शना साचार पातलों ॥ ९ ॥ मायबापांवरी न रुसतां ॥ उगाचि अनुताप वाटला चित्ता ॥ कीं देहीं जडली प्रपंचममता ॥ कामक्रोधें चित्त गांजिलें ॥ १० ॥ लोभ माया दंभ अहंकार ॥ हे देहीं दिसती अनिवार ॥ म्हणोनि स्वामिदर्शनासी सत्वर ॥ आलों साचार निजप्रेमें ॥ ११ ॥ आतां हेंचि इच्छा आहे मानसीं ॥ निरंतर रहावें तुम्हापासीं ॥ सेवा करावी अहर्निशीं ॥ निजभावेंसीं आवडी ॥ १२ ॥ मी पतित शरण आलों पाहें ॥ अंगीकार करीं सद्गुरुमाये ॥ ऐसें बोलोनि लवलाहें ॥ धरिले पाय सद्भावें ॥ १३ ॥ एकनाथाचें ऐकोनि वचन ॥ आश्चर्य करिती जनार्दन ॥ म्हणे वय तों दिसताहे लहान ॥ परि विशाळ ज्ञान अनुपम ॥ १४ ॥ मग जनार्दनें अभय देऊनि त्यासी ॥ म्हणितलें सुखें असावें आम्हांपासीं ॥

हें वचन ऐकोनि मानसीं ॥ उल्हास चित्तासीं वाटला ॥ १५ ॥ जैसा द्वैपायन पडला संशयवनीं ॥ तयासी भेटला नारदमुनी ॥ तेविं जनार्दनाचे अमृतवचनीं ॥ एकनाथ मनीं संतोषले ॥ १६ ॥ स्वामी सेवेसी निरंतर ॥ अहोरात्र असे तत्पर ॥ कोणे दिसीं न पडे अंतर ॥ भावार्थ थोर धरियेला ॥ १७ ॥ रात्रीं निजतां जनार्दन ॥ स्वकरें चुरीत बैसे चरण ॥ निद्रा लागतां त्याजकारणें ॥ परी नाहीं उठणें सर्वथा ॥ १८ ॥ विडा करूनि निजहस्तें ॥ सर्व साहित्य घालोनि त्यांत ॥ जनार्दनासी होऊनि विनत ॥ नित्य देई निजप्रेमें ॥ १९ ॥ मुख प्रक्षाळावयासी तस्त ॥ निजकरें पुढें आणोनि ठेवित ॥ स्नान घालोनि आपल्या हातें ॥ साहित्य देत पूजेचें ॥ २० ॥ जेवित शेष उच्छिष्ट राहत ॥ तें प्रीतीनें भक्षी एकनाथ ॥ ऐसी सेवा दिवस बहुत ॥ असे करीत निजप्रेमें ॥ २१ ॥ हें जनार्दन दृष्टीस देखतां ॥ मग आश्चर्य करिती निजचित्ता ॥ म्हणे मनुष्य म्हणों नये एकनाथा ॥ सकळ गुरुभक्तां वरिष्ठ कीं ॥ २२ ॥ एकांत पाहोनि एके दिवशीं ॥ जनार्दन कृपेनें पुसती तयासी ॥ तूं सेवा करिसी आम्हांपाशीं ॥ मायबापांसी न कळतां ॥ २३ ॥ तुम्हीं तों विरक्त दिसतां जाण ॥ घरीं पाहिजे वस्त्र अन्न ॥ वडील वृद्ध दोघेजण ॥ चिंता दारुण करतील कीं ॥ २४ ॥ ऐसें जाणोनि जनार्दन ॥ घरीं पाठवीत वस्त्रअन्न ॥ वडिलांसि कळतां वर्तमान ॥ समाधान वाटलें ॥ २५ ॥ जनार्दन विचारूनि अंतरीं ॥ म्हणे यासि सांगावी कांहीं चाकरी ॥ मग एकनाथासि आज्ञा करी ॥ हिशोब दप्तरीं राखावा ॥ २६ ॥ तूं तेथें असशील जरी प्रवीण ॥ तरी कळों येईल अवघें ज्ञान ॥ मग अवश्य म्हणोनि केलें नमन ॥ आज्ञा प्रमाण स्वामींची ॥ २७ ॥ गुरुसेवेसि न पडतां अंतर ॥ हिशेब राखी निरंतर ॥ जनार्दन म्हणती हा परम चतुर ॥ कळला विचार मजलागीं ॥ २८ ॥ तरी कांहीं निमित्त करून जाण ॥ स्वरूपीं लावावें त्याचें मन ॥ एकनाथासी जवळ बोलावून ॥ म्हणे हिशेब दाखवणें आम्हांसी ॥ २९ ॥ पाहोनि खर्डा खतावणी ॥ हिशेब दाखवीं आम्हांलागोनि ॥ अवश्य म्हणोनि तये क्षणीं ॥ पडती चरणीं लागले ॥ ३० ॥ सेवेच्या सा-

-रोनि नित्य नेम ॥ रात्रीं दीपकासी घातलें भरण ॥ एकनाथ आडका राहिला चुकोन ॥ तोचि धुंडोनि पहातसे ॥३१॥ तो कोठें न सांपडे तयास ॥ ताळा न पडेचि हिशोबास ॥ मग एकाग्र करोनि चित्तास ॥ हिशोब पहात बैसला ॥ ३२ ॥ क्षणभरी कांहींच न करी शयन ॥ न मानुनी निज-देहाच्या शीण ॥ तृषा लागली अति दारुण ॥ परी उदकपान करीना ॥ ३३ ॥ म्हणे उपहार करून उदकास घेतां ॥ तरी निद्रा आळस येईल आतां ॥ मग काय सांगावें गुरुनाथा ॥ विवेक चित्ता करितसे ॥ ३४ ॥ जनार्दन जागृत होऊन त्वरित ॥ सभोंवतें विलोकून जो पहात ॥ तों एकनाथ न दिसे तेथ ॥ म्हणउनी विस्मित जाहले ॥ ३५ ॥ अंतरगृहीं धुंडितांचि देखा ॥ तों हिशोब पहात बैसला एका ॥ भरण घालोनियां दीपका ॥ धुंडित आडका निश्चळत्वें ॥ ॥ ३६ ॥ तों अक-स्मात ताळा पडतां ॥ हरुष वाटला एकनाथा ॥ मग आपुल्याचि हातें टाळी पिटितां ॥ दुसरा नसतां सन्निध ॥ ३७ ॥ मागें उभें राहोनि तेथ ॥ जनार्दन कौतुक पहात ॥ मग सन्मुख होऊनि त्वरित ॥ स्वमुखें पुसती तयासी ॥ ३८ ॥ सद्गुरु म्हणती एकनाथा ॥ काय आश्चर्य वाटलें आतां ॥ म्हणउनि हर्ष मानुनी चित्ता ॥ हांसलासि तूं ये क्षणीं ॥ ३९ ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ वरतें पाहे विलोकून ॥ मग सत्वर उभा राहून ॥ केलें नमन सद्भावें ॥ ४० ॥ म्हणे सर्व हिशोब शोधून पाहातां ॥ त्यांत एक आडका चुकला होता ॥ त्याचा अकस्मात ताळा पडतां ॥ उल्हास चित्ता वाटला ॥ ४१ ॥ म्हणउनी संतोष पावोनि मनें ॥ हांसें आलें मजकारणें ॥ ऐसें ऐकोनि वचन ॥ जनार्दन विस्मित जाहला ॥ ४२ ॥ मग एकनाथासी सद्गुरु बोलत ॥ तुझें आडक्याकडे लागलें चित्त ॥ तैसें श्रीकृष्णचरणीं होत रत ॥ तरी पावसी निजहित आपुलें ॥ ४३ ॥ ऐशीं अक्षरें पडतां कानीं ॥ अनुताप जाहला तये क्षणीं ॥ म्हणे हे इच्छा होती मनीं ॥ जे आज्ञा स्वामींनीं मज द्यावी ॥ ४४ ॥ धन्य दिवस सुदिन अजिचा ॥ अनुभव जाहला निजकृपेचा ॥ ऐसें म्हणउन ते समर्थांचि ॥ घातलें पायीं दंडवत ॥ ४५ ॥ हें वचन ऐकतांचि श्रवणीं ॥

जनार्दन विस्मित झाले मनीं ॥ म्हणती यास उपदेश द्यावया लागोनी ॥ अधिकार दिसोनी येतसे ॥ ४६ ॥ मग उठवूनि एकनाथाप्रती ॥ जनार्दन कृपेनें आलिंगिती ॥ रामकृष्ण मंत्र तारक निश्चितीं ॥ सद्गुरु सांगत सेधवां ॥ ४७ ॥ तेथेंच विश्वास ठेवून दृढ ॥ परमार्थ योग साधिला पुढें ॥ कीर्तनीं श्रीहरीचे पवाडे ॥ गातसे कोडें निजप्रीति ॥ ४८ ॥ इतुकी कृपा झालियावर ॥ परि सद्गुरुसेवेसी न पडे अंतर ॥ दिवसेंदिवस अधिकोत्तर ॥ सद्भाव साचार बैसला ॥ ४९ ॥ हा निश्चय देखोनि जनार्दन ॥ म्हणे यासी मनुष्य म्हणेल कोण ॥ विश्वोद्धार करावयालागोन ॥ अवतार पूर्ण विष्णूचा ॥ ५० ॥ आतां यावरी करूनी कृपादृष्टी ॥ श्रीदत्तात्रेयाची करावी भेटी ॥ ऐसें विचारोनी पोटीं ॥ जीविंची गोष्ट सांगतसे ॥ ५१ ॥ एकनाथासि म्हणे जनार्दन ॥ तुज दत्तात्रेयाची भेटी करवीन ॥ परी निर्भय असोनियां मन ॥ चित्तीं न भिणें सर्वथा ॥ ५२ ॥ ते आपुलीं स्वरूपें कडोविकडी ॥ पालट करितं घडोघडी ॥ अज्ञान जन निंदिती रोकडी ॥ काया चोखडी तेचि धरिती ॥ ५३ ॥ मी जयासी बोलेन गोष्टी ॥ तूं त्याचे चरणीं घालीं मिठी ॥ आलिंगन देऊनि उठाउठी ॥ सद्गुरुशीं पोटीं धरावें ॥ ५४ ॥ प्रसाद देतील तुजकारणें ॥ तरी तेथेंच भक्षीं निज प्रीतीनें ॥ ऐशी जनार्दन देतां शिकवण ॥ एकनाथ चरण धरीतसे ॥५५॥ म्हणे हेचि इच्छा बहुत दिनीं ॥ वाढत असे माझिये मनीं ॥ परी स्वामींची मर्यादा उल्लंघोनी ॥ सर्वथा माझेनी न बोलवे ॥ ५६ ॥ ते आज आपल्या स्वमुखेंकरून ॥ मज दिधलें अभयवचन ॥ तें आणि मनोरथ पूर्ण करून ॥ करवावें दर्शन दत्ताचें ॥ ५७ ॥ ऐसा पूर्ण जाणोनियां हेत ॥ एकनाथासी नेलें अरण्यांत ॥ तंव तेथें अनसूयासुत ॥ आले अकस्मात भेटावया ॥ ५८ ॥ विशाळ डोळे आरक्त नयन ॥ हातीं शस्त्रें अश्ववाहन ॥ सन्निध येऊन उतरला जाण ॥ मग केलें नमन जनार्दनें ॥ ५९ ॥ यवनभाषेनें अनसूयासुत ॥ जनार्दनाशीं गोष्टी बोलत ॥ हें दृष्टीशीं देखतां एकनाथ ॥ आश्चर्य करिती मानसीं ॥ ६० ॥ मग एकनाथ बोलाउनी लवलाहीं ॥ उचलोनि स्वामीच्या घातला पायीं ॥ त्यांनीं

आश्वासन देऊनी पाहीं ॥ वरदान काय बोलत ॥ ६१ ॥ श्रुतिशास्त्राचें जें मथित ॥ व्यासें काढिलें श्रीभागवत ॥ त्याचा अर्थ सखोल गुप्त ॥ वदेल प्राकृत प्रसिद्ध हा ॥ ६२ ॥ आणीक भावार्थरामायण ॥ वदेल रसाळ निरूपण ॥ तें निज प्रीतिनें करित श्रवण ॥ तरतील जन सकळिक ॥ ६३ ॥ आणीक पदपद्यांतरें बहुत ॥ श्रीहरिचरित्र अतिअद्भुत ॥ कीर्तनीं गावोनि सप्रेमयुक्त ॥ उद्धरील पतित श्रवणमात्रें ॥ ६४ ॥ ऐसा वर देऊन सत्वर ॥ मस्तकीं ठेविला अभयकर ॥ निमिष न सोडतां साचार ॥ अदृश्य झाले तेथवां ॥ ६५ ॥ एकनाथासी धरोनि हातीं ॥ मंदिरा आले सत्वर गती ॥ एकएकासीं न विसंबिती ॥ जेविं लेंकुराप्रती निजमाय ॥ ६६ ॥ तान्हयास न पडे मातेचा विसर ॥ हें परस्परें साक्ष देतसे अंतर ॥ तेवीं एकनाथ जनार्दन निरंतर ॥ असती साचार एकचित्तें ॥ ६७ ॥ तंव कोणे एके दिवशीं ॥ जनार्दन विचारिती मानसीं ॥ आतां सेवा घेणें याजपाशीं ॥ अनुचित मज दिसताहे ॥ ६८ ॥ मग एकनाथासी बोलती वचन ॥ माझी आज्ञा तुज प्रमाण ॥ आतां प्रतिष्ठानासि जाऊन ॥ गृहस्थाश्रम चालवी ॥ ६९ ॥ हें प्रमाण वचन करितां त्वरित ॥ तुज प्रसन्न होईल रुक्मिणीकांत ॥ जनार्दनें मस्तकीं ठेविला हात ॥ प्रतिष्ठानासी त्वरित चालिला ॥ ७० ॥ सद्गुरुवचन हेंचि प्रमाण ॥ त्याहूनि वरिष्ठ नाहीं साधन ॥ हे गुरुभक्तीची जाण खूण ॥ इतरांकारणें न घडेची ॥ ७१ ॥

# १६. देवजीचा संदेश

माझ्या लहानपणची गोष्ट. आमच्या घरीं कांहीं सुतारकाम निघालें होतें. दोन तीन सुतार कामावर येत. कोणी दारें करीत तर कोणी चौकटी करीत. आम्ही लहान मुलें त्यांना मधून मधून सतावून सोडीत होतों. विटीदांडू करून देण्याबद्दल आम्ही त्यांच्या बहुतेक दररोज पाठीमागें लागत असूं. एखादे दिवशीं क्रिकेटची बॅट करून घ्यावयाची तर एखादे दिवशीं पेटी करून देण्याबद्दल हट्ट घ्यावयाचा. परंतु देवजी सुतार आमचे हे सर्व हट्ट वेळांत वेळ काढून पुरवीत असे. नित्याचें काम हातावेगळें ठेवून आम्हां मुलांच्याकरितां कांहीं खेळणीं करून देण्यांत त्यालाही आनंद वाटत असे आणि आम्हीं कितीहि त्रास दिला तरी त्याला त्याचें कांहीं वाटत नसे.

एके दिवशीं मी एक पेटी हातांत घेऊन त्याच्याकडे गेलों. ही पेटी विशेष सुबक होती; निदान माझ्या बालमनाला तरी तिचें कौशल्य आश्चर्योत्पादक होतें. धांवत धांवत मी देवजीकडे गेलों आणि ती पेटी दाखवून म्हटलें, " देवजी, तुला येईल कां रे असली पेटी करतां ?"

देवजीनें ती पेटी हातांत घेतली, तिच्याकडे क्षणभर न्याहाळून पाहिलें आणि म्हटलें, " छोटे मालकसाहेब, कां नाहीं करतां येणार ? ही कोणा तरी मनुष्यानेंच केलेली नाहीं कां ? "

देवजी ते शब्द उच्चारून गेला; आपण काय शब्द उच्चारतों आणि त्याचा परिणाम काय होणार आहे याची बिचाऱ्याला कल्पना तरी होती कां नाहीं हें सांगतां येत नाहीं. मला तरी त्या शब्दांचें महत्त्व आणि स्वारस्य त्या वेळीं कांहींच कळलें नाहीं. लहानपणीं आपण पुष्कळ गोष्टी पाहतों आणि ऐकतों, परंतु त्यावेळीं त्यांचें महत्त्व लक्षांत येत नाहीं. मोठे झाल्यावर त्या गोष्टींची स्मृति होते आणि त्यांचा यथार्थ बोध त्या वेळीं होतो. देवजीनें उच्चारलेल्या वाक्याच्या बाबतींत

अगदीं असेंच झालें. मला त्या वेळीं त्यांचें महत्त्व कळलें नाहीं. परंतु आज इतक्या वर्षांनीं त्या वाक्याचें स्मरण झालें म्हणजे त्यांत किती खोल अर्थ भरला आहे याची जाणीव होते. देवजीची आणि माझी पुनः कधींहि गांठ पडली नाहीं. देवजी सध्यां कोठें आहे ? असाच कोठें तरी कामावर असेल व कदाचित् लहान मुलांचे हट्ट पुरवीत असेल. कदाचित् त्यानें या जगाचा शेवटचा निरोपहि घेतला असेल. परंतु देवजी, तूं माझा गुरु आहेस; तूं मला संदेश दिलास ! जगांतील प्रत्येक वस्तु मनुष्यानेंच केलेली नाहीं कां ? अहाहा ! या तुझ्या वाक्यांत केवढा आत्मविश्वास भरला आहे ! ज्या ज्या वेळीं मी एखाद्या कार्याला सुरवात करतों आणि तें अशक्य असें वाटूं लागतें त्या त्या वेळीं देवजी, मला तुझें स्मरण होतें. तूं तें वाक्य माझ्या कानाशीं उच्चारीत आहेस असा मला भास होतो. तुझी ती वार्धक्यानें क्षीण झालेली परंतु मनानें तरुण असलेली मूर्ति हा आत्मप्रत्ययोत्पादक व सामर्थ्याची जाणीव करून देणारा संदेश मला देत आहे असें वाटतें. असा आत्मविश्वास तूं कितीजणांच्या ठिकाणीं निर्माण केला आहेस ? त्या सर्वांचा तूं गुरु आहेस; निदान मी तरी तुला गुरु मानतों.

आणि खरोखरीच देवजी हा माझा गुरु आहे. श्रीदत्तानें एकवीस गुरू केल्याचा दाखला पुराणांतरीं सांपडतो. पण आपणहि असेच गुरू करीत नाहीं कां ? ज्यांच्या ज्यांच्या आचरणाचा आपल्या मनावर परिणाम घडत असतो ते आपले गुरू नव्हेत कां ? सिंहाच्या छाव्याची गोष्ट प्रसिद्धच आहे. मेंढ्यांच्या कळपांत वाढल्यामुळें त्याला स्वसामर्थ्याची जाणीव झाली नाहीं. सत्य स्वरूपाची ओळख पटवून द्यावी लागते. देवजीनें ही ओळख मला पटवून दिली. तुम्ही मनुष्य आहां, मेंढरें नाहीं, तुमच्या ठिकाणीं बुद्धिसामर्थ्य आहे आणि आतांपर्यंत मनुष्यानेंच ज्या गोष्टी केल्या त्या तुम्हांला कां करतां येऊं नयेत ? आपण नुसतें भय उराशीं बाळगून बसतों; हें कार्य मला करतांच येणार नाहीं, माझ्या हातून

होणें शक्य नाहीं असाच आपण आपला ग्रह करून घेतों. आपल्या अंगांत जी अन्तर्हित शक्ति आहे तिची किंमत आपण कमी लेखतों. या शक्तीचा जास्तींत जास्त उपयोग करून घेण्यास शिकलें पाहिजे. बेकन हा तत्त्वज्ञानी म्हणतो, " धाडस करा म्हणजे सर्व गोष्टी सुकर आहेत अशी तुमची खात्री पटेल." फाजील आत्मविश्वासानें कार्याचा बिघाड होण्यापेक्षां सामर्थ्याची जाणीव नसल्यामुळेंच जगांत कितीतरी कार्यें होत नाहींत असा अनुभव आहे.

## १७. गाई घरा आल्या

गाई घरा आल्या–घण घण घंटानाद
कुणीकडे घालूं साद–गोविंदा रे.
गाई घरा आल्या–धूळ झाली चहूंकडे
घनःश्याम कोणीकडे–माझा गेला.
गाई घरा आल्या–वांसरें हंबरती
कुणीकडे बालमूर्ती–कृष्ण माझा.
गाई घरा आल्या–ब्रह्मानंद वांसरांना
काय करूं माझा तान्हा–चुकला कां ?
गाई घरा आल्या–घोटाळती पाडसाशीं
हाय ! नाहीं हृषीकेशी–माझ्यापाशीं.
गाई घरा आल्या–हुंगीतात चाटीतात
माझा मात्र यदूनाथ–दूरावला.
गाई घरा आल्या–आवरेना मूळीं पान्हा
राहणार भुका तान्हा–वासुदेव.
गाई घरा आल्या–दूध वाजे झुरूझरूं
माझ्या जीवा हुरूहुरू–मुकुंदाची.
गाई घरा आल्या–दूधवाटी राहियेली
कुणीं माझा वनमाळी–गुंतवीला.
गाई घरा आल्या–झाली बाई कातरवेळ
अजूनी कां घननीळ–ये ना घरा.
गाई घरा आल्या–लावियेली सांजवात
बाळा दामोदरा रात–झाली न कां ?
गाई घरा आल्या–पाल चूकचूक करी
राख अंबे माझा हरी–असे तेथें.

# १८. खर्ड्याची स्वारी

शिंद्यांनीं दिल्लीच्या पातशहास अंकित केलें ही गोष्ट हैद्राबादच्या मुसलमानांस रुचली नाहीं. मोंगल बादशहा व त्याच्या कुटुंबांतील माणसें यांनींच फक्त पालखी हें वाहन वापरावयाचें असे. हें वाहन वापरण्याचा मान आणि वकील मुतलखीचा किताब पूर्वीं एकदां महंमद शहा बादशहानें निजामुल्मुलूख यांस दिले होते. आतां तेच बहुमान शहाअलम बादशहाकडून सवाई रावसाहेब पेशवे यांकरितां महादजी शिंद्यांनीं मिळविले ही गोष्ट निजामअल्लीस असह्य झाली.

बारभाईच्या कारस्थानानंतर दादासाहेबांचा बंदोबस्त व टिपूचें पारिपत्य या दोन मसलतींतच नानांचीं वीस बावीस वर्षे मोडलीं. या अवधींत या मसलतींच्या पेंचामुळें त्यांना निजामास तीस लक्षांची जहागीर देऊन त्याची मर्जी वेळोवेळीं खूष ठेवावी लागली. कोणत्याही प्रसंगीं निजामाच्या सहाय्याचा नानांना विशेषसा उपयोग होऊं शकला नाहीं. तथापि त्यानें शत्रुपक्षास मिळूं नये एवढ्याकरितांच त्यांना ही तरतूद करावी लागली. निजामाची व मराठ्यांची ही दोस्ती कायमची टिकणें मात्र अशक्यप्रायच होतें. बाळाजी विश्वनाथ पेशवे यांनीं पूर्वीं बादशहाकडून दक्षिणेच्या सहा सुभ्यांच्या चौथ सरदेशमुखीच्या सनदा मिळविल्या होत्या व त्या सनदांच्या जोरावर मराठे निजामाच्या राज्यांतून या हक्कांचा वसूल आतांपर्यंत सक्तीनें घेत असत. मराठ्यांनीं मोंगलांवर हें जें खोगीर लादलें होतें तें त्यांना असह्य झालें होतें. गेल्या पाऊणशें वर्षांत मराठे व निजाम यांच्यामध्यें जे युद्धप्रसंग घडून आले त्यांच्या मुळाशीं हा चौथ सरदेशमुखीचा तंटाच होता. नारायणराव पेशव्यांच्या खुनानंतर मराठे मंडळांत यादवी माजली तिचा फायदा घेऊन निजामानें हा मराठ्यांचा वसूल तहकूब ठेवला. मराठ्यांची ही बाकी तुंबतां तुंबतां आतां तिची बेरीज तीन कोट रुपये पर्यंत वाढली होती. निजामाची मर्जी संभाळण्याची

जरूरी होती तोंपर्यंत नानांनीं त्याच्या या कारवाईकडे डोळेझांक केली, परंतु टिपूवरची मोहीम संपल्यावर पुणें दरबारास थोडीशी स्वस्थता लाभली आणि निजामानें पेशवे सरकाराची सर्व बाकी एकदम चुकती करावी अशाबद्दल नानांनीं निजामाच्या दरबारांत तगादा लावला.

दिल्ली दरबारांतलें वर्चस्व आणि चौथ सरदेशमुखीची बाकी हींच खर्ड्याच्या स्वारीचीं प्रमुख कारणें आहेत.

नाना फडणवीस ही बाकी आपणांस कधीं तरी ओकावयास भाग पाडतील हें भय निजामाच्या डोळ्यांसमोर आज बरींच वर्षें उभें होतें. इंग्रज, फ्रेंच व टिपू यांची मराठ्यांविरुद्ध मदत मिळवावी अशी निजामानें आतांपर्यंत बरीच खटपट केली, परंतु त्याच्या या खटपटीस कोठेंच यश आलें नाहीं. नाना व शिंदे यांच्या तंट्यांत आपणाला कांहीं लभ्यांश मिळेल अशीही त्याला बरीच आशा वाटत होती, परंतु या बाबतींतही त्याची निराशा झाली.

मैनुदौला ऊर्फ मशीर उल्मुल्ख नांवाचा उमराव यावेळीं निजामाचा दिवाण होता. या दिवाणाला मराठ्यांबद्दल पराकाष्ठेचा द्वेष वाटत असे. पुणें दरबारचा बाकीबद्दल तगादा बसला तेव्हां त्यानें आपल्या धन्यास बोध केला कीं, ' मराठे तीस लक्षांची जहागिरी व तीन कोट रुपये मागतात. एवढी रक्कम देऊन त्यांची मर्जी संपादन करण्यापेक्षां त्या पैशाच्या जोरावर फौज उभी करून नशिबाची परीक्षा कां पाहूं नये ? महादजी शिंदे व हरिपंत फडके यांच्या मृत्यूमुळें आतां मराठे मंडळांत कोणी कर्ता पुरुष राहिला नाहीं. एकटा नाना फडणवीस अजून जिवंत आहे, तो थोडीबहुत टुरटुर लावील, परंतु आपण या प्रसंगीं नेट धरला तर आपणाला त्याच्या नाड्या सहज आवळतां येतील. आपले सर्व प्रयत्न या प्रसंगीं एकवटून मराठ्यांचें जोखड कायमचें झुगारून देण्याची ही नामी संधि आलेली आहे. '

नानांनींही त्यांच्या पारिपत्याची तयारी तशाच मोठ्या प्रमाणावर केली. महादजी शिंदे मरण पावल्यावर त्यांची सरदारी त्यांचे दत्तक-

पुत्र दौलतराव यांस मिळाली होती. दौलतरावांनीं श्रीमंतांच्या हुकुमावरून आपले कंपू व फौज हिंदुस्तानांतून दक्षिणेंत आणविली. त्याशिवाय नागपूरकर भोसले, होळकर, पटवर्धन, रास्ते वगैरे मराठी राज्यांतले तमाम सरदार व हुजरातींतील समस्त पागे व पथके यांच्या फौजा नानांनीं या मोहिमेकरतां एकत्र केल्या. पानिपतच्या स्वारीनंतर फक्त या खड्यांच्या स्वारींतच मराठी राष्ट्राचें सर्व सैन्यबळ एकवटलें होतें. पेशवे व नाना हे स्वतः या स्वारीवर निघाले. पेशव्यांची स्वारी फौज जमा करीत पुण्याहून निघाली तिचा मुक्काम चिंचरणा नदीवर फकिराबाद धानोरें येथें येतो तों मराठी फौजेची संख्या एक लक्ष तीस हजारांवर गेली! अघाडीस शिंदे, भोसले व हुजरात अशी साठसत्तर हजार फौज चालत होती. या अघाडीच्या फौजेवर बाबा फडके हे मुख्य सरदार होते.

तिकडून निजामही सव्वालक्ष फौज बरोबर घेऊन मराठ्यांवर चालून आला. त्याच्या फौजेंतल्या एका टोळीनें जोगाबाईचें आंबें या क्षेत्राचा विध्वंस केला. लढाईच्या ऐनवेळीं निजामाचें गोविंदराव काळयांचे मार्फत सल्ल्याचें शेवटचें बोलणें झालें. त्यांत चौथाईची बाकी व तीस लक्षांची जहागीर परत देण्याविषयीं मुद्दे होते. या बोलण्यावर पेशवे व नाना फडणवीस यांनीं एकच उत्तर केलें कीं, मशीरुलमुल्ख यांस कारभारांतून काढून कैदेंत ठेवावें व आमच्या सल्ल्यानें नबाबानें कारभार करीत जावा; या दोन्ही गोष्टी नबाबास कबूल असतील तर बाकीच्या कलमांचा फडशा कसा तरी होईल. मराठ्यांच्या या दोन अटी निजामाला पटल्या नाहींत व तो मोहोरीचा घांट उतरून खड्यांच्या किल्ल्यानजीक खैरा नदीवर आला. नबाबाची स्वारी आतां परांड्याच्या रोखानें चालून जाणार असा संभव दिसतांच शिंदे व भोसले हे मोंगलांवर चालून गेले. कलागतीला आतां खरी खुरी सुरवात होणार असें पाहून श्रीमंतांनीं परशुरामभाऊंची आघाडीवर रवानगी केली आणि लढाईच्या सर्व तरतुदी त्यांच्या आज्ञेस अनुसरून व्हाव्या असा अघाडीच्या सर्व सरदारांस हुकूम पाठविला.

ता. ७ मार्च १७९५ रोजीं मराठे व मोंगल यांची थोडीशी चकमक होऊन तींत मोंगलांची सरशी झाली आणि निजामाचा मुक्काम आणखी एक कोस पुढें आला. ता. १० मार्च रोजीं खर्ड्याची मोठी लढाई झाली. त्या दिवशीं मोंगल कूच करून चालला असतां परशुराम-भाऊंनीं त्याशीं गांठ घातली. भाऊंबरोबर फडके, शिंदे, होळकर, भोसले यांच्याही फौजा व कवाइती पायदळ वगैरे सरंजाम होता. उभयपक्षीं सैन्यें युद्धास सज्ज होऊन राहिलीं असतां परशुरामभाऊ पुढें एक टेकडी होती तेथपर्यंत जाऊन टेहळणी करीत होते. इतक्यांत मोंगलाकडील सरदार भारामल व असद अल्लीखान यांनीं अकस्मात् भाऊवर चालून घेतलें. त्या ठिकाणीं मोठी लढाई होऊन भाऊंस जखमा लागल्या व पुष्कळ लोक ठार व जखमी झाले. ते मोंगल सरदार भाऊंस टेकडीपासून अर्धा कोसपर्यंत मागें सारून त्याच टेकडीवर जागा कायम करून राहिले. हें पाहातांच मोंगलांची इतर फौज व मुसा-रेमूचीं पलटणें यांनीं भाऊच्या डाव्या बाजूस शिंदे होते त्यांच्यावर चाल केली. त्यावेळीं शिंद्यांनीं तोफांचा व भोसल्यांनीं बाणांचा भडिमार मोंगलांवर मनस्वी केला. तेव्हां मोंगलाई फौज व पलटणें कूच करून मागें हटूं लागलीं. शत्रूची फौज याप्रमाणें थोडीशी विस्कळीत होतांच भाऊंनीं आपली सर्व फौज त्यावर उठविली. सरकारची चाळीस हजार तलवार उठली, तेव्हां असदअल्ली खानाच्या फौजेची दाणादाण उडाली; मागून रेमूचीं पलटणें व इतर मोंगल फौज यांचीही तीच दुर्दशा झाली. तों अस्तमान होऊन अंधार पडूं लागला, त्यामुळें मोंगलाई लष्करांत परा-काष्ठेची अव्यवस्था व तारंबळ होऊन तें लष्कर लुटलें गेलें. ती दशा पाहतांच निजाम घाबरा होऊन खर्ड्याच्या गढींत शिरला. रात्रभर त्याच्या लष्कराची एकसारखी लुटालूट होती.

मोंगलांचें लष्कर लुटलें गेल्यावर सर्व मराठी फौजा खर्ड्याच्या किल्ल्यास घेरा देऊन बसल्या तेव्हां निजाम बहुत घाबरा होऊन त्यानें नाना फडणवीसांकडे तहाची याचना केली. यानंतर थोडीशी वाटाघाट

होऊन मराठे व मोंगल यांच्यामध्यें तह ठरला; त्यांतील प्रमुख कलमें: (१) पूर्वी सदाशिवराव भाऊसाहेबांनीं उद्‌गीरच्या लढाईत मुलूख जिंकला होता त्यापैकीं पारंड्यापासून तहत तापीपर्यंतचा मुलूख गेल्या पस्तीस वर्षांत निजामास परत देण्यांत आला असेल तो सर्व त्यानें पेशव्यांस परत द्यावा. (२) गंगथडीमध्यें घासदाण्याचा भोसल्यांचा हक्क आहे; त्याबद्दल भोसल्यास निजामानें तीन लक्ष अठराहजार रुपये उत्पन्नाचा मुलूख निराळा तोडून द्यावा. भोसल्यांची वऱ्हाडच्या वांटणीपैकीं बाकी तुंबली आहे तीबद्दल निजामानें त्यांस एकूणतीस लक्ष रुपये द्यावे व पुढें वऱ्हाडांत भोसल्यांचा अंमल मामूल वहिवाटीप्रमाणें सुरळीत चालूं द्यावा. (३) चौथ सरदेशमुखीच्या बाकीबद्दल निजामानें पेशव्यास तीन कोटी रुपये द्यावे. (४) निजामानें आपला दिवाण मशीरूल्मुल्ख यास पेशव्यांचे हवालीं करावें.

शेवटच्या कलमाखेरीज निजामानें बाकीचीं सर्व कलमें कुरकुर न करितां मान्य केलीं; परंतु आपला दिवाण पेशव्यांच्या हवालीं करणें त्याच्या जिवावर आलें तेव्हां तो दिवाण आपण होऊनच पेशव्यांच्या स्वाधीन झाला. पेशव्यांनींही त्याचा आदरसत्कार करून त्यास इतमामानें नजरकैदेंत ठेविलें.

# १९. गोकुळ विसरभोळे

( कचेरीचा देखावा. साक्षीच्या पिंजऱ्यांत गोकुळ. )

**शिरस्तेदार**:— ईश्वरसाक्ष खरें बोलेन, खोटें बोलणार नाहीं.

**गोकुळ**:— ईश्वरासाक्ष खरें बोलेन, खोटें बोलणार नाहीं.

**शिरस्तेदार**:— तुमचें नांव काय ?

**गोकुळ**:— गोकुळ.

**शिरस्तेदार**:— बापाचें नांव काय ?

**गोकुळ**:— वृंदावन.

**शिरस्तेदार**:— आडनांव ?

**गोकुळ**:— विसरभोळे.

**वकील**:— बरें आतां सांगा पाहूं, तुमचें वय काय ?

**गोकुळ**:— ( स्वगत ) हं; तोच प्रश्न ! आतां काय करावयाचें ? नांवांतल्या अक्षरांना दोन्ही वकिलांनीं गुणून त्यांत न्यायाधीश मिळवावयाचा; हो असेंच; नाहीं पण, मला वाटतें अक्षरांना न्यायाधिशानें गुणून दोन वकील मिळवावयाचे असें असावें ! हं हेंच बरोबर आहे ! बारा एके बारा न् दोन चवदा. ( प्रगट ) चवदा वर्षें !

**वकील**:— चवदा वर्षें ! तुम्ही शुद्धीवर आहां का ?

**गोकुळ**:— ( स्वगत ) चुकलों; वकिलांनींच गुणावयाचें ! बारा दुणें चोवीस न् एक पंचवीस. ( प्रगट ) पंचवीस.

**वकील**:— मग पहिल्यानें चवदा कशीं सांगितलीं ?

**गोकुळ**:— मग पहिल्यानें फुकट गेलेलीं वर्षें जमेस धरलीं नव्हतीं.

**वकील**:— वः ! या हिशेबानें पहिल्यानें शून्यच उत्तर द्यायाला हवें होतें ! तुम्ही घाबरलां आहां काय ?

**गोकुळ**:— मी घाबरलों ! तो काय म्हणून ! मीं कांहीं माझ्या बायकोचा खून केला नाहीं !

**वकीलः**— तुम्ही आरोपीला ओळखतां कां ?

**गोकुळः**— तुम्ही आपल्या बंधूंना ओळखतां कां ? न्यायाधीशसाहेब या शिरस्तेदारांना ओळखतात कां ?

**वकीलः** — माझ्या प्रश्नाचें नीट उत्तर द्या. तुम्ही आरोपीला ओळखतां कां ?

**गोकुळः**— हो; त्यांना ओळखतों आणि आपल्याला पण चांगला ओळखून आहें बरें मी.

**वकीलः**— जयंताला सोडविण्यासाठीं तुम्ही एखादी खोटी शपथ घ्याल कां ?

**गोकुळः**— अलबत्, कां नाहीं ? एक सोडून हजार घेईन ! प्रत्यक्ष श्रीकृष्णांनीं सुद्धां सांगितलें.

**वकीलः**— तें राहूं द्या. हें पत्र माहीत आहे कां तुम्हांला ?

**गोकुळः** — हो ! माहीत आहे. लीलाबाईनीं जयंतांना पाठविलेलें पत्र हें !

**वकीलः** — किती वेळां पाहिलें आहे तुम्हीं हें ?

**गोकुळः**— एक वेळां.

**वकीलः**— जयंताचें बायकोशीं पटत नाहीं हें खरें आहे कीं नाहीं ?

**गोकुळः**— हें खरें आहे ! जयंत बायकोचा अत्यंत तिरस्कार करीत असत.

**वकीलः**— तुमची बायको तुम्हांला वागवून घेतां येत नाहीं हें खरें आहेना ?

**गोकुळः**— त्याच्याशीं तुम्हांला काय करावयाचें आहे ? तुम्ही आपली बायको सांभाळा—

**न्यायाधीशः**— गप्प बसा; ते विचारतात त्याचें उत्तर द्या.

**गोकुळः**— न्यायमूर्तींना माझी एक विनंति आहे. माझ्या मतें आमचीं घरगुती भांडणें न्यायासनासमोर आणण्याचें कांहीं कारण नाहीं;

असल्या प्रश्नांचीं उत्तरें आम्ही देणार नाहीं. नाहीं तर आम्ही मुळीं साक्षच द्यावयाला तयार नाहीं !

**न्यायाधीशः**— असें कसें चालेल ? साक्ष दिलीच पाहिजे. न्यायाला मदत ही प्रत्येकानें केलीच पाहिजे.

**गोकुळः**— हा चांगला न्याय आहे ! यांनीं आमच्या बायकोच्या वाटेल तशा चौकशा कराव्या आणि आम्हीं यांच्या बायकोचें नुसतें नांव काढिलें कीं आपण आम्हाला गप्प बसा म्हणून म्हणतां ! मी जरा तोंडाचा फटकळ आहें–आपण आणि हे वकील लोक नेहमीं एक ठिकाणीं कामें करितां तेव्हां आपला त्यांच्याकडे थोडासा ओढा असणें स्वाभाविक आहे. त्याला कोण गैर म्हणेल ? ( लोक हंसतात. ) हं साहेब, हंशावारी बाबत घालवूं नका. आपण न्यायाधीश आहां, असा पक्षपात आपल्याला शोभत नाहीं ! आपल्याला वकील आणि साक्षीदार सारखेच. मीही थोडाबहुत कायदा जाणतों ! चार पुस्तकं पाहिलीं !

**न्यायाधीशः**— ( हंसून ) काय वेडगळ मनुष्य आहे. ( वकिलास ) चालूं द्या तुमचे सवाल !

**वकीलः**— तुमचा स्वभाव थोडासा विसराळू आहे कीं नाहीं ?

**गोकुळः**— असेल,तुम्हांला काय त्याचें ? तुम्ही आपले प्रश्न विचारा; उत्तर मिळालें नाहीं, मग बोला ! आमच्या वकिलांनीं पढविलेले सारे जबाब सवालावांचून पाठ म्हणून घ्या हवे तर.

**वसंतः**— अरे गोकुळ मी तुला कधीं पढवून ठेवला आहे रे ?

**गोकुळः**— असें कां बरें वसंतराव ? मी नाहीं प्रतिज्ञेवर खोटें बोलावयाचा !

**वसंतः**— ( स्वगत ) चांगली सोय ! आणि हा आमच्यातर्फेचा साक्षीदार !

**वकीलः**— काय हो, हें पत्र तुम्हीं किती वेळां पाहिलें आहे ?

**गोकुळः**— काय हो, हा प्रश्न तुम्हीं किती वेळां विचारणार ?

**वकील**:— तुम्ही उत्तर द्या आधीं.

**गोकुळ**:— दोन वेळां.

**वकील**:— मघांशीं एक वेळ पाहिलें म्हणालां, आतां दोन वेळां पाहिलें म्हणतां, हें काय ?

**गोकुळ**:— मघांशीं विचारलें त्यापूर्वी एक वेळां पाहिलें होतें,आतांच्या विचारण्याला मघांशीं पाहिलें ती वेळ हिशेबीं धरिली पाहिजे ! पूर्वींची एक व मघांची एक मिळून दोन.

**वकील**:— वसंतराव, झालेल्या प्रश्नोत्तरांवरून तुमच्या साक्षीदाराची नालायकी दिसून येत आहे. या मनुष्याला व्यवहारज्ञान नाहीं, हा विसरभोळा आहे; त्याची आणखी फेरतपासणी केली तर तुमचें नुकसान होणार ! तेव्हां तुमची इच्छा असल्यास याची साक्ष काढून घेण्याची मी संधि देतों.

**वसंत**:— या संधीबद्दल मी आपला आभारी आहें. न्यायमूर्तींनीं असें करण्याचा हुकूम द्यावा.

**न्यायाधीश**:— गोकुळ, तुझ्या नालायकीमुळें तुझी साक्ष काढून टाकण्यांत येत आहे. तुला बाहेर येण्याची परवानगी आहे.

**गोकुळ**:— इतकेंही करून मी नालायक ! शाहाण्यानें कोर्टाची पायरी चढूं नये म्हणून वाडवडील म्हणत आले तें कांहीं खोटें नाहीं ! ( पिंजऱ्यांतून बाहेर येतो. )

# २०. कुबडीतीर्थ

घेऊनि एकदिवशीं शिवभूपतीस
गेले वनांत फिरण्या गुरुरामदास
जायास सांगुनि समस्त जनांस मार्गे
ते चालले हळुहळु विपिनांत दोघे १

होती तदा किति तरी रमणीय वेळा
तेजोनिधी दिनमणी गगनीं उदेला
नानापरी विकसलीं सुमनें सुरेख
यद्रूप पाहुनि वरी मन फार तोख २

पुष्पांतला मधुर सेवुनि गंध सारा
होता वहात गगनीं बहुमंद वारा
वृक्षांवरी बसुनि पक्षि समस्त होते
रम्य स्वनें करित मंजुल गायनातें ३

चाले प्रभातसमयीं गुरुशिष्य जोडी
ओढे नद्या गहन लंघित खोल खिंडी
होत्या वनीं उपलकंटकयुक्त वाटा
त्यांच्या परंतु चरणीं रुतला न कांटा ४

मार्गी शिवास शिकवी गुरु राजनीति
नाना कथा कथुनि दाखवुनी प्रतीति
ऐकूनि शब्द गुरुचे बहुदिव्य गोड
चित्तीं झणीं नृपतिच्या पडला उजेड. ५

हर्षोदधींत शिवभूपति मग्न झाला
झाला प्रवास किति तो न कळे तयाला
मार्ग क्रमीत असतां भरली दुपार
चालूनि फार थकला नृपती अखेर. ६

संताप दे वरुन दारुण अंशुमाली
धूळीमुळें चरण पोळति फार खालीं
लागे तहान नुरलें बळ चालण्याचें
कोमेजलें वदन पंकज भूपतीचें ७

‘ थांबा ’ म्हणूनि वदवे गुरुतें न त्याला
होता सुशिष्य गुरुमागुनि चाललेला
कैसा तरी हळुहळू उचली पदांतें
तों पाहिलें वळुनिया गुरुनें तयांतें ८

‘ कां रे हळूं उचलिसी, शिवबा पदांतें ?
गेलास काय दमुनी तुज काय होतें ? ’
ऐसें पुसे सदय सद्गुरु त्या शिवाला
देई परी न नृप. उत्तर तें तयाला ९

ज्यांचीं पदें स्मरुनि किंकर मुक्त झाले
ज्या वांचुनी नच चराचर विश्व चाले
त्या जाणिलें गुरुवरें नृपतिस्थितीतें
बोले सगद्गद म्हणूनि गुरू शिवातें १०

‘ वत्सा, मनीं तिळभरी नच खेद मानी
देतों तुला त्वरित निर्मळ गोड पाणी ’
ऐसें वदूनि अपुला उचलून पाणी
भूमीवरी शिवगुरु कुबडीस हाणी ११

तों वर्तलें नवल, भूमि दुभंग होई
आंतूनि निर्झर मनोहर एक येई !
आकंठ तज्जल पिऊनि नृपाल धाला
चित्तीं स्मरे गुरुचिया विमला पदांला १२

तेव्हांपासुनि झाली ती भूमी सुप्रसिद्ध या लोकीं
‘ कुबडी तीर्थ ’ सुनामें वर्णियली माधवानुजें श्लोकीं १३

# २१. पेशवाईंतील रामलक्ष्मण

पहिल्या बाजीरावाच्या यशाचा बराच मोठा वांटा त्याचा धाकटा भाऊ चिमाजी अप्पा याच्या पदरांत टाकावा लागेल. बाजीरावाहून हा सरासरी आठ दहा वर्षांनीं लहान होता. बाजीरावाला पित्याच्या शिक्षणाचा, सहवासाचा व उदाहरणाचा जितका फायदा मिळाला तितका चिमाजीस मिळाला नाहीं. कारण बाळाजीपंत मरण पावले व बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं तेव्हां त्याचें वय सरासरी १०–१२ वर्षांचें होतें. आरंभीं बाजीराव जेव्हां मोहिमांवर जाई तेव्हां हा साताऱ्यास घरीं राहून शाहूमहाराजांची पडेल ती सेवा बजावीत असे. पुरंदरे, चिटणीस व भानु या त्रिकुटाच्या शिकवणुकीनें तो लवकरच राजकारणांत वाकबगार झाला. प्रतिनिधि, अमात्य वगैरे मंडळी शाहूच्या दरबारीं बाजीरावाविरुद्ध नित्य कारस्थानें करून, त्याच्याबद्दलच्या खऱ्या खोट्या कागाळ्या महाराजांच्या कानीं प्रत्यहीं घालूं लागले, तेव्हां छोट्या चिमाजीनें आपल्या बंधूच्या गैरहजरींत त्याचें समर्थन करावें, व प्रत्येक प्रश्नास दोन बाजू असतात हें अत्यंत नम्रपणानें शाहूमहाराजांच्या नजरेस आणावें. चिमाजीचें बालवय, त्याचा सुंदर चेहरा व त्याचें नम्र लाघवी भाषण, यामुळें शाहूवर त्याची चांगली छाप पडली. चिमाजी वर्तनानें फार सुशील होता. शाहूमहाराजांच्या पायाशीं व बाजीरावाशीं त्याची अत्यंत निष्ठा होती. ब्रह्मेंद्रस्वामी हे तर शाहूचे व बाळाजीपासूनच भट घराण्याचे गुरु होते. त्यामुळें प्रत्येक लहानमोठी गोष्ट चिमाजी त्यांच्या कानावर पत्रद्वारें घालून त्यांचा आशीर्वाद घेई व त्यांचा सल्ला मागे. कार्यांत यश मिळालें म्हणजे तें गुरुमाउलीच्या पुण्यप्रतापानें व आशीर्वादानें मिळालें, अशी त्याची दृढ श्रद्धा असे. ब्रह्मेंद्रस्वामीवर असलेली त्याची भक्तिभावाची निष्ठा त्याच्या अनेक पत्रांत दिसून येते.

हा नम्र, मनमिळाऊ स्वभावाचा, सालस व सद्गुणी मुलगा तितकाच पराक्रमी होता. बापाचे व भावाचे भीमपराक्रम त्याच्या डोळ्यापुढें खेळत होते, आणि त्यांचें अनुकरण करून तलवार मारण्याची याला इच्छा झाली तर तें स्वाभाविकच ठरेल. वयाच्या पंधराव्या वर्षापासून हा स्वारीवर जाऊं लागला व एकोणीस-विसाव्या वर्षापासून तर तो सैन्याचें स्वतंत्र आधिपत्य स्वीकारून भावाप्रमाणेंच चौफेर वाऱ्यासारखा फिरूं लागला.

तो धाकटा भाऊ असल्यामुळें मर्जीप्रमाणें वाटेल तिकडे वाटेल तेव्हां जाण्याची मुभा त्याला नसे. प्रसंगीं शाहूच्या किंवा बाजीरावाच्या आज्ञेनें उत्तमपणें रंगलेली मोहीम अर्धीच टाकून त्याला दुसरीकडे जावें लागे व तिकडचीं सूत्रें हालवावीं लागत. त्यानें प्रारंभ केलेल्या कामगिरीचें यश दुसऱ्याच्या पदरांत पडे व त्याला दुसरीकडे जाऊन नवी विटी नवें राज्य करण्याचा प्रसंग येई. परंतु स्वराज्याची सेवा हेंच एकदा मनाशीं ध्येय ठरविल्यानंतर, वैयक्तिक मानापमानाचा प्रश्नच सज्जन माणसास पडत नाहीं. त्यांतल्या-त्यांत पहावयाचें झालें तर त्यानें केलेल्या मोहिमांपैकीं बऱ्याचशा दक्षिण हिंदुस्थानांतच झाल्या आहेत. निजाम, सिद्दी व पोर्तुगीज यांना चिमाजीनें चांगलाच शह लावला व मराठ्यांचें सामर्थ्य त्यांच्या प्रत्ययास आणलें. पोर्तुगीज लोकांशीं त्यानें घेतलेली झुंज त्याची चिकाटी, धिमेपणा, पराक्रम व बेडर धैर्य हे गुण दर्शविते. परंतु चिमाजीचा अति मोठा गुण म्हणजे त्याची अलौकिक बंधुप्रीति हा होय. या दोघां बंधूंच्या प्रेमाला रामलक्ष्मणाच्या किंवा रामभरताच्या प्रेमाची उपमा द्यावी लागेल. बाजीरावासाठीं कोणताही स्वार्थत्याग करावयास तो सदोदित तयार असे. बाजीरावावर शाहू व शाहूचा दरबार क्रुद्ध झाला तरी त्याचा भडिमार बिचाऱ्या चिमाजीवर होई, व त्यालाच त्यांच्या, अकारण असो किंवा सकारण असो, कोपाला तोंड द्यावें लागे. कारण बाजीराव साताऱ्याला स्थिर क्वचितच असे. तो नेहमीं उत्तरेस व तिकडील राजकारणांत

गुंतलेला असे. शिवाय त्याचा दरारा इतका वाढला होता कीं, सर्वजण त्याला भीत असत, व त्याच्या तोंडावर कोणीच ब्र काढीत नसे. कोणी अरे म्हटल्यास तो लागलीच कां रे असें ठणठणून उत्तर देत असे. त्यामुळें सातारादरबारांतील राजापासून रंकापर्यंत सर्वांचा राग वांझोटा व कुरकुऱ्या स्वरूपाचा असे, आणि चिमाजीला सर्वांना नम्रतेनें पण स्पष्ट-पणें तोंड देऊन आपल्या भावाचें समर्थन करावें लागे. बाजीरावाचा थोरला मुलगा बाळाजी बाजीराव ऊर्फ नाना हा वयांत येईपर्यंत, चिमाजीनें आपल्या भावाची बाजू शाहूच्या दरबारीं चांगली मांडली व राखली. पुढें हेंच काम नाना करूं लागला, व त्यामुळें चिमाजीला हातपाय हालविण्यास व मातबर लढाया मारण्यास मोकळीक मिळाली.

पेशव्यांच्या घरांत चिमाजीचें फार वजन असे. त्याच्या तंत्रानें सर्व चालत असत. चिमाजीचा नानाला तर फारच लळा लागला होता व तो त्याच्या आज्ञेंत असे. आपल्या बापापेक्षां तो आपल्या काकाला अधिक मान देई. पुढेंपुढें बाजीरावाचें वर्तन लोकदृष्टीनें कक्षाबाहेर गेलें, तेव्हां त्याचे इतर कुटुंबीय मंडळीबरोबर वारंवार खटके उडूं लागले. चिमाजीचें खाजगी वर्तन अत्यंत शुद्ध, अगदीं धुतल्या तांदुळा-प्रमाणें स्वच्छ होतें. त्यामुळें त्याचा सर्वांवर नैतिक दाब पडे. चिमाजी लहान भाऊ असला, तरी त्याच्या नैतिक धाकामुळेंच बाजीरावाचें वर्तन अखेरपर्यंत मर्यादेंत राहिलें. नाहींपेक्षां त्यानें काशीबाईसारख्या गरीब व साध्वी पत्नीस मुळींच जुमानलें नसतें, व तिला त्यानें कदाचित् टाकली देखील असती. मस्तानीचा संबंध चिमाजीला मुळींच रुचला नाहीं. तिच्यामुळें आपला भाऊ धर्मभ्रष्ट होत आहे व त्याचा अधःपात झाला असें त्याच्या पापभीरु व धर्मभोळ्या मनाला वाटे. परंतु त्यानें मस्तानीला शिक्षा लावली, तरी भावाचा सार्वजनिक अपमान कधींच केला नाहीं. खासगी रीतीनें केवळ चार उपदेशाच्या गोष्टी त्यानें बाजीरावास सांगून पाहिल्या. बाजीरावाचीं मुलें नेहमीं चिमाजीजवळ असत, व चिमाजीच

त्यांच्या शिक्षणाची सोय लावी. नाना तर नेहमीं त्याच्याबरोबर स्वारींत असे. कुटुंबांतील लग्नकार्यें, घरांतील भांडणें, आप्तसोयऱ्यांचा परामर्ष, तीर्थयात्रा, दानधर्म, कुळाचार, हव्यकव्य, ह्या सर्व भानगडींचा व्याप चिमाजीच्या माथीं होता. कारण बाजीराव तिकडे मुळींच लक्ष देत नसे, किंवा लक्ष देण्यास त्याला वेळ नव्हता म्हटलें तरी चालेल. बाजीरावाचा धाकटा मुलगा रघुनाथ याची मुंज व सदाशिव याचें लग्न हीं दोन कार्यें जानेवारी १७४० त झालीं, तेव्हां बाजीराव मोहिमेंत गुंतला असल्यामुळें या महत्त्वाच्या कार्यांना देखील तो घरीं येऊं शकला नाहीं. तेव्हां नानानेंच आपल्या भावाची मुंज लावली. शाहूमहाराज या प्रसंगासाठीं मुद्दाम साताऱ्याहून पुण्यास आले होते; कारण चिमाजी व नाना यांनीं त्यांचा फार लोभ संपादन केला होता. बाजीरावावर त्याच्या उद्दामपणामुळें जरी शाहूची मर्जी प्रसन्न नव्हती, तरी या चुलत्यापुतण्यांवर त्याचा फारच लोभ होता. दुसऱ्याचें मन न दुखवितां युक्तीनें आपलें काम करून घेण्याची हातोटी त्या दोघांना साधली होती.

पिता किंवा वडील बंधु अति पराक्रमी व प्रख्यात असला तर लहानांचे गुण त्यांच्या तेजांत लोपून जातात, तसाच प्रकार थोडासा चिमाजीच्या बाबतींत घडला आहे. बाजीराव अत्यंत पराक्रमी व कर्तबगार तर खराच, परंतु चिमाजी त्याच्यापेक्षां रतिभर देखील कमी नव्हता. उलट त्याची चिकाटी बाजीरावापेक्षां जबरी होती व म्हणूनच बाजीरावानें शिद्द्यावरील व पोर्तुगीज लोकांवरील मध्येंच अधांतरीं सोडलेल्या मोहिमा, त्याला यशस्वी रीतीनें पुऱ्या करतां आल्या. चिमाजी अत्यंत अल्पायुषी झाला. तो अधिक जगता तर त्याचें शौर्य, धोरण व राजकारण यांचा पुढें नानासाहेब पेशव्याला व मराठी राज्याला फार फायदा झाला असता.

तो अत्यंत धार्मिक वृत्तीचा होता. ईश्वरावर व त्याच्या खालोखाल स्वामींवर त्याची दृढ श्रद्धा होती. प्रत्येक विजय तो 'देणें ईश्वराचें' समजे. फलाशेची आशा न धरतां कार्य सतत व तेंही अंग राखून न ठेवतां,

करण्याची त्याची धडाडी पाहिली, म्हणजे गीतेचा उपदेश अंगीं भिनलेला तो कट्टा कर्मयोगी होता असें म्हणावें लागतें. बाजीरावाला लोक भीत परंतु चिमाजीवर ते प्रेम करीत, यांतील रहस्य त्याच्या धार्मिक वृत्तींत सांठविलें आहे. त्या काळीं साधुसंतांवर श्रद्धा ठेवून चालणारा व प्रत्येक गोष्टीचे यश त्यांच्या चरणीं मनोभावें वाहणारा पुरुष लोकप्रिय व्हावा यांत नवल नव्हतें.

## २२. प्रसन्नता

मनुष्यास भूषणावह होणाऱ्या इतर कोणत्याहि गुणांपेक्षां अंतःकरणाची सुप्रसन्नता हा गुण अधिक फलदायी आहे. प्रसन्नतेच्या योगानें शिक्षकास अधिक लोकप्रियता संपादन करतां येते, व्यापाऱ्यास अधिक गिऱ्हाइकें मिळवून अधिक माल विकतां येतो, मोलकऱ्यास विशेष नासधूस न करतां अधिक काम करतां येतें. प्रसन्नतेंत नानाप्रकारच्या कार्यसाधनांची मोठी विलक्षण शक्ति आहे. खिन्नता ही केवळ कार्यनाशक आहे. प्रसन्नता उत्पादक आहे व खिन्नता उच्छेदक आहे.

प्रसन्नतेंत मोठें मनोहरत्वही आहे. तिच्या योगानें मनुष्याच्या कामकाजांत आश्चर्यकारक साहाय्य मिळून, त्याच्या शारीरिक आणि मानसिक शक्तींचा उत्तरोत्तर विकास होत जातो. तिच्या योगानें आपला स्नेहसंबंध वाढतो व तिच्या योगानें आपल्या लोकप्रियतेस अप्रतिम मदत होते.

जसें समाजांत तसेंच कार्यालयांत; आवडता मनुष्य म्हणजे तो प्रसन्नचित्त असावयाचाच. खिन्न किंवा रागीट माणसांच्या जीवनबलाचा जितका लवकर क्षय होतो, तितका लवकर तो सुप्रसन्न मनुष्याच्या जीवनबलाचा होत नाहीं. प्रसन्नतेच्या योगानें मनुष्याच्या शरीररूपी यंत्रास फारच थोडी इजा पोहोंचूं शकते. प्रसन्नता ही मनुष्याच्या शरीररूपी यंत्रास तेलरूप आहे. जसें जसें हें तेल अधिक वापरावें, तसें तसें त्याच्या चलनवलनांत अधिक सुलभता प्राप्त होते. सदासर्वदा प्रसन्नचित्त असण्याच्या संवयीसारखी सौख्यजनक व समाधानकारक दुसरी कोणतीहि संवय नाहीं. प्रसन्नताशस्त्रानें सज्ज असलेल्या मनुष्यावर दुःखशोकादि विकारांचा फारसा परिणाम होऊं शकत नसल्यानें, प्रगतीची इच्छा करणाऱ्या प्रत्येक मनुष्यानें आरंभापासूनच प्रसन्नचित्त असण्याची संवय केली पाहिजे.

जरा कांहीं बिघडलें कीं, आपल्या मनाचा समतोलपणा घालविणारे पुष्कळ लोक आपल्या पाहण्यांत येतात. कोणत्याहि स्थितींत मनाची

शांतता ठेवून आपल्या कामाकडे लक्ष देण्याचें—नव्हे—तें काम उत्तम रीतीनें पार पाडण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं नसतें. सर्व कांहीं सुरळीत चाललें असतांना, व कोणत्याहि प्रकारचा त्रास नसतांना, काम करणें कोणासहि शक्य आहे, परंतु खऱ्या यशस्वी मनुष्यानें कोणत्याहि त्रासांत व कसल्याहि अडचणींत प्रसन्नांतःकरणानेंच काम करावयास शिकलें पाहिजे. सामर्थ्यवानांची मोठी खूण हीच आहे. ज्या मनुष्यास, आपणांस त्रास देणाऱ्या निराशा, दुःख, कष्ट इत्यादि गोष्टींवर विजय मिळवितां येत नाहीं, प्रतिकूल परिस्थिति अनुकूल करून घेणें व संकटसमयीं धैर्य राखणें साधत नाहीं, तो सामान्य कोटींतील मनुष्य होय व त्याची कोणत्याही प्रकारची प्रगति न झाल्यास आश्चर्य नाहीं.

खऱ्या सभ्य स्त्रीपुरुषांस आपलें दुःख, आपला शोक, आपलें दारिद्र्य व आपला नाश वगैरे सर्व कांहीं मुकाट्यानें सहन करावें लागतें. आपली दैना कोणापुढें बोलून दाखविणें त्यांना मरणप्राय वाटतें. यामुळेंच त्यांच्या चरित्रास उज्ज्वलता प्राप्त होते व यामुळेंच लोक त्यांस वंदनीय समजतात. दुर्दैवानें, दुःखानें, नाशानें, आजारानें किंवा इतर कोणत्याहि कारणामुळें तुम्ही गांजून गेलां असल्यास हीं सर्व दुःखें गिळून टाका. यामुळें तर तुमच्यावर प्रेम करणारीं माणसें अधिक प्रीति करूं लागतील व तुमचें कौतुक करतील. परंतु तुम्हांस जर आपल्या दुःखसमूहावर शौर्यानें विजय मिळवितां आला नाहीं, तर त्या योगानें तुमचें आचरण बिघडतें, तुमच्या मुखास कुरूपता येते व तुमच्या सर्वस्वाची हानि होते.

मित्रहो! बहुतकरून कोणत्या प्रकारची मुद्रा धारण करण्याची तुम्हांस संवय आहे बरें ? तुमची मुद्रा दुःखी व कष्टी किंवा उद्विग्न असते काय ? अथवा ती कपटी, मत्सरी, अनुपकारी किंवा रागीट तर दिसत नाहीं ना ? अथवा तुमच्या मुद्रेवरून आधाशीपणाचा तर बोध होत नाहीं ? आपल्या धन्याकडे तुम्हीं निराशेच्या किंवा उदासीन मुद्रेनें जात असतां ? कां सुप्रसन्न व शुद्धांतःकरणाचें द्योतक असें हास्य तुमच्या मुखावर दिसत असतें ? तुमच्या सान्निध्याचा लोक तिरस्कार करितात किंवा तुमचें

सान्निध्य त्यांस आनंददायक व सौख्यजनक वाटतें ? परिणाम कोणताहि असेना; तो केवळ तुम्हीं धारण करणाऱ्या मुद्रेचा आहे.

आपलें वर्तन चांगलें असावें, सोबत्यांनीं आपलें कौतुक करावें, समाजाचें आपणावर प्रेम असावें व सर्वांनीं आपणांस चांगलें म्हणावें असें प्रत्येकास वाटतें. परंतु अशी लोकप्रियता संपादन करण्यास लागणारे परिश्रम घेण्यास मात्र फारच थोडीं माणसें तयार असतात; किंबहुना आपल्या वर्तनानें आपण आपली अप्रियताच जास्त वाढवीत असतों म्हटलें तरी चालेल. पुष्कळ लोकांस सहज रीतीनें देखील सभ्यता दाखवितां येत नाहीं. त्यांना पडलेला रुमाल किंवा लेखणी उचलून देणें, पोस्टांत पत्र टाकणें, हाकेस ओ देणें, किंवा दरवाजा उघडणें, अथवा इकडची वस्तु तिकडे ठेवणें कमीपणाचें वाटतें. प्रगतीस अत्यंत अवश्य अशी सदा सर्वकाळ इतरांच्या उपयोगीं पडण्याची तत्परता व अंतःकरणाची सुप्रसन्नता कोणीकडे व आपली अप्रियता वाढविणारी ही तिरसटपणाची आत्मघातकी वागणूक कोणीकडे !

नेहमीं हंसरें तोंड असणारा एक मनुष्य आमच्या पाहण्यांत आहे. मनांतून तो कितीहि रागावलेला असेना परंतु दुसऱ्यास कांहीं त्याच्या तोंडावरून तसें सांगतां येणार नाहीं. अंतःकरणांत विचारांचें काहूर माजेना, परंतु मुद्रेंत पहावें तों त्याचें तें सौख्यप्रद हास्य ठेवलेलेंच. त्याच्या ओंठांवरील एक कोंपरा, जणूं काय समजलेली एकादी नवीन बातमी कळविण्याविषयीं नेहमीं स्फुरण पावत असतो. पुष्कळ लोकांस त्याच्या यशःप्राप्तीचें आश्चर्य वाटतें व त्याच्या शिक्षणाकडे व सामर्थ्याकडे पाहिलें असतां त्याची प्रगति खरोखरच आश्चर्यकारक आहे. परंतु या सर्वांस मुख्य कारण त्यास कधींहि न विसंबणारें त्याचें मनोहर हास्य होय. त्याच्यायोगानें त्याची लोकप्रियता वाढली व त्याच्या उद्योगाची एकसारखी सरशी होत गेली.

अंतःकरणास नेहमीं प्रसन्न ठेवण्याच्या प्रयत्नामुळें दुःखक्लेशादि समयीं तुमच्या प्रसन्नांतःकरणाचें जगास आश्चर्य वाटेल. सर्वत्र तुम्हांस

अनुकूलता दिसूं लागेल. शत्रु मित्रभावानें वागूं लागतील, प्रियजनांस तुमचा विरह दुःसह वाटूं लागेल, निर्दयतेंत सदयता आणि कठिणतेंत मृदुता उत्पन्न होईल, आणि तुमच्या प्रगतीच्या मार्गांतील सर्व प्रकारच्या अडचणी दूर होऊन ती सुगम, सुखकर व सुसाध्य होईल.

सौंदर्याची व मोहकतेची उणीव इतर कोणत्याहि गोष्टीनें भरून येणार नाहीं व त्या केवळ परमेश्वराच्या देणग्या आहेत हें आम्हांस कबूल आहे; परंतु प्रसन्नतेनें सौंदर्याची वृद्धि होते व खिन्नतेनें कुरूपता वाढते; खिन्नतेनें सौंदर्याची माती होते व प्रसन्नतेनें कुरूपता नाहींशी होते हें केव्हांहि विसरतां कामा नये.

निराशेच्या ऐवजीं आशा उत्पन्न करीत, उच्छेद करण्याऐवजीं उत्तेजन देत व आपणाशीं संबंध घडणाऱ्या यःकश्चित् मनुष्यापासून तों थोरापर्यंत सर्वांस आपल्या सुप्रसन्नतेच्या किरणांचा लाभ देत जीवन व्यतीत करणें किती कल्याणकारक आहे बरें! एखाद्या मुलाकडून वर्तमानपत्र विकत घेत असतां, बाजारांत सामानाची खरेदी करीत असतां, चांभाराकडून जोडा शिववून घेत असतां, किंवा गाडीवाल्यास त्याचें भाडें देत असतां, पैशा-बरोबरच तुमच्या सदय व प्रसन्नांतःकरणाचें द्योतक असें हास्य तुमच्या मुखावर दिसत असल्यास, त्यांत तुमचें कांहीं बिघडतें असें नाहीं. उलट-पक्षीं कित्येक मोठ्या दिसणाऱ्या गोष्टींपेक्षां असल्या क्षुल्लक गोष्टीनेंच आपणांस विशेष फायदा होतो. जीवनाचा हा फारच अल्पव्यय आहे. तो पूर्ण व खुशाल करा. जितका अधिक करावा तितकी संपन्नता जास्त.

आपल्या आयुष्यांत तुम्ही वाटेल तें मिळवा, कितीहि श्रीमंत व्हा, परंतु जर प्रसन्नतेचें माधुर्य तुमच्या अंगीं नसेल, तर त्याचा कांहीं उपयोग नाहीं व तुमचें जीवन व्यर्थ आहे. तुमच्या अंगीकृत कार्यांत यशःप्राप्ति होवो किंवा न होवो, तुम्हांस पैसे मिळोत किंवा तुमचे पैसे जावोत, कोणत्याहि स्थितींत आनंदी, उपयोगी, उत्साही व प्रसन्नचित्त असण्याचा निश्चय करा. लोकांस तुमच्या पैसे मिळविण्याची किंवा चाल-

विण्याची पर्वा नाहीं. कारण ती गोष्ट केवळ तुमच्या स्वतःपुरती आहे, परंतु त्यांना तुमच्या प्रसन्नतेची व कनवाळूपणाची आवश्यकता मात्र खास आहे.

असें म्हणतात कीं, कै. नामदार गोपाळ कृष्ण गोखले यांच्या यशाचें खरें रहस्य, त्यांच्या लोकप्रियतेचें खरें मोहनास्त्र, त्यांच्या मुखावर नेहमीं विलसणाऱ्या मधुर हास्यांत होतें. इतिहासप्रसिद्ध कित्येक थोर पुरुषांस आलेला थोरपणा त्यांच्या संपत्तीमुळें न येतां तो त्यांच्या थोर वर्तनामुळें, त्यांच्या विचारस्थैर्यामुळें व त्यांच्या स्वभावमाधुर्यामुळें आला आहे. क्रोध, भय, चिंता, उद्विग्नता, खिन्नता इत्यादि दोष मनुष्याच्या लोकप्रियतेस आणि प्रगतीस विघातक आहेत आणि विनय, नम्रता, सभ्यता, सरलता आणि सुप्रसन्नता इत्यादि सद्गुण, त्याच्या प्रगतीस सहाय्यक म्हणून अवश्य आहेत.

सर्व आयुष्य निराशेनें, चिंतेनें, नाशानें व दुःखानें पीडित झालें असतांहि अतिशय आनंदी, परोपकारी व नेहमीं प्रसन्नचित्त असणारा एक गृहस्थ आमच्या पाहण्यांत आहे. त्याच्या जीवनांत त्यास नानाप्रकारचीं संकटें आलीं आहेत, अनेक प्रसंगीं अपयश येऊन, त्यास अनेक व्याधि सहन कराव्या लागल्या आहेत. परंतु आपल्या आनंदी स्वभावास व अंतःकरणाच्या प्रसन्नतेस त्यानें कधींहि सोडलें नाहीं. हल्लीं तो गृहस्थ वृद्ध असून ममतेचें असें त्याच्याजवळ कोणीहि नाहीं. त्याची संपत्ति गेली, संतति गेली, घरदार गेलें, सर्व कांहीं लयास गेलें, परंतु त्याच्या स्वभावाचें औदार्य व अंतःकरणाची सुप्रसन्नता मात्र मुळींच गेली नाहीं. तो कोणापाशीं साहाय्य मागत नाहीं इतकेंच नव्हे, तर आपल्या दुर्दैवाची कथाहि कोणाजवळ सांगत नाहीं. कारण आरंभापासून प्रसन्नतेचें व सहनशीलतेचें महत्त्व त्यास पूर्णपणें समजलें आहे.

हें जगत् केवळ आरशाप्रमाणें आहे. त्यांत ज्या प्रकारचें बिंब आपण उत्पन्न करावें त्याच प्रकारचें प्रतिबिंब आपणास पहावयास मिळतें. ज्या प्रकारचा ध्वनि आपण या जगांत उत्पन्न करावा त्याच प्रकारचा प्रतिध्वनि आपणास ऐकावयास मिळतो. येथें जितकें द्यावें तितकें घ्यावें व जसें करावें तसें भरावें हा नियम आहे. दुःख करावें, दुःखी व्हावें; आनंद मानावा, आनंदी व्हावें.

## २३. घड्याळ

गडबड घाई जगांत चाले।
   आळस डुलक्या देतो पण;
गंभीरपणें घड्याळ बोले
   ' आला क्षण–गेला क्षण ! ' ॥

घड्याळास या नाहीं घाई
   वीसांवाहि तो नाहीं; ॥
त्याचें म्हणणें ध्यानीं घेई
   ' आला क्षण–गेला क्षण ! ' ॥

कर्तव्या जे तत्पर त्यांचें
   दृढ नियमित व्हावयास मन ॥
घड्याळ बोले अपुल्या वाचें
   ' आला क्षण–गेला क्षण ! ' ॥

कर्तव्याला विमुख आळशी
   त्यांच्या हृदयीं हाणित घण ।
काळ–ऐक–गातो अपुल्याशीं
   ' आला क्षण–गेला क्षण ! '

वार्धक्य जर सौख्यांत जावया
   व्हावें, पश्चात्ताप नुरुनिया ॥
रे तरुणा रे, मला वाटतें
   ध्यानीं संतत आपुल्या आण
घड्याळ जें हें अविरत वदतें
   ' आला क्षण–गेला क्षण ! ' ॥

# २४. चपला राक्षसी

पुढें कांहीं दिवसानंतर तो फिरस्ता पुन्हा हणमंतरावाच्या घरीं आला. तेव्हां त्यानें त्याचें आदरातिथ्य करून त्यास आपले घरीं एक दिवस ठेवून घेतलें. जेवणखाण झाल्यावर हणमंतरावाचीं मुलें त्याच्या सभोंवतीं जमलीं. दामू म्हणाला, "मागें आपण तीन राक्षसांची गोष्ट सांगितली होती, तशीच आणखी एकादी गमतीची गोष्ट सांगितल्यास आम्ही आपले फार आभारी होऊं."

जनी– काय हो बुवा त्या बेटांत सगळे राक्षसच होते? त्यांस बायकामुलें कांहीं नव्हतीं काय?

फिरस्ता– होतीं तर!

जनी– मग तुम्हीं तर सगळ्या पुरुषांच्याच गोष्टी सांगितल्या, बायकांची एकहि सांगितली नाहीं. बायकांपैकीं एकादीची गोष्ट सांगा.

फिरस्ता– तुम्हांस अशा प्रकारच्या गोष्टी ऐकण्याची गोडी लागली हें पाहून मला फार समाधान वाटतें. जगांत प्रतिक्षणीं नवे नवे शोध लागत आहेत, ते समजून घेण्याचा मुलांनीं अवश्य प्रयत्न करावा. असो. आज तुमच्या इच्छेप्रमाणें तुम्हांस एक मौजेची गोष्ट सांगतों.

सिंहलद्वीपांत तीन राक्षस सांपडल्यामुळें तेथील लोकांची फार भरभराट झाली, व ते लोक व्यापाराच्या उद्देशानें गलबतांत बसून लांबलांबच्या सफरी करूं लागले, हें मीं तुम्हांस मागें सांगितलेंच आहे. प्रत्येक सफरींत ते निरनिराळ्या प्रदेशाचे शोध लावीत. एकदां फार दूर अंतरावर 'सुवर्णभूमि' म्हणून एक अतिसंपन्न देश असल्याचें त्यांच्या समजण्यांत आलें. त्याचा शोध लावावा अशी त्यांस मोठी उत्कंठा लागली. परंतु रस्ता बिनमाहितीचा असल्यामुळें कोणीही खलाशी तिकडे जाण्याचें धाडस करीना. शेवटीं कृष्णा कोळी म्हणून एक धाडशी खलाशी होता. तो बरोबर चार गलबतें घेऊन त्या

देशाच्या शोधास निघाला; परंतु रस्ता चुकून तो एका ओसाड बेटाच्या किनाऱ्यास येऊन लागला. तें बेट विस्तीर्ण असून त्यांतील जमीन फार सुपीक होती, त्यामुळें त्याच्या मनांत असें आलें कीं, सिंहलद्वीपांतील लोक इकडे आणून येथें वसाहत केल्यास आपला फार फायदा होईल. पुढें कांहीं दिवसांनीं ते लोक त्या बेटांत जाऊन राहिले व तेथें उत्तरोत्तर त्यांची भरभराट होत चालली.

बजी— अहो बुवा, तुमचें हें चऱ्हाट कधीं संपावयाचें ? मला तर यांत कांहींच मौज वाटत नाहीं.

दामू— बजे, तुला मुकाट्यानें ऐकावयाचें असेल तर ऐक. नाहींतर एथून चालती हो. वडील माणसाशीं असें उद्दामपणाचें भाषण कधीं करीत जाऊं नकोस, समजलीस ?

फिरस्ता— बजे, तुला मौज वाटेल असें आतां सांगतों बरें. त्या बेटांतील जमीन विस्तृत असून तिची लागवड करणारे लोक थोडे असल्यामुळें पुष्कळ जमीन पड राहूं लागली. सिंहलद्वीपांतल्यासारखे राक्षस येथें असते तर ही जमीन कधीं पड राहिली नसती असें ते लोक म्हणूं लागले. भोजू नांवाचा एक मोठा कल्पक मनुष्य होता. त्याच्या मनांत असा विचार आला कीं, या विस्तीर्ण बेटांत शोध केल्यास आणखी कांहीं राक्षस मिळतील. तो मग दररोज रानांत जाऊन राक्षसाचा शोध करूं लागला. एके दिवशीं तो एका टेंकडीवर जाऊन बसला होता, संध्याकाळची वेळ होती, वारा सोसाट्याचा सुटला होता, आकाशांत अभ्रांची गर्दी झाली होती, सूर्यबिंब झांकून गेल्यामुळें जमिनीवर अंधार पसरत चालला होता. हा सर्व चमत्कार पहाण्यांत भोजू गुंग झाला असतां, आकाशांत लकन उजेड पडून मोठा गडगडाट झाला. उजेड कशाचा पडला म्हणून भोजू वर पाहूं लागला, तों एक अत्यंत तेजःपुंज स्त्री आकाशांत विलक्षण वेगानें इतस्ततः संचार करीत असलेली त्याच्या दृष्टीस पडली. तिचें तेज इतकें प्रखर होतें कीं, तिजकडे

पाहतांच भोजूचे डोळे दिपून गेले. तिचे केश तापून लाल झालेल्या चांदीच्या तारांप्रमाणें असून आकाशांत अस्ताव्यस्त पसरले होते. तिच्या एका हातांत तांबड्या रंगाचें व दुसऱ्या हातांत पांढऱ्या रंगाचें आयुध होतें. हीं दोन्हीं आयुधें ती रागाच्या भरांत जेव्हां एकमेकांवर आपटी, तेव्हां त्यांपासून आगीचा प्रचंड लोळ निघून त्याच्या तेजानें सर्व दिशा व्यापून जात. बजे, ही कोण असावी हें तुला समजलें ना ?

बजी— ही एक भयंकर राक्षसी असावी असें वाटतें.

फिरस्ता— होय. ही एक राक्षसीच होती. भोजूच्या मनांत तिची ओळख करून घ्यावी असें आलें. पण हें घडावें कसें ? तिचा सारा संचार आकाशांत, तिच्यापुढें उभें राहण्याची कोणाची छाती होणार ? परंतु भोजू हा जात्या धीट व युक्तिमान् असल्यामुळें त्यानें तिची भेट घेण्याची निराळीच युक्ति काढिली. त्यानें एक रेशमी पतंग तयार करून त्यावर तिला समाधान वाटेल असा एक लेख लिहिला. व शेवटीं तिच्या भेटीची इच्छा प्रदर्शित केली. ती जेव्हां आकाशांत दृष्टीस पडली, तेव्हां त्यानें तो पतंग तिजकडे उडविला. त्यावरील लेख वाचून तिला फार संतोष वाटला व सौम्य स्वरूप धारण करून ती भोजूच्या पुढें तात्काळ येऊन उभी राहिली. तिची भेट घेण्याविषयीं आपण काढिलेली युक्ति शेवटास गेली हें पाहून भोजूस आधींच फार आनंद झाला होता, तशांत तिचें तें सौम्य स्वरूप पाहून त्याच्या मनास एक प्रकारचा हुरूप आला. मग हलुहलू तो तिच्याशीं संभाषण करूं लागला. त्यानें तिला नानाविध प्रश्न केले. व तिनेंहि शांतपणानें त्यांचीं उत्तरें दिलीं. ती म्हणाली 'माझें नांव चपला. मी आकाशांत राहतें. कारण कीं, भूतलावरील सारा मंदपणाचा व्यवहार मला आवडत नाहीं. भूतलावरील कोणाही प्राण्याची माझ्या इतकी शक्ति नाहीं व माझ्या इतकी अर्थात् गतिहि नाहीं. डोळ्यांचें पातें लवतें न लवतें इतक्यांत मी तुमच्या भूगोलाभोंवतीं सात प्रदक्षिणा करून येईन. आकाशांत माझा संताप झाला म्हणजे मी

कधींकधीं भूतलावर येतें; पण येथें माझें सांत्वन करील असा एकही प्राणी अद्यापर्यंत मला आढळला नाहीं. उलट तेथें माझा संताप अधिकच वाढून त्याच्या भरांत मजकडून मोठाले अनर्थ घडले आहेत. आज तुला पाहून मात्र मला समाधान वाटलें. हें तिचें भाषण ऐकून भोजूस मोठी उमेद आली; व हिजकडून कोणतें काम करून घ्यावें या विचारांत तो क्षणभर निमग्न झाला. इतक्यांत चपला त्यास म्हणाली, ' तुला माझी कांहीं मदत लागल्यास तूं खुशाल मागत जा. कोणत्याही प्रकारची भीति किंवा शंका मनांत आणूं नकोस. '

भोजू— असें झाल्यास तुझा आम्हांवर मोठा उपकार होईल. पण तूं कोणकोणतीं कामें करण्यास तयार आहेस तें आधीं मला सांग.

चपला— दूर अंतरावर अत्यंत त्वरेनें बातमी नेण्याआणण्याचें काम मी करीन. मात्र जेथें बातमी पोंचवावयाची तें ठिकाण समजण्यासाठीं तुझ्या घरापासून तेथपर्यंत प्रथम एक तार बांधून ठेव म्हणजे झालें. पुढें मला तारेचीही गरज लागणार नाहीं.

भोजूनें याप्रमाणें केल्यावर चपला राक्षसी बातमी नेण्याआणण्याचें काम फार झपाट्यानें करूं लागली. त्या बेटांतले लोक भोजूस कांहीं कांहीं जिन्नस देऊन चपलेच्या द्वारें लांबलांबची खबर आणवूं लागले. याप्रमाणें चाललें असतां भोजू थोड्याच दिवसांत चांगला संपन्न झाला.

जनी— चपलेस कांहीं मुलें होतीं काय ?

फिरस्ता— होय. तिला चुंबक नांवाचीं दोन जुळीं मुलें होतीं. त्यांपैकीं एका मुलास ती कधींही विसंबत नसे. त्यास दृढ आलिंगन देऊन त्याच्या सभोंवतीं ती नेहमीं घिरट्या घाली. त्या मुलासहि तिचा इतका लळा असे कीं, ती अंमळ दूर गेली कीं, त्याच्या नाड्या थंड पडून त्याची हालचाल अगदीं बंद पडे. दुसरा मुलगा मात्र तिला सोडून वाटेल तिकडे फिरे; तो बहुधा समुद्रावर राही व दर्यावर्दी लोक रस्ता चुकले तर त्यांस तो नीट रस्ता दाखवी. तो लाडका मुलगा देखील बातमी पोंचवण्याच्या कामांत

आईस फार मदत करी. पुढें कांहीं दिवसांनंतर चपला गाड्या ओढूं लागली व त्या कामांतहि त्या लाडक्या मुलाचें तीस मोठें साह्य झालें.

याप्रमाणें चपला व तिचीं दोन मुलें त्या बेटांत काम करूं लागल्यामुळें तेथील लोकांचा फार फायदा झाला. चपलेचा स्वभाव आतां पहिल्यापेक्षां फार सौम्य झाला. त्यामुळें पुष्कळ लोक तिला भेटूं लागले. त्यांत देहू नांवाचा एक मनुष्य होता. त्याची व चपलेची भोजूप्रमाणेंच फार सलगी झाली. त्याचें कांहीं तरी काम करावें असा विचार मनांत आणून तिनें रात्रीं शहरांत दिवे लावण्याचें काम पतकरिलें व तें काम ती इतकें जलद करी कीं, सर्व दिवे एकदम लागतात असा पाहणारास भास होई. त्या दिव्याचा प्रकाश चंद्राच्या प्रभेपेक्षांही अत्यंत आल्हादकारक वाटे. चपलेचें हें अलौकिक काम पाहून जो तो आश्चर्य पावून तिच्या भेटीस जाई व कांहीं तरी नवीन काम करण्याविषयीं तिची प्रार्थना करी. त्यावरून तांब्याच्या व पितळेच्या भांड्यांस सोन्याचा, चांदीचा मुलामा देणें, उन्हाळ्यांत गार वारा घालण्याकरितां पंखा हलविणें, इत्यादि अनेक कामें करून ती लोकांस फार सुख देऊं लागली.

असो; ही विलक्षण राक्षसी त्या बेटांतल्या लोकांस सांपडल्यापासून त्यांची फार भरभराट होत चालली व हल्लीं तर सर्व जगांतल्या लोकांपेक्षां ते सुखी आहेत. तुम्हांलाहि तसेंच सुख मिळो. संपली बरें गोष्ट. जने, कशी काय गोष्ट आहे ? मजेची आहेना ?

जनी— खरेंच बुवा गोष्ट तर चांगली आहे. मला हिचें तात्पर्यसुद्धां समजलें. ही विजेची गोष्ट आहे. चपला म्हणजे वीजच नव्हे कायरे दादा ?

दामू— होय. तूं म्हणतेस तें बरोबर आहे.

बजी— दादा, नकाशांत सुवर्णभूमि हा देश कोठेंच काढलेला दिसत नाहीं.

दामू— अगे, हिंदुस्थानला पूर्वी 'सुवर्णभूमि' म्हणत असत; त्यावेळीं हिंदुस्थान हा मोठा संपन्न देश होता. तो शोधून काढण्याकरितां युरोपांतील निरनिराळया देशांतून निरनिराळे लोक निघाले. त्यांपैकीं किस्तोफर कोलंबस या नांवाचा एक धाडशी खलाशी निघाला त्यासच बुवांनीं 'कृष्णा कोळी' म्हटलें आहे.

बजी— खरेंच रे दादा मग तो वाट चुकून ओसाड बेटास गेला म्हणून यांनीं सांगितलें तें बेट म्हणजे अमेरिकाच नव्हे काय ?

दामू— होय.

बजी— भोजूला चपला येऊन भेटली म्हणून सांगितलें, तो भोजू कोण ? त्याची गोष्ट मला माहीत नाहीं.

जनी— अगे, तो भोजू म्हणजे बेंजामिन. त्यानें रेशमाचा पतंग उडवून वीज खालीं आणिली, हें तूं परवांच वाचलें नाहीं काय ?

बजी— हो, हो. आतां माझ्या ध्यानांत आलें.

दामू— जने, तिच्या हातांत दोन आयुधें होतीं तीं कोणतीं हें तुला समजलें का ?

जनी— होय दादा. परवां आपण विजेची मांडण पाहिली तींत एकीकडे तांब्याचा व दुसरीकडे जस्ताचा असे दोन पत्रे घातले होते. हींच तिचीं तीं दोन आयुधें असावीं.

दामू— होय, तुला समजलें खरें. बरें तिचीं दोन जुळीं मुलें कोणतीं तें सांगा पाहूं.

जनी— चुंबक या नांवावरून त्याचा लोहचुंबकाशीं संबंध असावा. पण तो कसा तें मला बरोबर समजलें नाहीं.

दामू— त्या मांडणींतील पत्र्यांवरून दोन तारा एकमेकींस जोडून त्यांतून विजेचा प्रवाह कसा सुरू होतो, हें तूं पाहिलेंच आहेस. लोखंडा-सभोंवतीं त्या तारा गुंडाळून त्यांतून विजेचा प्रवाह चालू केला

म्हणजे त्या लोखंडाचे अंगीं लोहचुंबकाचे धर्म येतात. तो प्रवाह बंद पडला कीं, तें पूर्ववत् लोखंड होतें.

जनी— म्हणूनच त्यास लाडका मुलगा असें म्हटलें व आई त्याला सोडून दूर गेली कीं, नाडच्या थंड होतात, हें म्हणणें खरेंच आहे.

दामू— तारायंत्राच्या कामांत याच धर्माचा उपयोग झाला आहे. मी तुला प्रयोग करून दाखवीन. दुसरा मुलगा म्हणजे होकायंत्र. त्यांत असलेली लोहचुंबकाची सुई उत्तर–दक्षिण दिशा दाखविते हें तूं पाहिलेंच आहेस व त्यावरून दिशा समजून घेण्याच्या कामांत दर्यावर्दी लोकांस त्या यंत्राचा फारच उपयोग होतो, हेंहि तुला ठाऊक आहे. त्या सुईवर देखील विजेचा परिणाम होतो, हेंहि तुला प्रयोग करून दाखवीन.

## २५. रामाच्या बाललीला

धरूनियां रूपचतुष्टयाप्रती ।
लीलामनुष्याकृति तो रमापती ॥
भूभारनाशार्थ करूनियां पण ।
जाला जगत्पाळक बाळ आपण ॥ १ ॥

पीतां स्तनातें क्षणमात्र राहणें ।
महादरें मातृमुखासि पाहणें ॥
वक्त्रांत तें दुग्ध तसेंचि वाहणें ।
तेणेंचि फूत्कार करूनि नाहणें ॥ २ ॥

मुखांतुनी दुग्ध गळे सुनिर्मळ ।
उरावरी ये अति शुभ्र वोगळ ॥
मंदाकिनीचा गगनीं प्रवाह तो ।
चंद्रप्रभापांडुर काय वाहतो ॥ ३ ॥

बैसोनि हर्षें जननीचिया कडे ।
विलोकुनी तन्मुखनीरजाकडे ॥
स्मितामृतापूरित बोल बोबडे ।
बोले तदा ब्रह्मसुख स्वयें दडे ॥ ४ ॥

अत्यंत शुद्ध स्फटिकालयांतरीं ।
क्रीडा करी राम जधीं परोपरी ॥
नानासुतप्राप्तिसुखासि माउली ।
विलोकुनी तत्प्रतिबिंब पावली ॥ ५ ॥

पित्यापुढें रत्नविराजि कंकणें ।
करें नमस्कार करूनि ठाकणें ॥
धात्र्युक्त सारें निजवृत्त सांगणें ।
अशा गुणें तो करि नाक ठेंगणें ॥ ६ ॥

भूपापरी सर्वहि तो सभाजन ।
याचें करी नित्यसुखें सभाजन ॥
विलोकितां मर्त्यकृतावतारक ।
न लोचनीं हालति पक्ष्मतारक ॥ ७ ॥

आला चतुर्वर्ग नृपालयीं स्वयें ।
चतुःकुमारात्ममिषेंचि निश्चयें ॥
तुळा नसे भूपतिच्या सुखाप्रती ।
स्तवी सदा यास मुखें दिवस्पती ॥ ८ ॥

रामासवें लक्ष्मण सर्वदा वसे ।
शत्रुघ्न तोही भरताश्रयीं असे ॥
पूर्वी विभागक्रम जाहले जसे ।
द्वंद्वें सुखें वर्तति बंधु ते तसे ॥ ९ ॥

छाया तनूची तनुला न सोडी ।
त्या बंधुची एक तशीच जोडी ॥
परस्परीं त्यासि अपार गोडी ।
त्या मित्रभावा उपमाचि थोडी ॥ १० ॥

## २६. अशोक

बिंदुसार ख्रि. पू. २७२ वे वर्षी मरण पावला व त्याचा मुलगा अशोक हा त्याच्या गादीवर आला. परंतु राज्यारोहणविधि पुढें तीन वर्षांनीं झाला. बिंदुसाराच्या हयातींत अशोक हा वायव्यप्रांताचा प्रतिनिधि होता. त्यानंतर पुढें बिंदुसाराच्या मरणापूर्वी तो कांहीं दिवस पश्चिम हिंदुस्थानचा प्रतिनिधि झाला होता. त्याच्या लायकीवरून व कर्तबगारी-वरून बिंदुसारानें त्यास युवराज केलें होतें. वायव्यप्रांताची राजधानी तक्षशिला होती. हें शहर सांप्रतच्या हसन अबदाल व रावळपिंडी ह्या दोन शहरांच्या जवळ होतें. मध्य रशियांतून हिंदुस्थानांत शिरण्याचा जो राजरस्ता आहे त्याच्या तोंडाशींच असल्याकारणानें तें फार महत्त्वाचें ठाणें होतें. परंतु त्याचें विशेष महत्त्व हें होतें कीं, तें विद्या शिकण्याचें एक प्रसिद्ध पीठ होतें. राजेरजवाडे, ब्राह्मण व वैश्य यांचीं मुलें अभ्यासाकरितां तेथें येत असत. त्याच्या आसपासचा प्रांत सुपीक व भरभराटीच्या स्थितींत होता. त्याप्रमाणेंच पश्चिम हिंदुस्थानची राज-धानी उज्जयिनी, हेंहि शहर विद्येविषयीं नामांकित होतें. अशोक राजाला याप्रमाणें विद्या शिकण्याचीं अपूर्व साधनें मिळालीं होतीं. त्याच्या चाळीस वर्षांच्या कारकीर्दींत फक्त एकच लढाई झाली. ती ख्रि.पू. २६१ या सालांत कलिंग देशाच्या राजाशीं झाली. हा कलिंग देश बंगालच्या किनाऱ्यावर महानदीपासून गोदावरी नदीपर्यंत होता. त्या राजाजवळ साठ हजार पायदळ, एक हजार घोडेस्वार व सातशें लढाऊ हत्ती इतकें सैन्य होतें. लढाई इतकी निकराची झाली कीं, त्यांत एक लक्ष लोक प्राणास मुकले, दीड लक्ष लोक कैदी केले व लक्षावधि लोक लढाईपासून उद्भवणाऱ्या, सांथीचे रोग, उपासमार वगैरे कारणांनीं मृत्युमुखीं पडले. ह्या लढाईंत दृष्टीस पडलेल्या हालअपेष्टांमुळें अशोक राजास फार वाईट वाटलें. ही सर्व दैना होण्यास आपण कारण झालों, ही गोष्ट त्याच्या मनाला फार लागून राहिली.



अशोकाच्या स्तंभाचें शिखर

पूर्ववयांत अशोक शिवभक्त होता. त्यावेळीं राजवाड्यांतील लोकां-करितां हजारों प्राण्यांचा दररोज वध होत होता. पुढें त्याच्यावर बौद्ध-मतांचा परिणाम जास्त झाला, तेव्हां फक्त दोन मोर व एक हरिण एवढे मात्र मारण्यांत येत असत. शेवटीं ख्रि. पू. २५७ सालीं हाहि वध बंद झाला. पूर्वीच्या राजांचा जो शिकारीचा एक मोठा समारंभ होत असे तोहि अशो-कानें ख्रि. पू. २५९ वे वर्षी बंद केला होता. ख्रि. पू. २४३ सालीं पशुवधाच्या संबंधानें त्यानें सक्त नियम केले. वर्षांतून ठराविक ५६ दिवस पशुवध अजिबात बंद केला. बाकीच्या दिवशीं ज्या लोकांना खाण्याकरतां मांसाची जरूरी आहे अशा लोकांना पशुवध करण्याची परवानगी ठेवली, परंतु त्यासंबंधानें कांहीं कडक नियम ठेवण्यांत आले होते.

परधर्माविषयीं दरएक मनुष्यानें सहानुभूतीचें वर्तन ठेवावें अशाबद्दल बाराव्या शासनांत त्यानें जाहीर केलें होतें.

दानधर्म करणें हें पुण्याचें काम आहे, परंतु सर्वांत श्रेष्ठ दान म्हणजे धर्मदीक्षा हें आहे, अशी अकराव्या शासनांत राजाज्ञा आहे. तंत्र व कर्म हीं जरी उपयोगी असलीं तरी दासांस व हाताखालच्या लोकांस मायेनें वागविणें, गुरुजनांस मान देणें, आतिथि--अभ्यागतास भिक्षा घालणें व भूतमात्रावर दया करणें हें जास्त श्रेयस्कर आहे, असें नवव्या शासनांत जाहीर केलें आहे.

ह्या सर्व शासनांची अंमलबजावणी करण्याकरितां खास अधिकारी नेमले होते, व इतर अधिकाऱ्यांना सुद्धां लोकांच्या सभा करून ह्या आज्ञांची समज देण्याकरितां हुकूम होते.

अशोकानंतर राजा हर्ष, कुमारपाल व काश्मीरचे राजे हे त्या आज्ञा अमलांत आणण्याकरितां यत्न करीत होते, असें बील व बुल्हर यांच्या लेखांवरून समजतें.

अशोकाचें दानधर्माचें एक स्वतंत्र खातें होतें. सातव्या स्तंभावरील लेखांत अशोकानें खालीलप्रमाणें लिहिलें आहे.

" मनुष्याला व जनावराला छाया मिळण्याकरितां वडांचीं झाडें लावलीं आहेत; आंब्याच्या राया लावल्या आहेत; प्रत्येक अर्ध कोसावर विहिरी खोदल्या आहेत; धर्मशाळा बांधल्या आहेत; व मनुष्यांच्या आणि जनावरांच्या सुखाकरितां मधून मधून तलाव व पाट केले आहेत."

लोकांना धर्माचा उपदेश करण्याकरितां दक्षिण हिंदुस्थान, सिलोन, सीरिया, इजिप्त, सायरिनी, मॅसिडोनिया व इपायरस ह्या प्रांतांत त्यानें उपदेशक पाठविले. बौद्धधर्माचे उपदेशाचे क्षेत्रांत तिबेटांतील कांबोज लोक, हिमालयांत राहणारे दुसरे लोक, काबुलाजवळील गांधार व यवन लोक, विंध्याद्रींत व पूर्व किनाऱ्यावरील पर्वतांत राहणारे भोज, पुलिंद वगैरे लोक, तसेंच कृष्णा व गोदावरी नद्यांचे दरम्यानचे आंध्र लोक यांचा समावेश झाला. पुष्कळ दूरदूरच्या ठिकाणीं त्यानें मठ बांधले. त्याचा धाकटा भाऊ महेंद्र यानें तंजावर प्रांतांत जो मठ बांधला त्याच्या खुणा पुढें नऊशें वर्षांनीं दिसल्या, असें बीलचें म्हणणें आहे. पुढ ह्याच महेंद्राला आणखी चार शिष्य बरोबर देऊन राजानें सीलोनला पाठविलें. तेथील राजा टिसा यानें व त्याच्या दरबारच्या लोकांनीं बौद्ध धर्म स्वीकारला, व लवकरच त्या धर्माचा प्रसार इतर लोकांत झाला. महेंद्र मरेपावेतों तेथेंच राहिला. तेथें त्याची साधु म्हणून प्रसिद्धि झाली व त्याच्या शरीराची रक्षा मिहिंतले येथील स्तूपांत ठेविली आहे.

बौद्ध धर्माची स्थापना गौतमबुद्धानें केली खरी, परंतु त्याच्या वेळेस त्या धर्माचा प्रसार संकुचित प्रदेशांत मात्र झाला. त्याची मर्यादा गया, प्रयाग व हिमालयापर्यंत होती. त्याचा चोहींकडे प्रसार अशोकानें केला, व त्याच्या वेळेपासून तो धर्म जगताच्या बऱ्याच मोठ्या भागाचा धर्म झाला. ज्या कांहीं थोड्या महात्म्यांच्या कृतीचा परिणाम जगताच्या रहाटीला वेगळें वळण लावण्याइतका झाला त्या महात्म्यांच्या कोटींत अशोकाची गणना केली पाहिजे.

अशोकाइतका काम करणारा राजा क्वचितच आढळेल. तरी तो नेहमीं म्हणे कीं, माझ्या हातून व्हावें तितकें काम होत नाहीं याबद्दल मला फार वाईट वाटतें. जगताच्या कल्याणाकरितां इतकें काम मला केलेंच पाहिजे.

त्याचा मुख्य गुण म्हणजे त्याची खरी निष्ठा. हिंदुस्थान देश नीतिमान कसा होईल या गोष्टीकडे त्याचें मुख्य लक्ष होतें. त्याचें मुख्य ध्येय हेंच होतें. परंतु त्याचें म्हणणें असें होतें कीं, राजा मार्ग दाखवूं शकेल, पण मोक्ष मिळविणें हें प्रत्येक व्यक्तीचें काम आहे. रूपनाथ येथील आज्ञेंत तो म्हणतो, "लहानांनीं व मोठ्यांनीं मेहनत केली पाहिजे. फळ मोठ्यांनाच मिळतें असें नाहीं. लहान मनुष्य कर्म करील तर त्यासही मोक्ष मिळेल."

ह्याप्रमाणें अशोक राजा केवळ हिंदुस्थानांतील नव्हे, तर सर्व पृथ्वीवरील पुण्यश्लोक राजांपैकीं एक राजा होऊन गेला, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

अशोकाला दोन बायका होत्या. पैकीं चारुवाकी नांवाच्या स्त्रीला तीवर नांवाचा मुलगा होता. तो अशोकाच्या पूर्वींच मरण पावला असावा. अशोकानंतर त्याचा नातू दशरथ हा त्याच्या गादीवर बसला ( ख्रि. पू. २३१ ). अशोकाचीं मुलें व नातू यांच्यासंबंधानें नानाप्रकारच्या आख्यायिका आहेत. त्याची बहुत विश्वासूक अशी राणी असंधिमित्रा नांवाची होती. तिचे मरणानंतर अशोकानें एका तरुण व स्वैर वर्तनाच्या स्त्रीशीं लग्न केलें. तिचें नांव तिष्यरक्षिता असें होतें; कुणाल नांवाचा त्याचा मुलगा होता व संप्रति व दशरथ नांवाचे नातू होते, अशाहि आख्यायिका आहेत; परंतु यासंबंधानें खात्रीलायक असें कांहींच सांगतां येत नाहीं.

## २७. स्फुट अभंग

१

पुण्य परउपकार पाप ते पीडा । आणीक नाहीं जोडा दुजा यासी ॥१॥
सत्य तोचि धर्म असत्य तें कर्म । आणीक हें वर्म नाहीं दुजें ॥ २ ॥
गति तेचि मुखीं नामाचें स्मरण । अधोगति जाण विन्मुखता ॥ ३ ॥
संतांचा हा संग तोचि स्वर्गवास । नरक तो उदास अनर्गळा ॥ ४ ॥
तुका म्हणे उघडें आहे हित घात । जयाचें उचित करा तैसे ॥ ५ ॥

२

अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ । त्याचे गळां माळ असो नसो ॥ १ ॥
आत्मा-अनुभवीं चोखाळल्या वाटा । त्याचे माथां जटा असो नसो ॥२॥
परद्रव्या अंध निंदेसी जो मुका । तोचि संत देखा तुका म्हणे ॥ ३ ॥

३

आंधळ्यासि जन अवघेंचि आंधळे । आपणासि डोळे दृष्टी नाहीं ॥ १ ॥
रोग्यासी विषतुल्य लागो हें मिष्टान्न । तोंडासी कारण चवी नाहीं ॥ २ ॥
तुका म्हणे शुद्ध नाहीं जो आपण । तया त्रिभुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

४

धन्य तेचि प्राणी क्षमा ज्यांचे अंगीं । न भंगे प्रसंगीं धैर्यबळ ॥ १ ॥
न म्हणे कोणासी उत्तम वाईट । महत्त्व वरिष्ठ नसे जेथें ॥ २ ॥
अंतरीं सबाह्य सारिखे निर्मळ । हृदय कोमळ गंगारूप ॥ ३ ॥
तुका म्हणे काया कुरवंडी तयां । ठेवीन मी पायां मस्तक हें ॥ ४ ॥

५

सर्वाभूतीं द्यावें अन्न । द्रव्य पात्र विचारोन ॥
उपतिष्ठे कारण । तेथें बीज पेरिजे ॥ १ ॥
पुण्य करितां होय पाप । दुग्ध पाजोनि पोशिला साप ॥
करोनि अघोर जप । दुःख विकत घेतलें ॥ २ ॥

भूमी पाहतां नाहीं वेगळी । माळ बरड एक काळी ॥
उत्तम निराळी । मध्यम कनिष्ठ ॥ ३ ॥
म्हणोनि विवेकें । कांहीं करणें निकें ॥
तुका म्हणे फिकें । रुची नेदी मिष्टान्न ॥ ४ ॥

६

सोनियांचें ताट क्षीरीनें भरिलें । भक्षायाला दिलें श्वानालागीं ॥ १ ॥
मुक्ताफलहार खरासि घातला । कस्तुरी सुकराला चोजविली ॥ २ ॥
वेद्परायण बधिरा सांगे ज्ञान । तयाची ते खुण काय जाणे ॥ ३ ॥
तुका म्हणे ज्याचें तोचि एक जाणे । भक्तीचें महिमान साधु जाणे ॥ ४ ॥

७

मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
मेले जित असो निजोनियां जागे । जो जो जें जें मागें तें तें देऊं ॥ २ ॥
मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रूहूनि ॥ ३ ॥
अमृत तें काय गोड आम्हापुढें । विष तें बापुडें कडू किती ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । ज्याचें पुरें कोड त्याचेपरी ॥ ५ ॥

८

शुद्धबीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं ॥ १ ॥
मुखीं अमृताची वाणी । देह देवाचे कारणीं ॥ २ ॥
सर्वांगीं निर्मळ । चित्त जैसें गंगाजळ ॥ ३ ॥
तुका म्हणे जाती । ताप दर्शनें विश्रांती ॥ ४ ॥

९

लहानपण देगा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥ १ ॥
ऐरावत रत्न थोर । त्यासी अंकुशाचा मार ॥ २ ॥
ज्याचे अंगीं मोठेपण । तया यातना कठीण ॥ ३ ॥
तुका म्हणे जाण । व्हावें लहानाहूनि लहान ॥ ४ ॥

## २८. म्हातारपणाचे फायदे

या विलक्षण जगांत प्रथमदर्शनीं त्याज्य वाटणाऱ्या प्रत्येक वस्तूंत विचारांतीं कांहींना कांहीं तरी ग्राह्यांश सांपडतोच. कडूजहर औषधापासून मोठमोठे रोग नाहींसे होतात; अति घाणेरड्या पदार्थांपासून खत तयार होतें; लाखों रुपयांच्या मालमत्तेची व हजारों माणसांची आहुति घेणाऱ्या आगीपासून हवा शुद्ध होते; फार काय, पण श्रम व मरण या ज्या सर्वांत मोठ्या आपत्ति गणिल्या आहेत त्यांपासूनहि संसारांतील दुःखांचा लय हा एक मोठा फायदा होतो.

उलटपक्षीं, अशी एकहि मोहक वस्तु सांपडणार नाहीं कीं जिच्यांत एकहि उणीव नाहीं. कीर्तिमान् पुरुषांच्या जिवास स्वप्नांतहि स्वस्थता ठाऊक नसते; श्रीमंत मनुष्यास द्रव्यरक्षणाची नेहमीं काळजी असते; आणि शक्तिमान् पुरुषांच्या हातून अनेक अन्यायाचीं कामें होतात.

सुखदुःखाची वांटणी याप्रमाणें निःपक्षपातबुद्धीनें केली असल्यामुळें कोणासहि कुरकुर करण्यास फारशी जागा रहात नाहीं. अठरा विश्वे दारिद्र्य अनुभवणारास मध्यान्हींची भ्रांत असली, तरी अग्निमांद्याचें भय बाळगण्याची जरूर नसते; लंगड्यास धावण्याच्या शर्यतींत अडखळून पडण्याची फिकीर करण्याचें कारण नसतें; अंधळा सुरूपदर्शनास जसा कायमचा मुकला असतो, तसा अद्वितीय कुरूपपणापासूनहि त्याच्या डोळ्यांस त्रास होण्याचा संभव नसतो; आणि बहिरा ज्याप्रमाणें सुस्वर आलापांस, त्याप्रमाणें बेसूर गाण्यासहि पारखाच असतो; निर्धनास सुख नसतें, व धनवानास झोंप नसते. एकूण सुखाची झोंप दोघांपैकीं एकाच्याहि नशीबीं नसते.

असें असतां जगांत सौंदर्य, तारुण्य, सामर्थ्य इत्यादिकांची नेहमीं वाहवा होत असून कुरूपपणा, वृद्धत्व, दौर्बल्य इत्यादि गुणांची इतकी उपेक्षा कां व्हावी ? यांचें वर्णन करण्याला एकहि भाट पुढें सरसावूं नये काय ? याचें माझ्या मतें एकच कारण आहे. कवि लोक बहुधा कुरूप,

वृद्ध व दुर्बल असल्यामुळें स्वतःच्या अंगीं वसणाऱ्या गुणांची थोरवी गाण्यापेक्षां इतरांच्या गुणांची अवास्तव स्तुति करण्याकडेच, नैसर्गिक विनयाच्या योगानें त्यांची प्रवृत्ति दिसून येते.

माझ्या ओळखीचा एक दीडशें वर्षांचा म्हातारा भिक्षुक नुक्ताच मरण पावला. त्याचें नांव बचंभट असून त्याचा जन्म नानासाहेब पेशव्यांच्या अमदानींत पुणें मुक्कामीं झाला. थोरल्या माधवरावसाहेबांच्या मुंजींत हा त्यांच्या पंक्तीस मुंज्या होता. पानिपतच्या लढाईनंतर रणांगणीं पतन पावलेल्या वीरांचीं जीं अनेक श्राद्धें झालीं, त्यांच्या भोजनप्रसंगीं याचे हात ओले झाले होते. माधवरावांची पत्नी सती गेली तेव्हां तिला आशीर्वाद देण्यास हा सरसावला होता. पुढें नारायणरावांच्या वधामुळें राघोबादादांस झालेल्या पातकाचें क्षालन करण्याला ज्या भटांचें पादतीर्थ कारण झालें, त्यांत हा प्रमुख होता. यानंतर दुसऱ्या बाजीरावांनीं पुण्यास वेढा पडला असतांना तोफांमधून निघणाऱ्या अग्निमय गोळयांचें शमन करण्याकरितां जीं लाडवांच्या गोळयांचीं संतर्पणें चालविलीं होतीं, त्यांत यानें आडवा हात मारला होता. इंग्रजांनीं पुण्यांत प्रवेश केल्यावर त्यांचा विटाळ होऊं नये म्हणून ज्या भिक्षुकांनीं श्रीमंतांबरोबर ब्रह्मावर्तास कूच केलें, त्यांतहि हा सामील होता. सत्तावन सालच्या बंडानंतर जे हजारों और्ध्वदेहिक विधि झाले, त्यांत बरीच दक्षिणा संपादन करून आपली जन्मभूमि पाहण्याच्या इराद्यानें बचंभट पुन्हां पुण्यास परत आला. तेथें पुनर्विवाहाविरुद्ध जी प्रथम चळवळ झाली, तिच्यांत त्यानें पुढाकार घेतला होता. परंतु कालगतीबरोबर वहातां-वहातां पुढें त्याचें मत इतकें बदललें कीं, कोणी एखादा इतिहासप्रिय बाप आपली गतभर्तृका मुलगी या ऐसिहासिक पुरुषास अर्पण करण्यास कबूल झाला असता, तर बचंभटाची तीन पायांवर ( अलीकडे त्याला काठी लागत असे ) तयारी असती. त्याच्या डोक्यावरील केंसांत तर फारच क्रांति झाली होती. ज्या डोक्यावर शंभर वर्षांपूर्वी गाईच्या

खुरास लाजविण्यासारखी चिमुकली शेंडी असे, त्या डोक्यावर गाईचें सबंध खिल्लार मावेल इतकी गर्द छाया झाली. पण ज्या मनुष्याचे वांट्यास नाना फडणवीस व माधवराव रानडे या उभयतांशीं गप्पागोष्टी करावयाचें भाग्य आलें होतें, त्याला हा डोक्यांतील फरक क्षम्य होता.

बारशास व बाराव्यास जेवण्याची सारखी तयारी असणाऱ्या या भिक्षुकाचें हव्यकव्यापलीकडे जर किंचित् लक्ष्य असतें, तर आज मितीस किती तरी वादग्रस्त ऐतिहासिक गोष्टींचा उलगडा झाला असता ! पण त्याचें तिकडे लक्ष्य नसे; इतकेंच नाहीं, तर त्याच्या इतिहासविषयक समजुतींत बराच घोंटाळा होता. पुरंदरचा तह पुरंदऱ्यांनीं घडवून आणला; खडर्याचे लढाईत रक्तापेक्षां शाईच अधिक वाहिली; सुमेरसिंग हा फत्तेसिंग गायकवाडाचा पुत्र व रणजितसिंगाचा नातू होता; ( सांबर-सिंगाशीं संबंध न जोडण्याचें कारण केवळ सत्यप्रीति ! ) थोरले शिवाजी महाराजांनीं कोल्हापुर येथें निराळी गादी स्थापण्याचें कारण साताऱ्च्या रस्त्यांना चढउतार असल्यामुळें त्यांना गुडघी रोग झाला होता; नाना-साहेब पेशवे इतके समंजस असत कीं, सत्तावन सालचे बंडाचा इतिहास जर त्यांचे एक वेळ दृष्टीस पडता तर त्यांनीं त्या बंडाचें निशाण कधीं उभारिलें नसतें; अशी मनास चटका लावणारी माहिती अनेकदां त्याच्या तोंडांतून लीलेनें निघे. ही माहिती खोडण्याचें धैर्यहि आम्हांला बहुधा होत नसे. कारण, आमच्या आक्षेपांवर ‘ चक्षुर्वै सत्यं ’ हा त्याचा जबाब ठरलेला असे.

यमराजास विस्मृति पाडलेल्या या भिक्षुकानें इतकीं वर्षें जगांत घालवून एक गोष्ट निःसंशयपणें पैदा केली होती; ती गोष्ट म्हातारपण ही होय. इतक्या पूर्ण स्वरूपाचें म्हातारपण पृथ्वीच्या पाठीवर दुसरे कोठेंहि नसेल. स्वतःचा समानोदक पहाण्याचें भाग्य आज मितीस दुसऱ्या कोणाचेंहि नसावें; तें या भिक्षुकांच्या वांट्याला आलें होतें; परंतु असें असूनहि तो नेहमीं चिंताक्रांत असे. याचें कारण त्याच्या अंगच्या दिवसेंदिवस वाढ-

णाऱ्या गुणाचें म्हणजे वृद्धपणाचें वर्णन कोणींहि करितांना त्यानें ऐकिलें नव्हतें. विश्वासराव, थोरले माधवराव इत्यादि अल्पायुषी पुरुषांचें नांव अजरामर व्हावें, व आपणासारख्या अजरामर पुरुषाचें नांव अल्पायुषी असावें, याबद्दल त्याला सारखा खेद होत असे. या काळजीनें त्याची कंबर अगदीं वांकून गेली, चेहरा फिकट होऊन त्यावर सुरकुत्या दिसूं लागल्या, व शेवटीं या काळजींतच त्याचा अंत झाला. त्याच्या आत्म्यास थोडें तरी समाधान व्हावें, म्हणून हा लेख लिहित आहें; व हा त्याच्या वर्षश्राद्धास प्रसिद्ध करण्याचा इरादा आहे.

म्हातारपणाचा पहिला मोठा फायदा म्हटला म्हणजे त्यामुळें दांत कधींहि घांसावे लागत नाहींत, आणि राखुंडीचा व दंतमंजनाचा खर्च वांचतो. राखुंडीच्या पायीं तरुणांकडून हजारों गोंवऱ्या अग्नयेस्वाहा करण्यांत येतात, व दंतमंजनाच्या हजारों बाटल्या फस्त होतात; पण म्हातारा कनवाळूपणानें गोंवऱ्यांच्या मुळींच वाटेस जात नाहीं. हें ऋण गोंवऱ्याहि शेवटीं फेडतातच. दुसरा फायदा असा कीं, म्हातारपणीं दाढा मुळींच दुखत नाहींत व दांतांतूनहि रक्त येत नाहीं; व यामुळें औषधाप्रीत्यर्थ होणारा खर्च वांचतो. एखादें वेळीं ठेंच लागून पडल्यास म्हाताऱ्यास दांत पडण्याची मुळींच भीति नसते. शिवाय, म्हाताऱ्यावर 'दांत कोरून पोट भरण्याचा' कोणी आरोप ठेवीत नाहीं, किंवा याच्यापाशीं 'दांतावर मारण्यास एक पैसाहि नाहीं,' असा दारिद्र्याचाहि आळ त्याजवर येत नाहीं. दुसऱ्यावर 'दांत ठेवण्याचा' किंवा 'दांतीं तृण धरून शरण जाण्याचा' संशयहि याच्याबद्दल कोणी घेत नाहीं. त्यानें कोणाची कितीहि आगळिक केली, तरी त्याला 'बत्तिशी रंगविण्याची' धमकी त्याच्याकडून मिळत नाहीं. त्यानें कोणाचाहि उपहास केला, तरी त्याला 'दांत कां विचकतोस' असें म्हणण्याची त्याची छाती होत नाहीं. तसेंच त्यानें सांगितलेली गप्प केवळ 'दंतकथा' आहे, असें कोणास त्याच्या तोंडावर सांगतां येत नाहीं; व त्याचे गाल बसलेले असल्यामुळें ती 'कपोलकल्पित' आहे असेंहि म्हणवत नाहीं.

म्हातारपणाचा आणखी एक असा फायदा आहे कीं, ठेंगण्या दारां-तून जातांना त्याच्या कपाळास कधींहि टेंगूळ येत नाहीं, व जमिनी-वरचा पदार्थ उचलतांना त्याला कधींहि मुद्दाम वांकावें लागत नाहीं. तसेंच कधीं राग आल्यास कपाळाला मुद्दाम आठ्या आणावयास नको, व कोणाची वहावा करितांना मान मुद्दाम हलविण्याची तसदी घ्यावयास नको. डोक्यास टक्कल पडल्यामुळें हजामतीचा खर्च वांचतो, तो निराळाच !

म्हाताऱ्याचे सांधे धरल्यामुळें त्याला घरांतून बाहेर पडतां येत नाहीं, व यामुळें रस्त्यानें जाणाऱ्या गाड्यांखालीं चेंगरून जाण्याची भीति नसते. त्याला धड झोंप येत नाहीं, यामुळें तो चोरीबद्दल निर्भय असतो. अंगांत रक्त नसल्यामुळें ढेंकूण त्याच्या वाटेस जात नाहींत, व बाहेर निघालेल्या नाकाच्या व हनुवटीच्या बुजगावण्याला भिऊन चिलटेंहि त्याच्या तोंडा-भोंवतीं घिरट्या घालीत नाहींत.

एका एकडोळ्या मनुष्यानें एका दोन डोळ्यांच्या माणसास म्हटलें: “तुला फक्त माझा एकच डोळा दिसतो, पण मला तुझे दोन दिसतात; अर्थात् तुझ्यापेक्षां मी अधिक डोळस आहें !” याच न्यायानें म्हाताऱ्यालाहि तरुणास अनेक प्रकारें हिणवितां येईल कीं, “बाबारे, तुला तुझ्यासमोर फक्त हाडांचा सांपळा व तोंडाचें बोळकें दिसत आहे; पण मला बांधेसूद व मांसल शरीर आणि सुंदर व तेजस्वी चेहरा पहा-ण्यास मिळत आहे. तेव्हां तुझ्यापेक्षां मीच दैववान् नाहीं काय ?”

डोळ्यांस अंधत्व व कानांस बधिरत्व आल्यामुळें व त्यांत विस्मृतीची भर पडल्यामुळें म्हताऱ्याला किती तरी फायदे होतात ! म्हातारा निर्धन असल्यास त्याला त्याचा धनको, व तो सधन असल्यास त्याचा गरीब नातलग, वाटेंत भेटल्यास त्याला त्यानें ओळखिलें, किंवा त्याची मागणी त्याला ऐकूं आली, असें क्वचित्च घडतें. रिणको किंवा श्रीमंत नातेवाइकासंबंधानें मात्र हा नियम खात्रीनें लागूं पडेल, असें नाहीं.

मुलाकरितां वधू पहाण्यास आलेला म्हातारा बाप तिला पाहिल्याबरोबर आपल्या येण्याचा हेतुहि विसरून तिला सनाथ करितांना एखादे वेळीं आढळून येतो ! म्हातारपणाची विस्मरणशक्ति एवढी जबर असते ! म्हातारपणींच्या विस्मृतीमुळें पुष्कळदां आदले दिवशीं वाचलेली गोष्ट म्हाताऱ्यांच्या दुसरे दिवशीं लक्ष्यांत रहात नाहीं; त्यामुळें तेंच तें पुस्तक त्याला दर खेपेस तितकेंच मनोरंजक वाटूं लागतें, व या रीतीनें नवीं नवीं पुस्तकें घेण्याचा उपद्व्याप व खर्च वांचतो. एका म्हाताऱ्याला एक वर्षभर एकच गोष्ट रोज रोज त्याच त्या शब्दांनीं सांगतांना मीं पाहिलें आहे. नित्यपठणामुळें ती गोष्ट त्याला लवकरच तोंडपाठ झाली; परंतु ती शिळी असून आपण पूर्वी कधीं सांगितली आहे, ही गोष्ट मात्र त्याला कधीं आठवत नसे. पुष्कळ वेळां म्हातारे प्रतिवर्षी आपलें तेंच तेंच वय सांगतांना दिसतात. याचें कारणहि मधील लोटलेल्या काळाची त्यांना विस्मृति पडते हें असावें. अशा वृद्धांचें प्रत्यक्ष कालास जसें विस्मरण पडतें तसें कालाचें त्यांना पडल्यास नवल कोणतें ?

म्हातारपणामुळें नीतीवर जो संस्कार होतो, तो लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. म्हाताऱ्याच्या अंगीं ताठा असलेला किंवा काठीचा उपयोग त्यानें दुसऱ्याला मारण्याच्या कामीं केलेला अजून माझ्या ऐकिवांत नाहीं. म्हातारा दुसऱ्याला चावतांना कधीं दिसणार नाहीं, त्याला आपल्या सौंदर्याचा किंवा सामर्थ्याचा अभिमान झालेला क्वचित्‌च पहाण्यांत येतो. आपलें उरलेलें आयुष्य देशसेवेंत घालविण्याचा निर्धार करणें त्याला मुळींच जड वाटत नाहीं. एका ऐशीं वर्षाच्या म्हाताऱ्यानें असा संकल्प करून मरेपर्यंत म्हणजे सबंध दोन महिने पार पाडिल्याचें मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. अशा देशसेवेस वाहिलेल्या म्हाताऱ्यास जन्मठेपेची शिक्षा कसपटासमान असते !

## २९. उत्तरगोग्रहण

मत्स्यपुरोत्तरभागीं प्रातःकाळींच ये सुयोधन, हो !
‘ ज्यासि जयप्राप्ति ’ मनीं म्हणती भीष्मादिही सुयोध, ‘ न हो. ’ १
सहसा व्रजांत गांठुनि, बहु ताडुनि करुनि बद्धभुज गवळी
षष्टिसहस्र सुगोधन तो कुरुकुळचंदनद्रुभुजग वळी. २
गोपाध्यक्ष रथावरि बैसुनि धांवे नृपास सांगाया,
चित्तीं म्हणे, ‘ बुडाया कुर्वधमा ! धेनु हरिसि कां गा ! या ? ’ ३
तो राजगृहीं जाउनि रायाच्या उत्तराख्यतनयातें
नमुनि म्हणे, ‘ हो ! नेतो दुर्योधन धेनु करुनि अनयातें. ’ ४
उत्तर म्हणे, ‘ असे जरि मी एकाकी लहान, परि सवत
यश जोडितोंचि असतां सारथि तरि, कथन मज न परिसवतें. ’ ५
तें परिसुनि एकांतीं पार्थ म्हणे, ‘ देवि ! कृष्णसखि ! जावें
उत्तरसारथि होउनि म्यां, त्वां मजवरि कदापि न खिजावें. ’ ६
कृष्णा म्हणे, ‘ बहु बरें; व्हा मारुत हो पलाल खळबळ तें
मद्धृदय न अरिसैन्यें, तुमच्या दैन्येंचि फार खळबळतें. ’ ७
त्या उत्तरासि सांगे, ‘ सारथ्य बृहन्नडा करिल; यातें
सूत करुनि विजयानें नेले बहु खांडवीं अरि लयातें. ८
भगिनीमुखेंचि विनवा, तन्मातिला उत्तराचि वळवील
अतिसहवासिवच्च मना, कतक कलुषिता वना निवळवील. ’ ९
उत्तर म्हणे, ‘ कुरुकटक न पशूंस, यशासहि, स्वसे नेतें,
अवकाश पळहि नाहीं कळवाया वृत्त हें स्वसेनेतें. १०
माझें सारथ्य करो तुझिया वचनें बृहन्नडा, गमला
हाचि सदुपाय; वत्से ! लागो अपकीर्तिचा न डाग मला. ’ ११
ती धांवत जाय, म्हणे, ‘ गानादिक हें बृहन्नडे, राहो;
समयीं सारथ्यगुण न उघडूनि कदर्युचा न डेरा हो. ’ १२

उत्तर म्हणे, ‘ बहु बरें, देउनि वचनास मान आलीस. ’
बोले बृहन्नडा स्मितपूर्वक, ‘ विटवील कोण आलीस ? ’ १३

होउनि सिद्ध रथावरि चढतांचि, सहोत्तरा तिच्या आली
म्हणती, ‘ बृहन्नडे, तुज वीरश्री गौरवावया आली. ’ १४

सत्वर बृहन्नडा नृपसुतरथ घेऊनि जाय बाहेर
त्यासि म्हणे, “ हेरावें म्हणासि कुरुकटक काय बा ! हेर. ” १५

कुरुकटकासि पहातां तो उत्तर बाळ फार गडबडला,
स्वपरबळाबळ नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला. १६

बोले, ‘ बृहन्नडे, हें कुरुबळ कल्पांतसिंधुसें गमतें;
ने रथ पुरांत; माझें मन, नयनहि पाहतां बहू भ्रमतें. १७

दुर्योधन, दुःशासन, कर्ण, कृप, द्रोण, भीष्म ज्या कटकीं
त्यांत मरेनचि शिरतां; कांट्यांवरि घालितां चिरे पट कीं. ’ १८

पार्थ म्हणे, ‘ राजसुता ! आतां वदतोसि हें अहा ! काय ?
शय्येवरि न पडाया योग्य रणक्षितिवरीच हा काय. १९

तेव्हां स्त्रियांत तैसें बोलुनि, आतां असें कसें वदसी ?
एकहि बाण न सुटला, नाहीं अद्यापि झळकला सदसी. ’ २०

उत्तर म्हणे, ‘ नको गे ! पायां पडतों बृहन्नडे ! सोड;
जोड दिली, दुखवुं नको; केवळ पितृकरतळस्थ हा फोड. ’ २१

कुरवाळूनि म्हणे, ‘ गा राजसुता, योग्य तूं न कांपाला.
मृदुलत्व, म्लानत्व स्त्रीकारुनि जाहलासि कां पाला ? २२

तुज उत्साह नसे तरि करितों घेउनि धनूस मी रण हो;
मज दहनासि कुरुवनीं जायासि सहाय तूं समीरण हो. २३

सत्य अगा वैराटे, जो अर्जुन तोचि मी असें जाण;
जो कंक तोचि राजा धर्म, नव्हे अनृत हें, तुझी आण. २४

बल्लव भीम, ग्रंथिक तोचि नकुळ, तंतिपाळ सहदेव,
सैरंध्री ती जीचा कैवारी वृष्णिमूर्तमहदेव. ’ २५

धृतरश्मि कुमार म्हणे, ‘ दारुक कीं आजि मातली लाजो;
दंड करावा या कुरुसेनेला योग्य मातलीला जो.’ २६

जातां कुरुकटकावरि वाजविला दिव्य देवदत्त दर,
तो होय जनां, जैसा कल्पांतीं रुद्रदेव दत्तदर. २७

द्रोण म्हणे, “ सैनिक हो, हा आला कीशकेतु अर्जुन हो !
कोण सुहृन्न म्हणेल, ‘ख्यात जगीं विजय, विजय अर्जुन, हो?” २८

पार्थ म्हणे, “ वैराटे, रथ कुरुकटकासमीप राहों दे.
गोधन हरावयास्तव भट आले कोण कोण पाहों दे. २९

तो गुरु, तो गुरुनंदन, तो कृप, तो कर्ण, तो पितामह रे !
यांहीं धेनु वळाव्या ! शिव ! शिव ! गोपाळकृष्ण ! राम ! हरे ! ३०

रे उत्तरा, शकुनिचा या व्यूहांत न दिसे मला भाचा;
त्यावांचुनि यांसीं जो करणें संग्राम तो न लाभाचा. ३१

हें कटक सोड, तिकडे चाल; तुझ्या हरुनि गोधना खळ तो
प्राणत्राणपरायण जिकडे निरपत्रपाग्रणी पळतो. ” ३२

उत्तर निजतुरगांतें, द्याया अरुणासि कौतुक, पिटाळी,
तों गर्जोनि कुरुकटककर्णीं बसवी ध्वजस्थ कपि टाळी. ३३

गांठुनि पार्थ म्हणे, “ रे, आलों मी, अनुज भीमसेनाचा,
ज्याच्या शरांसि म्हणती सुर, असुरबळांत भीमसे नाचा.’ ३४

कोठें जाल ? उभे रे; मत्स्येश्वरधेनुपश्यतोहर हो !
सोडा गोधन; नाहीं तरि वधिन तुम्हांसि, वश्य तो हर हो. ” ३५

पळतां सुयोधनातें पार्थ म्हणे करुनि बाहुशब्द, “ अरे,
कोठें जाशिल ? नाशिल तुज दहना मद्धनु:सदब्द अरे ! ३६

केले होते कीं त्वां गुरुपाशीं क्षत्रधर्म मुखपाठ !
देती वृद्धचि उष्णा कीं दहना व्हावयासि सुख पाठ ? ३७

मान विसरलां कीं तो सरला ? रुसलां अहो सुयोधन ! हो ?
प्राणरहित हो, परि पळभरि मानरहित कधीं सुयोध न हो. ” ३८

इत्यादि नर वदे जें, झालें त्या कुंजरासि अंकुश तें;
सद्वचनें दुखवे खळहृदय, जसें तप्तलोहशंकुशतें. ३९
धरते पर पार्थावरि पदपीडितपुच्छभागतक्षकसा;
न उगारेल गरुडसा त्यावरि तो दुष्टनाशदक्ष कसा? ४०
तेव्हां नृप रक्षाया सावध होता नदीज त्यामागें,
कर्णेंहि वामपार्श्वीं रक्षियला, निधि जसा महानागें. ४१
त्याच्या दक्षिणपार्श्वीं अश्वत्थामा, पुढें कृप द्रोण,
दुःशासनादि बहु खळ होते, आर्यांत योजितो कोण? ४२
ते लागले समस्तहि शस्त्रांहीं एकदाचि वर्षाया,
हांसत म्हणे धनंजय, 'या हो! या, एकदाचि वर्षा, या.' ४३
प्रथम परास्त्रें वारी, द्रुत मग संमोहनास्त्र नर योजी
चित्तांत म्हणे 'गुरुजी, मनिं बाळासुरसहाय हर यो जी!' ४४
कुरुकटकांतूनि निघे घनघनपटलामधूनि जेविं रवि;
हरिजनतेज न वदवे, षडरींसहि, अरि वधूनि, जें विरवी. ४५

# ३०. ईसाप

ईसापनीति ज्यानें वाचली नाहीं, निदान ज्यानें त्या पुस्तकांतील स्वभावमनोहर व उपदेशपूर्ण कथा कर्णोपकर्णीं तरी ऐकल्या नाहींत, असा मनुष्य विरळा. ज्याप्रमाणें प्राचीनकाळापासून विष्णुशर्म्याच्या पंचतंत्रांतील दमनककरटकांच्या गोष्टी, त्याचप्रमाणें इंग्रजी भाषा इकडे सुरू झाल्यापासून ईसापाच्या गोष्टी सर्वतोमुखीं होऊन बसल्या आहेत. कोणास कांहीं गोष्टींत व्यवहारज्ञानाचें शिक्षण अगर दाखला द्यावयाचा असेल, तर सहजीं त्याचे मनांत ईसापनीतींतील एखादी त्या अर्थाची कथा उभी राहतेच राहते आणि ती कथा ऐकणारालाही ज्ञान व आनंद या दोहोंचा एकदम लाभ होतो. ही ईसापाच्या नांवानें मोडणाऱ्या कथांची हकीकत झाली. परंतु त्या कथांचा जनक जो ईसाप त्याच्या स्वतःच्या चरित्रासंबंधानें फारच थोड्यांस माहिती असते. याचें एक कारण असें कीं, ईसापाच्या चरित्रासंबंधीं माहिती फारच थोडी उपलब्ध आहे. मुळींच नाहीं म्हटलें तरी चालेल. कारण जी थोडी उपलब्ध आहे ती सर्वस्वीं विश्वास ठेवण्याजोगी नाहीं. तथापि जी काय थोडी उपलब्ध आहे, ती येथें देतों.

ईसाप हा इसवी सनापूर्वी सहाव्या शतकांत फ्रिजिआ देशांत 'अमेरिअम' या गांवीं जन्मला. हा गुलाम आईबापांच्या पोटीं जन्मलेला, अर्थात् जन्मतःच गुलाम होता. त्या काळीं सुधारलेल्या राष्ट्रांतही 'गुलाम करणें व बाळगणें' ही गोष्ट सर्वमान्य होती, इतकेंच नव्हे तर साक्रेतिसासारखे शहाणे लोकहि 'गुलामगिरी' ही परमेश्वरानिर्मित स्थिति असून कांहीं लोक सदैव गुलाम असावयाचेच, असें प्रतिपादन करीत असत. ईसापाच्या आईबापांचा जो धनी तोच त्यांच्या मुलांचाही धनी. यामुळें ईसाप आपल्या आईबापाच्या धन्याच्या ताब्यांतच पहिल्या प्रथम होता. ईसाप जन्मतः अत्यंत कुरूप होता. त्याला पाहिल्याबरोबर मुलें व स्त्रिया भयानें डोळे घट्ट मिटून घेत अशी आख्यायिका

आहे. ईसाप साधारण मोठा झाल्यावर त्याचें तें विद्रूप तोंड वारंवार आपल्यासमोर येऊं नये म्हणून त्याच्या धन्यानें त्याला आपल्या एका दूरच्या शेतावर राखण करण्याकरितां पाठवून दिलें. ईसाप तेथें असतां एके दिवशीं असें घडलें कीं, त्याचा धनी शेताची स्थिति काय आहे ती पाहण्यासाठीं आला. तो आला असतां त्याच्या खंडकऱ्यांनीं त्याला नजर म्हणून अगदीं फर्मास असे अंजीर आणून दिले. धन्यानें ते स्वीकारून आपल्या बरोबरीच्या नोकरांजवळ दिले व सांगितलें कीं, “ मी स्नान करून येईपर्यंत हे संभाळा. ” धनी स्नानाला गेला असतां त्या अंजीरांचे रूपरंग पाहून त्या चाकरांचें जिव्हालौल्य अनावर झालें; आणि मागला पुढला विचार न करितां त्यांनीं ते सर्व अंजीर मटकावले. शेवटला अंजीर पोटांत गेला, तेव्हां मग ‘ आतां धन्यानें येऊन अंजीर कोठें आहेत असें विचारल्यास काय उत्तर द्यावें ’ असा प्रश्न त्यांच्या मनांत आला. एक लबाडी केली म्हणजे ती छपविण्यासाठीं मनुष्य आणखी एक लबाडी व ती लपविण्यासाठीं आणखी एक, असें करीत जातो. अंजीर खाल्ल्याची लबाडी लपविण्यासाटीं अर्थातच आपलें कृत्य दुसऱ्या कोणावर घालावें, अशी लबाडी करण्याचें त्यांच्या मनांत वागूं लागलें. इतक्यांत कर्मधर्मसंयोगानें बिचारा ईसाप आपला धनी आला आहे असें ऐकून त्यास मुजरा करण्याकरितां म्हणून तेथें आला. त्यास पाहतांच त्या खाबू चाकरांना ‘ ही संधि आतां बरी आहे. याच गुलामानें आम्ही नको नको म्हणत असतां अंजीर खाल्ले ’ असें सांगितलें असतां ठीक होईल, असें वाटलें व धनी येतांच त्यांनीं त्याप्रमाणें सांगितलेंही. तें ऐकतांच धनी सहजच अतोनात संतापला व त्यानें ईसापास फार कडक शिक्षा करण्याचें योजिलें. ईसाप कांहीं वेळ शांतपणें उभा राहिला व लागलीच धन्याच्या पायांवर लोटांगण घालून म्हणाला, “ धनीसाहेब, माझ्या हातून खचितच अपराध झाला आहे असें आपल्यास वाटत असल्यास मला शिक्षा अवश्य करावी; परंतु ती शिक्षा करण्यापूर्वी मला अर्ध्या तासाचा अवधि द्यावा, तितक्या अवधींत मी आपला निरपराधीपणा पूर्ण

शाबीत करतों. न केला, तर बेलाशक दुप्पट शिक्षा करावी." हें ईसापचें बोलणें ऐकून धन्यास दया आली व त्यानें त्यास अर्ध्या तासाचा अवधि दिला. तो मिळतांच ईसापानें बरेंचसें ऊन पाणी आणलें, त्यांत थोडेंसें मीठ टाकलें, आणि तें पाणी ताबडतोब घटघटा पिऊन टाकलें व अंमळ वेळ जाऊं देऊन घशांत बोटं घालून ओकून पाडलें. त्यांत अंजि-राचा अंशहि नाहीं, हें पहातांच धन्याची त्याच्या निपराधीपणासंबंधानें खात्री झाली. ही खात्री होतांच त्याला नौकरांचा संशय आला, आणि 'ईसापनें केल्याप्रमाणें तुम्हीही करा' असें सांगून त्यांची परीक्षा करण्याचें त्यानें ठरविलें. तेव्हां ते चोर अर्थातच गडबडून जाऊन त्यांनीं मुकाट्यानें आपला गुन्हा कबूल केला. ईसापाची ही समयसूचकता पाहून धन्यास फारच आश्चर्य वाटलें व आजपर्यंत त्याच्या त्या कुरूपपणामुळें तो जो ,अगदीं दृष्टीसमोर नकोसा झाला होता, त्यास त्यानें आपल्याजवळ नेऊन ठेविलें; परंतु कालांतरानें त्या धन्यास आपल्या या चतुर गुलामास एका गुलामांच्या व्यापाऱ्यास विकावें लागलें. ज्या व्यापाऱ्यानें ईसापास विकत घेतलें त्यास त्या सौद्यापासून कांहीं विशेष फायदा झालासें वाटलें नाहीं, कारण ईसाप कुरूप तर कुरूप, परंतु फारसा सशक्तही नव्हता; आणि त्या व्यापाऱ्याचा तर नेहमींचा धंदा अनेक प्रकरचा माल विक्रीसाठीं गुलामां-च्या डोक्यावर देऊन गांवोगांवीं हिंडावयाचें.

ईसापाला घेतल्यावर अर्थातच इतर गुलामांबरोबर त्याच्याकडेही एक बोजा घेण्याचा भाग आला. इतर गुलाम मोठे आपस्वार्थी होते. त्यांनीं भराभर हलके बोजे उचलण्याचा घाट घातला. ईसापानें त्यांच्या आधींच सगळयांत जड बोजा-सर्वांच्या जेवणाच्या साहित्याचा-होता तो उचलला. अंगांत कुवत नसून सगळयांत जड असा बोजा उचलण्याचा आव घातल्या-बद्दल बाकीच्यांनीं त्याची निर्भर्त्सना केली. ईसाप कांहीं एक बोलला नाहीं. आपण स्वीकारलेला बोजा घेऊन तो आपला कसाबसा चालला. पण दररोज

त्याच्या बोजांतील थोडाथोडा अंश कमी कमी होत जाऊन अखेरच्या मजलेला त्याच्या डोक्यावर देण्यास कांहींही शिल्लक राहिलें नाहीं. बाकीच्यांचे बोजे कायम होते. हे पाहतांच त्याच्या शहाणपणाची तारीफ बाकीचे लोक करूं लागले व पुढें त्या अन्नसामुग्रीच्या बोजासाठीं जो तो भांडूं लागला. परंतु धन्यानें तो बोजा नेहमीं ईसापानेंच घ्यावा असा नेम बांधून दिला.

पुढें एके दिवशीं धन्यास दोन तीन गुलाम विकण्याची पाळी आली. तेव्हां त्यानें दोन चांगले धडधाकट—आणि त्यांत एक हा ईसाप—विकावयास काढले. ईसापास त्याच्या विद्रूपतेमुळें व अशक्तपणामुळें कोणी घेणार नाहीं हें त्या धन्यास पूर्णपणें माहिती होतेंच; परंतु याच्या शेजारीं त्या दोघांस उभें केलें असतां त्यांच्या अंगचे गुण गिऱ्हाइकाच्या डोळ्यांत विशेष भरतील असें जाणून त्यानें त्या दोघांच्यामध्यें त्यास उभें केलें. इतक्यांत एक झांथस नांवाचा तत्त्ववेत्ता त्याच बाजारांत गुलाम खरेदी करण्यासाठीं आला असतां त्या तीन गुलामांजवळ आला. ते दुसरे दोघे चांगले धष्टपुष्ट असल्यामुळें अर्थातच ज्याचें त्याचें लक्ष त्यांजकडे जाई. झांथसनेंही त्यांतलाच एक घ्यावयाचा असा विचार करून 'तुम्हांला काय काय कामें करतां येतात ?' असें विचारलें. दोघांनींही आपणांस सर्व कांहीं करतां येतें, अशीं उत्तरें दिलीं. तेव्हां केवळ थट्टा करावी म्हणूनच झांथस ईसापाकडेही वळून म्हणाला, "तुला रे काय काय करतां येईल ?" त्याबरोबर त्यानें उत्तर केलें, "माझ्या सोबत्यांनीं सर्वच कामें केल्यावर माझ्या वांटणीला काय राहणार ? पण माझ्याकडे जीं काय कामें आपण द्याल, तीं मी अगदीं मनापासून करीन. निदान मला तुम्हीं विकत घेतल्यास मुलांना भेवडावणें दाखविण्यास दुसरें कांहीं शोधीत बसायला नको."

झांथस तत्त्ववेत्ता मोठा गुणग्राही होता. त्यानें तें उत्तर ऐकल्याबरोबर त्याला असें वाटलें कीं, "हा गुलाम मोठा चतुर दिसतो, तर होईल तर यालाच विकत घेऊं. आतां हा फार कुरूप आहे, पण याच्या कुरूपतेची

मुलांस मौजच होईल." असा विचार करून त्यानें खरोखरच ईसापास विकत घेतलें.

घरीं गेल्याबरोबर आधीं ईसापाला बाहेरच ठेवून त्यानें आंत जाऊन आपल्या सगळ्या इतर चाकरांना, दासींना, बायकोला व मुलांनाही असें सांगितलें कीं, "आज मीं एक फार सुंदर गुलाम विकत आणला आहे." तें ऐकतांच सर्वांना मोठी जिज्ञासा उत्पन्न झाली व तो गुलाम केव्हां दृष्टीस पडेल असें झालें; परंतु तो जेव्हां दृष्टीस पडला तेव्हां सर्वांची काय त्रेधा विचारतां! मुलें भिऊन आरडत ओरडत पळून गेलीं. दासी 'ईश्श ग बाई, कसला मेला आणला आहे!' असें म्हणून घट्ट डोळे मिटून तेथून निघून गेल्या. झांथसची बायको तर अगदीं मोठी चोखाळ. तिनें ईसापाला पाहतांच त्याला व आपल्या नवऱ्यालाही शिव्यांचा भडिमार चालविला. परंतु लवकरच त्याच्या चतुराईच्या गोष्टींमुळें तो आपल्या धन्यास फार आवडूं लागला व इतरांसही त्याच्याबद्दल पहिल्याप्रमाणें तिटकारा वाटेनासा झाला.

एके दिवशीं झांथस आपल्या बागेंत हिंडत असतां तेथील माळ्यानें त्यास म्हटलें, "सरकार, ज्या झाडांझुडपांची मी अतोनात काळजी घेऊन मशागत करतों तीं माझ्या मनाप्रमाणें वाढत नाहींत, आणखी ज्यांच्याबद्दल मी काळजी करीत नाहीं तीं चांगलीं पोसलीं जातात याचें कारण काय?"

झांथसास कांहीं उत्तर सुचेना, म्हणून त्यानें ईसापाच्या समयसूचकतेची परीक्षा पहाण्यासाठीं त्यास तोच प्रश्न विचारला. तेव्हां ईसापानें चटकन् उत्तर केलें, "धनीसाहेब, जमीन ही तरी स्त्रीच आहे. तिला स्वतःस झालेल्या मुलांचें संगोपन ती अगदीं काळजीपूर्वक करते, पण दुसरींचीं मुलें पोसण्याचें काम तिला सांगितलें, म्हणजे ती सवतीप्रमाणेंच त्यांचा अव्हेर करते. उसनें प्रेम तिला तरी कोठून यावें?"

एके प्रसंगीं झांथस व त्याची बायको यांचें भांडण झालें. किती दिवस झाले ती नवऱ्याशीं बोलेना. तेव्हां झांथसास वाईट वाटून तें भांडण

मिटविण्यास उपाय काय करावा असें ईसापास विचारलें असतां त्यानें सांगितलें, "धनीसाहेब, आपण जेवीत असतां मला असें म्हणा की, माझें खरें खरें हित वाहणारा व अत्यंत इमानी स्नेही घेऊन ये; इतकें आपण म्हटलें म्हणजे मी काय करीन तें पहा." दुसरे दिवशीं जेवणाचे वेळीं झांथस यानें ठरल्याप्रमाणें म्हटलें. त्याबरोबर ईसापानें धन्याचें एक धनगरी कुत्रें त्याच्याजवळ आणून ठेवलें. बायकोनें तें पाहतांच तिला संताप आला आणि एकदम ती ओरडून म्हणाली, "मेल्या, यांचें खरें हित पाहणारा आणखी अत्यंत इमानी स्नेही हा कुत्रा कां? मी कोणीच नाहीं? काय पण विकत घतला आहे गुलाम!" ईसापानें शांतपणें उत्तर दिलें, "बाईसाहेब, आपण जर यांच्या खऱ्या हितचिंतक असतां, तर एवढ्या तेवढ्या बोलण्यावरून आठ पंधरा पंधरा दिवस यांच्याशीं अबोला कसा धरिला असता?" बाई समजली आणि तिनें नवऱ्याशीं धरलेला अबोला सोडला.

एके दिवशीं झांथस यानें आपल्या कांहीं स्नेह्यांस जेवायला बोलावलें व ईसापास सांगितलें कीं, सगळ्यांत उत्तम अशा जिनसांचें जेवण तयार कर. मंडळी जेवण्यास बसल्यावर पाहतात तों सर्व पदार्थ जिभांचे केलेले आहेत. झांथसनें अर्थातच "असें कां केलें" म्हणून ईसापास विचारलें. तेव्हां ईसाप म्हणाला, "धनीसाहेब, जिभेसारखी उत्तम वस्तु कोणतीच नाहीं. आज जगांत तिच्यापेक्षां श्रेष्ठ वस्तु कोणची आहे? तिनें आपल्या मधुरपणानें जितक्या गोष्टी केल्या आहेत, तितक्या कोणीसुद्धां केल्या नसतील. बऱ्यावाईट इष्टानिष्ट वस्तूंची निवड करावयाची तर तीच उपयोगी. सत्कार्य करण्यास प्रवृत्त करणारी, परमेश्वराचें व सज्जनांचें गुणवर्णन करणारी तीच. सारांश, सर्व वस्तूंत तीच उत्तम; आणखी सगळ्यांत उत्तम वस्तूंचें जेवण कर म्हणून आपण आज्ञा केली होती, म्हणून तिचेंच जेवण केलें."

तें ऐकून धन्यानें, "बरें तर उद्यां सगळ्या जगांत अधम अशा वस्तूंचें जेवण तयार कर" असा हुकूम त्यास केला. पण दुसरे दिवशीं पहातो, तों पुनः सर्व पदार्थ जिभांचेच !

"अरे हें रे काय ?" असें धन्यानें विचारतांच ईसापानें उत्तर दिलें, "सरकार, सगळ्या वस्तूंत जीभ ही अधम आहे. हिनें जितक्या आगी लावल्या आहेत, तितक्या दुसऱ्या कोणी लावल्या नसतील. तेव्हां ही जशी श्रेष्ठ तशीच दुष्ट; जशी उत्तम तशीच अधम आहे."

एके दिवशी झांथस एके ठिकाणीं मेजवानीस गेला असतां वाजवी-पेक्षां फाजील दारू प्याल्यामुळें अगदीं बहकला व त्या स्थितींत तो "आपण समुद्र पिऊन टाकतों, नाहीं तर आपलें घरदार सर्व आपल्या प्रतिपक्षाला बहाल करतों" असें म्हणून गेला व जों जों लोक "हें काय बोलतां हें" असें म्हणूं लागले, तों तों जास्तीच जोरानें तो समुद्र पिण्याच्या बढाया मारूं लागला, व आपल्या श्रोत्यांपैकीं एकही कोणी पैज मारूं इच्छित नाहीं तेव्हां ते सर्व भित्रे आहेत, असें म्हणून त्यांस चिडवूं लागला. तेव्हां एकानें त्याची पैज उचलली व "तूं समुद्र प्यालास, तर मी आपलें घरदार तुला देतों, नाहीं तर तुझें घरदार घेईन" असें म्हटलें. 'कबूल' म्हणून पैज ठरली. पैज खरी करण्याचा दिवस दुसरा होता. रात्रीच्या झोपेनें झांथससाहेबांची गुंगी उतरली आणि मग सकाळीं आदल्या रात्रीच्या पैजेबद्दल त्यांस वाईट वाटूं लागलें. आतां या पैजेंतून निसटावें कसें, या गोष्टीकडे त्याचें लक्ष लागून तो मोठा चिंता-क्रांत झाला. त्याच्या बायकोनें त्यास शिव्या दिल्या. परंतु ईसापानें त्यास "कांहीं हरकत नाहीं. धनीसाहेब, आपण निसटून जाण्याजोगी युक्ति काढूं" असें म्हणून धीर दिला व पैज खरी करून दाखविण्यासाठीं ठरलेल्या जागीं ते दोघे गेले. तेथें तो तमाशा पाहण्यासाठीं मंडळींची आधीं-पासूनच गर्दी जमली असून जो तो झांथसच्या मूर्खपणाबद्दल त्यास शिव्या देत होता. झांथस बहुतकरून येणारच नाहीं असें ज्यास त्यास वाटत होतें. परंतु तो येतांच त्याच्या मूर्खपणाची परमावधि झाली असें

जो तो म्हणूं लागला. कारण समुद्र पिणें म्हणजे काय आहे? पैज खरी करण्याची वेळ होतांच ईसाप पुढें होऊन आपल्या यजमानाच्या तर्फे म्हणतो " गृहस्थहो, आमचे यजमान आपल्या म्हणण्याप्रमाणें सर्व समुद्र पिऊन टाकण्यास तयार होऊन आले आहेत. परंतु त्यांत मिळणाऱ्या सर्व नद्या आतांच्या आतां त्यांच्या प्रतिपक्ष्यांनीं बंद करून टाकाव्या. बोली समुद्र पिण्याबद्दल आहे; नद्यांबद्दल नाहीं. करितां त्यांच्यासमोर निखालस समुद्र आणून ठेवण्याचें काम प्रतिपक्ष्याचें आहे. त्यांनीं तें तावडतोब करावें, नाहीं तर हरलों म्हणून येथून निघून जाऊन घरदार धनीसाहेबांच्या स्वाधीन करावें. "

तें ऐकतांच मोठ्या चातुर्यानें पैजेंतून निसटून गेल्याबद्दल झांथसाची तारीफ करीत करीतच लोक तेथून गेले.

एके वेळीं झांथसच्या गांवकऱ्यांची सभा जमली असतां एका गरुड-पक्ष्यानें एका गुलामाच्या पायांतला वाळा आणून त्यांच्या अगदीं मध्य-भागीं टाकला, तें पाहून सर्वांस हें कांहीं तरी मोठें दुश्चिन्ह आहे असें वाटलें. झांथस मोठा शहाणा मानलेला, तेव्हां त्यास त्या दुश्चिन्हाचा अर्थ काय तो सांगा म्हणून लोकांनीं विनंति केली. 'प्रश्नाचें उत्तर उद्ईक सांगतों' म्हणून त्यानें मुदत मागून घेऊन ईसापास विचारलें. ईसापानें सांगितलें, " मला आपण गुलामगिरींतून मुक्त कराल तर मी सांगतों. " झांथसनें तें मोठ्या कष्टानें कबूल केलें. तेव्हां ईसापानें त्यास सांगितलें, "कोणी तरी राजा आपल्या गांवास गुलाम करूं पाहणार आहे हाच त्या गरुडाच्या कृत्याचा अर्थ आहे. सर्व लोकांनीं तयारी ठेवावी. "

पुढें पहातात तों खरोखरीच लिडिया देशाचा राजा क्रीसस यानें झांथसच्या गांवकऱ्यांस निरोप पाठविला कीं, " तुम्ही मुकाट्यानें अमुक खंडणी मला द्या, नाहीं तर मी स्वारी करून लुटालूट करून फडशा उडवीन. " लोकांस मोठा विचार पडला. त्यांची सभा भरली. त्या सभेंत

आतां ईसाप होता. कारण झांथस यानें कबुलीप्रमाणें त्याला गुलामगिरींतून मुक्त केलें असून तो आतां इतरांप्रमाणेंच हक्क असणारा एक नागरिक झाला होता. त्यानें उठून सर्वांस बोध केला. " लोकहो, खंडणी देऊन मानखंडना करून घेऊं नका. हा मार्ग आज सोपा दिसतो, पण एकदां अशी आपली पीछेहाट पाहिली कीं, क्रीसस आपणांस हरघटकेस चेपीत जाईल. लढाईला तोंड देणें हा मार्ग आज फार कठिण वाटतो आहे, पण पुढें सुखाचा आहे. तर होतां होईल तों आपलें स्वातंत्र्य कायम राखूं या."

यावेळीं त्या सभेंत क्रीससचा वकील होता. त्यानें जाऊन राजास सर्व हकीकत सांगितली व म्हटलें, " राजा, ईसाप जोंपर्यंत तेथें आहे तोंपर्यंत तें शहर हातीं लागणें शक्य नाहीं." राजाला तें मानवून त्यानें त्या लोकांना एवढाच निरोप पाठविला कीं, तुमचेकडे ईसाप म्हणून जो गृहस्थ आहे त्यास आमचेकडे पाठवून द्यावें. आतां इतक्यावर गोष्ट आली असें पाहतांच लोक तेवढी गोष्ट कबूल करण्याच्या बेतांत आले. तेव्हां लोकांस इशारत म्हणून ईसापानें ' कुत्रे आहेत तोंपर्यंत कोणच्याही उपायानें आपणांस मेंढ्या मिळत नाहींत असें पाहून तहाचें बोलणें लावणाऱ्या व कुत्रे ओलीस मागणाऱ्या लांडग्याचें म्हणणें कबूल केल्यामुळें प्राणास मुकलेल्या ' मेंढ्यांची गोष्ट सांगितली. त्यावर लोक उमजले. परंतु मी क्रीससच्या दरबारीं असल्यानेंच तुमचा अधिक फायदा होईल, असें सांगून ईसाप त्या दरबारीं गेला. तेथें त्याच्या चातुर्याची फारच तारीफ झाली. क्रीससच्या दरबारींच ईसापानें बहुतेक आपल्या गोष्टी रचल्या. पुढें या राजाच्या आज्ञेवरून डेल्फाय येथील देवळाच्या उपाध्यायांना कांहीं दक्षिणा देण्यासाठीं हा गेला असतां त्या उपाध्यायांचें वर्तन पाहून त्रासून त्यानें ' देणग्या घेण्याची तुमच्या अंगीं मुळींच योग्यता नाहीं. मी तुम्हांला कांहींच देत नाहीं ' असें म्हटल्याकारणानें व तेथून खरोखरीच तो निघून जाऊं लागल्याकारणानें त्या भटांनीं त्याजवर हल्ला करून त्यास ठार मारलें. त्या वेळीं त्यानें त्यांस पुष्कळ नीतिकथा सांगितल्या, पण

व्यर्थ. त्यांतली एक कथा साधारणतः कोणत्याही पुस्तकांत नसते ती अशीः—

" एक भुंगा व गरुडपक्षी यांचें जबर वैर पडलें. गरुडपक्ष्यानें प्रथम भुंग्याचीं अंडीं खाऊन टाकलीं. यामुळें भुंग्यानें गरुडपक्षाच्या पश्चात् त्याचीं अंडीं ओढून ओढून गडबडवून खालीं पाडून फोडलीं. गरुडानें जुपितराकडे गाऱ्हाणें नेलें, तेव्हां 'माझ्या मांडीवर तूं आपलें घरटें कर आणि त्यांत अंडीं घाल ' असें त्यानें सांगितलें. गरुडानें तसें केलें. भुंग्यास हें समजतांच जुपितराच्या कानाभोंवतीं " गूं गूं गूं " करून त्याला असें सतावलें कीं, आपल्या मांडीवर कांहीं आहे याचें त्यास मुळींच भान न राहून तो त्या भुंग्यास मारण्यास उठला आणि गरुडाचीं अंडीं आपोआपच फुटलीं. मरतां मरतां ही गोष्ट सांगून ईसापानें त्यांस ' तुम्हांला याचें प्रायश्चित्त भोगावें लागणार आणि तेंही भयंकर तऱ्हेनें ' असें सुचविलें; व त्याचप्रमाणें पुढें झालेंही. डेल्फाय येथील लोकांवर महत् संकटें आलीं व त्या संकटांच्या निरसनासाठीं ईसापाला मारून घेतलेल्या पैशाच्या हजारपट दंड त्यांस भरावा लागला.

ईसापाच्या मरणानंतर दोनशें वर्षांनीं अथेन्समधील लोकांनीं त्याचा एक पुतळा करवून शहरांत सुप्रसिद्ध ठिकाणीं ठेविला.

# ३१. ईसापनीति

## दोन भांडीं

एक मातीचें, आणि एक पितळेचें, अशीं दोन भांडीं, कोण्या एका नदीच्या तीरीं ठेविलीं होतीं. तीं वरून पूर येऊन वहात चाललीं. त्या समयीं मातीच्या भांड्यास चिंता पडली कीं, "कदाचित् मी पितळेच्यावर आपटलों तर फुटून जाईन." त्यास कष्टी पाहून पितळेचें भांडें म्हणूं लागलें, "रे, तूं भिऊं नको, तुला मी सांभाळीन." मातीचें म्हणालें, "बाबा, तूं अंमळ दुरूनच बोल, मला तुजपासून भय फार आहे; कां कीं, मी तुजवर आपटलों किंवा तूं मजवर आपटलास, तथापि नाश माझाच होणार."

## कुत्रा आणि लांडगा

कोणी एक लांडगा बहुत दिवस उपास पडून रोडला होता. तो भक्षाकरितां फिरत असतां चांदण्यारात्रीस एका कुळंब्याच्या वाड्यापाशीं आला. आंत शिरला तों तेथें त्यानें एक पोसलेला कुत्रा पाहिला. त्याचें आगतस्वागत झाल्यावर लांडगा कुत्र्यास पुसतो: "रे, तूं फार चांगला दिसतोस; मी खरेंच सांगतों कीं, तुझ्याप्रमाणें पुष्ट आणि देखणा आपण आजपर्यंत कोणीही पाहिला नाहीं; तर सांग बरें याचें कारण काय तें? रे, मी तुझ्यापेक्षां पन्नास वांट्यांनीं अधिक उद्योग करीत असेन; इतकें करूनही मला पोटभर खायाला मिळत नाहीं." कुत्रा म्हणतो, "रे, मी करितों तसें तूं करशील तर तूंही मजसारिखा सुखी होशील." लांडगा पुसतो, "तूं काय करीत असतोस?" कुत्रा म्हणतो: "दुसरें कांहीं नाहीं, धन्याच्या द्वारापुढें रात्रीची चौकी करून मी चोरांस येऊं देत नाहीं." लांडगा म्हणाला: "तें मी मनापासून करीन गड्या; अरे, जो मी रानांत भटकत फिरून हींव पाऊस सोसतों, त्या मला घराच्या छायेखालीं बसून पोटभर अन्न मिळाल्यास दुसरें काय पाहिजे?" याप्रमाणें ते उभयतां

गोष्टी करीत होते. इतक्यांत कुत्र्याच्या गळयास दोरीचा किरकोचा पडला होता त्यावर लांडग्याची दृष्टि गेली, तेव्हां तो त्यास पुसतोः " गड्या, हें तुझ्या गळयास काय रे दिसतें ? " कुत्रा बोललाः " अं:, तें कांहीं नाहीं. " लांडगा म्हणाला, " नाहीं पण मला तर कळूं देशील काय तें ? " कुत्रा सांगतोः " रे, मी अंमळ द्वाड आहें, लोकांस चावतों, म्हणून आणि मी दिवसास निजलों म्हणजे रात्रीस चौकी चांगली करीन म्हणून, माझा धनी मला दिवसास दोरीनें बांधीत असतो. परंतु इकडे दिवस मावळला रे मावळला, म्हणजे त्यानें मला सोडिलेंच. मग मी राजा; पाहिजे तिकडे फिरावें. माझ्या खाण्यापिण्याविषयीं विचारशील तर माझा धनी आपल्या हातीं मला उष्टीं चारितो; तशींच अवघीं घरचीं माणसेंही माझी माया करितात; पात्रावर भाकर तुकडा उरेल तो मजवांचून दुसऱ्या कोणास टाकीत नाहींत. आतां पहा बरें कीं, मजसारिखें करिशील तर तूं किती सुखी होशील ? " तें ऐकतांच लांडगा मागल्या पायीं पळत सुटला, त्यास कुत्रा हाक मारितोः " रे ये, रे ये, पळतोस कां तें सांग ? " लांडगा दुरूनच उत्तर करितोः " नको रे बाबा मला तें सुख; तें तुझें तुला अक्षयी असो; मजबरोबर स्वतंत्रपणाची गोष्ट असेल तर कर; तुझ्यासारिखें बांधून ठेवून मला कोणीं राजा केला तरी नको. "

## पोपट आणि पिंजरा

एका मोठ्या मनुष्याकडे पोपट होता. त्यास त्यानें नित्य चांगले चांगले पदार्थ खायास घालून एका मोठ्या मोलाच्या पिंजऱ्यांत पाळिलें होतें. तो पिंजरा त्यानें बागांत एका झाडाखालीं संगमरवरी दगडाचा चौथरा करून त्यावर ठेविला होता; कां कीं, त्या पोपटानें उष्णकाळीं उघडयावर वारा घेऊन सुख पावावें. तो घरधनी किंवा घरचीं माणसें त्या पोपटाजवळ जात, तेव्हां त्याशीं मधुर लाडक्या शब्दांनीं भाषण करीत. त्याचीं पिसें निवरत तीं घरची यजमानीण आपला कोमल हात त्यांवर

फिरवून नीट करी. अशा महासुखांत असतांही तो पोपट नित्य मनांत झुरत असे कीं, " देवा, दुसरे पक्षी अरण्यांत मोकळे राहून झाडांच्या खांद्यांवरून स्वच्छंद बसतात; ते किती दैववान्! मी त्यांसारिखा मोकळा कधीं फिरूं लागेन ?" कोणे एके दिवशीं चाकराच्या हातून पिंजऱ्याचें दार उघडें राहिलें; ती त्या पोपटास सवड सांपडली, आणि तो बाहेर निघून जवळच्या अरण्यांत जाऊन नाना प्रकारच्या नव्या नव्या अडचणींत मात्र पडला. बापुडा तो पूर्वीं आपण दुःखी म्हणून मनांत मानीत मात्र होता; तो आतां खराच दुःखी झाला. दुसरे पक्षी त्यास चोंचीनें बोचूं लागले. त्याची मनुष्यवाणी, जी ऐकून लोकांस संतोष होत असे, ती ऐकून पक्षी त्यास अधिक यातना करूं लागले. तो गोड गोड अन्न खात असे, तें आतां नाहींसें झालें. उद्योग करून पोट भरावें तर त्याचा त्यास अभ्यास नाहीं म्हणून तो उपाशी मरूं लागला. वारा, पाऊस यांच्या उपद्रवापासून संरक्षण करणारें असें घर नाहींसें झालें. यामुळें पावसानें पक्ष भिजून, त्यानें थंडीनें कुडकुडावें. याप्रमाणें त्याच्या नाजुक शरीरप्रकृतीचा टिकाव निघत नाहींसा झाला. शेवटीं तो कष्टून कष्टून मरते वेळेस आपणाशीं असें बोलला: "आहारे बापुड्या पोपटा, जर पुनः एक वेळ पिंजरा तुला प्राप्त झाला असता, तर तूं बाहेर फिरायाची गोष्ट कधींही न बोलतास. परंतु तो आतां कसा प्राप्त होतो ?" असें म्हणून त्यानें डोळे मिटले.

## ससा आणि कांसव

एके दिवशीं ससा गर्वानें कांसवास तुच्छ करून म्हणाला: "रे मजपुढें निघून जाणारा असा आज कोण आहे ?" कांसव त्यास बोलला: "रे तुझ्या मनांत असें आहे तर आपण पैज मारूं या. जर मी त्या डोंगराच्या पायथ्याशीं तुझ्यापुढें पोंचलों तर तूं मला पांच रुपये द्यावेस, नाहीं तर मीं तुला द्यावे. या आपल्या पैजेस हा कोल्हा साक्ष." सशानें तें मान्य केलें. नंतर ते दोघे संगतीं निघाले; तेव्हां ससा मुळींच जातीचा चपळ, त्यावर आणखी धांवला, म्हणून कांसव फारच मागें पडला. तें

पाहून सशानें मनांत विचार केला कीं, "आपण आतां थकलों आहों, तेव्हां अंमळ या जवळच्या झाडींत नीज घ्यावी. जर कदाचित् कांसव पुढें निघून गेलाच, तर त्यास आटोपतां आपल्यास काय उशीर आहे?" असें म्हणून तो झाडींत निजायास गेला. मागून कांसव हळूहळू विसांवा न घेतां, एकसारिखा चालत होता, तो पैजेच्या ठिकाणीं जाऊन पोंचला; आणि ससा आपल्या सामर्थ्यावर भरंवसा ठेवून निजलेलाच राहिला.

## लांडगे आणि मेंढे

एका काळीं लांडग्यांशीं आणि मेंढ्यांशीं फार दिवस लढाई चालली होती. त्या समयीं कुत्र्यांच्या बळावर मेंढे लांडग्यांस हारी गेले नाहींत. शेवटीं त्यांचें यांचें तहाविषयीं बोलणें होऊन असें ठरलें कीं, परस्परांनीं परस्परांस ओला द्याव्या. लांडगे मेंढ्यांस म्हणाले: "आम्ही आमचीं पोरें तुमच्या स्वाधीन करितों; आणि तुम्ही आपले कुत्रे आमच्या स्वाधीन करा." तें मेंढ्यांनीं मान्य करून तसें केलें. मग लांडग्यांचीं पोरें मेंढ्याकडे येतांच, त्यांनीं आपल्या आयांकरितां एकच कुई केली. ती होतांच लांडगे धांवून आले, आणि मेंढ्यांस म्हणाले: "दुष्ट हो, तुम्ही आमच्या पोरांस मारून तह मोडिला, तर आतां तुमची आमची लढाई." असें बोलून ते मेंढ्यांवर तुटून पडले. त्या समयीं कुत्रे जवळ नव्हते म्हणून ते सहज मारले गेले.

## ३२. विश्वामित्रीच्या कांठीं

बघुनि मन धालें
साफल्य दृष्टिचें झालें ! ध्रु०
पाउस बर्फाचा जणुं पडतो,
रजताचा जणुं मेघ वितळतो,
किंवा चंद्रमणि पाझरतो,
न कळे कांहीं—
जिव वेडावुनि हा जाई ! १
शांतिदेवता निराकारिणी
वसते जणुं या मंगल स्थानीं,
सांगे मजला या उद्यानीं,
" चंचल बाला
बघ इथें जगन्नाथाला ! " २
सृष्टिसुंदरी नटली थटली,
सूक्ष्म धवल वल्कला नेसली;
खुलली जणुं सम वेली फुलली;
रम्य ही शोभा—
हिजपुढें काय ती रंभा ! ३
शांत तटिनि, जणुं पय स्फटिकाचा
जातिपुष्प—पथ वनदेवीचा
किंवा ओघ सजिव रजताचा
कीं रत्नाची—
मेखलाच उद्यानाची ! ४

विश्वामित्रीजलिं या कालीं
तटवनभूमी बिंबित झाली,
वरतीं तैसें दिसतें खालीं,
अद्भुत झालें–
पाताळ आज पाहीलें ! ५

तारांगणही स्पष्ट बिंबिलें,
स्नाना जणुं हे मुनि अवतरले,
तेजोनिधि कीं ऋषी बैसले,
ध्यान धरोनि–
जलसमाधिस्थ होवोनी ! ६

शशिरायाही आंत उतरला,
कलहंसापरि पोहुं लागला,
तटिनीनें जणुं हृदयीं धरिला,
दृष्टि बावरली–
वर पाहूं किंवा खालीं ! ७

स्मरणशक्ति गे ! जागृत होई,
दर्शनदुर्लभ शोभा पाहीं,
विसरुं नको बघ यांतिल कांहीं,
वारंवार—
कोठुनी असें दिसणार ? ८

# ३३. जिब्राल्टर

ता. १९ पहाटे १॥ वाजतां झोपेंत जिब्राल्टरला पोहोंचलों. आगगाडी चालूं असतां निजलों म्हणजे ती थांबल्यानें आपण जागे होतों तसाच बोट थांबल्यानें जागा झालों व पहातों तों बोट बंदरांत उभी असून दोन्ही बाजूंस दिव्यांचा लखलखाट. लगेच डेकवर जाऊन सर्व शोभा पाहून परत येऊन निजलों. आज दिवसा सर्व पहावयास सांपडणारच आहे; पण रात्रीं विशेषतः उत्कृष्ट चांदण्यांत पहावयास सांपडणारी शोभा दिवसा पहावयास मिळणार नाहीं, म्हणून पाहून घेतली.

सकाळीं लवकर उठून सर्व कामें करून डेकवर जाऊन आधीं चौफेर बंदराचा देखावा पाहिला. बंदर पाहून बॅकबेची आठवण होते. बंदर बॅकबेहून मोठें आहे. बंदरांत येण्याचें तोंड मात्र बॅकबेहूनहि लहान आहे. पूर्वेकडून आंत शिरल्यावर उजवीकडे जिब्राल्टरचा किल्ला, पश्चिमेचे बाजूस स्पॅनिश जिब्राल्टर शहर, उत्तरेस आल्जिसेरिस हें स्पॅनिश शहर, पूर्व-उत्तर कोपऱ्यास अटलांटिक महासागरांत शिरण्याचें द्वार व त्यापलीकडे मोरोक्को देशचा किनारा. बंदरांत जहाजेंच जहाजें; व मोठमोठ्या मोटारबोटी तर काय माशासारख्या पाण्याच्या पृष्ठभागावर वावरत होत्या. सकाळची न्याहरी झाल्यावर दोन तासांनीं एक मोठी बंदरबोट येऊन बंदरावर आम्हांस घेऊन गेली. धक्क्यावर पोंचण्यापूर्वीं प्रचंड कोळशाच्या वखारी लागतात. धक्यावर एक गाईड ( वाटाड्या ) भेटला त्याला घेऊन दोन गाड्या करून शहर पहाण्यास गेलों. शहरास चौफेर तटबंदी भुईकोट किल्ल्याच्या रीतीची असून तिचा प्रकार पाहून थेट दिल्लीच्या किल्ल्याची आठवण झाली. वेशीच्या तोंडीं आमचे पासपोर्ट तपासून आम्हांस परवान्याचीं तिकिटें देण्यांत आलीं. सायंकाळीं नाकेबंदीची तोफ होईपर्यंत शहरांत फिरण्याची परवानगी होती; पण आम्हांस चार वाजतांच यावयाचें होतें. वेशीजवळच फळफळावळीचें मार्केट आहे. येथून शहराचा मुख्य रस्ता लागतो. हा सुमारें २० फूट रुंद

असून त्यांतच दोन पदपथ आहेत. दोन गाड्या जाण्यायेण्यास अडचणच वाटते. रस्ते मुंबईसारखे डांबरानें घोटलेले असतात. दोन्ही अंगांस लहान लहान दुकानें; पण बंदरांत रोज शेंकडों प्रवासी उतरत असल्यानें या दुकानांतून हजारों रुपयांची घडामोड होते. जरूरीपेक्षां चैनीच्या पदार्थीचीं दुकानेंच अधिक आहेत. शहराच्या मध्यभागीं एक परेडग्राऊंड ( लहानशीच ) व त्याभोंवतीं एक बाग आहे. शहराच्या पूर्व-दक्षिणचा भाग पाहण्यास परवानगी नाहीं. येथून लष्करी भाग सुरू होतो. शहर सर्व एका मोठ्या तुटक डोंगराच्या लवणावर वसलें आहे. मलबारहिलकडे लांबून पाहिलें म्हणजे जशीं घरावर घरें दिसतात तशीं डोंगराचे लवणावर सपाटी करून घरें बांधलीं आहेत. सुमारें दहा पंधरा मजले घरांवर घरें दिसतात. व लांबून शहर एकाद्या चित्रासारखें दिसतें.

किल्ल्याचा डोंगर तुटक असल्यामुळें भव्य दिसतो. तो पांढुरका असून उन्हांत पाहिलें तर त्याच्या आंगावर खवलेखवले दिसतात. यांजकडे पाहून दौलताबादच्या किल्ल्याची आठवण होते. पण तो थोडा लहान आहे. किल्ल्यांच्या भागावर थोडथोडी तुरळक झाडी आहे. सर्व किल्ल्यावर लष्करी ठाणीं व तटबंदी असून त्यावर शेंकडों तोफा पसरून पण छपवून ठेवलेल्या आहेत त्या अशा कीं, भूमध्यसमुद्र व अटलांटिक महासागर यांतून एकमेकांत शिरणारें कोणतेंही जहाज या तोफांचा मारा चुकवूं शकणार नाहीं. हा किल्ला म्हणजे एक किल्लीच आहे. युरोपांतील सर्व दर्यावर्दी मार्गाच्या दरवाज्याला कुलूप असून त्या कुलुपाची ही किल्ली इंग्रजांनीं आपल्या हातांत ठेविली आहे. आज दोनशें वर्षें ती इंग्रजांचे हातीं आहे. त्यापूर्वीं स्पॅनिश व त्यापूर्वीं मुसलमान लोकांच्या हातीं ही किल्ली होती.

शहर पाहून झाल्यावर आम्हीं स्पॅनिश जिब्राल्टर पाहण्यास गेलों. यांच्या कस्टम हाऊसपलीकडे इकडच्या गाड्या जात नाहींत. आमच्या वाटाड्याच्या कृपेनें आमची तपासणी करून झाली नाहीं. गांवचे सर्व रस्ते उत्तम फरसबंदी आहेत तें पाहून काशीच्या रस्त्यांची आठवण

होते. सर्व स्पेनमध्यें फरसबंदीशिवाय गांवांतील रस्ता नाहीं असें कोणी म्हणाले. फरसबंदीमुळें स्वच्छता दिसते. धूळ मुळींच नाहीं. पण खऱ्या अस्वच्छतेस तोटा नव्हता. घरें व दुकानें सरमिसळ असून बायका दुकानावर बसण्याचें प्रमाण इंग्रज दुकानांहून अधिक आहे. येथें कांहीं किरकोळ खरेदी झाल्यावर मंडळी परतली.

बंदरावर जाण्यापूर्वीं आम्ही एका हिंदी दुकानांत शिरलों. आम्ही हिंदी लोक पाहतांच त्यांना मोठें प्रेम वाटलें. जिब्राल्टर येथें सुमारें पंधरा हिंदी दुकानें असून तीं सर्व सिंधी लोकांचीं आहेत. सिंध हैद्राबाद येथील एका विशिष्ट वाणिया जातीच्या लोकांनीं आज चाळीस वर्षे हा धंदा उचलला असून जगांतील प्रत्येक मोठमोठ्या बंदराच्या शहरीं त्यांचीं दुकानें आहेत. कोलंबोस आम्हांस सिंधी व्यापारी भेटलेच होते. यांच्या दुकानांतून युरोपियन लोकांस आवडणाऱ्या अशा पौर्वात्य पद्धतीच्या चिजाच ठेविलेल्या असतात. व त्या विकून हे दुकानदार युरोपियन लोकांकडून बराच पैसा मिळवितात. जिब्राल्टर येथें या व्यापाऱ्यांच्या पांचसहा पेढ्या असून प्रत्येकीचीं येथें एकाच पेठेंत दोन-दोन तीनतीन दुकानें आहेत. येथें सुमारें ऐशी हिंदी आहेत व ते फक्त सिंधीच आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हिंदुस्थानच्या गप्पागोष्टी झाल्यावर या लोकांनीं आम्हांस फराळास दिलें व थोडासा फलपुष्पोपहार घेऊन ते आम्हांस बंदरावर पोंचवावयास आले. आमच्या बोटींतले पुष्कळ युरोपियन जिब्राल्टर पाहण्यास उतरले होते व त्यांनींही बरोबर फुलें आणलीं होतीं; पण आमचे पुष्पगुच्छ त्यांच्याहूनहि मोठमोठे पाहून त्यांना थोडें आश्चर्य वाटलें व त्यांच्या दृष्टीनें आमची अब्रूहि थोडीशी वाढली असेल !

आम्ही परत आलों तों आमची बोट कोळशाच्या वखारीजवळ येऊन कोळसा भरीत होती. हें काम पुरें होऊन संध्याकाळीं ६॥ वाजतां आम्हीं बंदरांतून बाहेर पडून आणखी एका तासानें खऱ्या आटलांटिक महा-सागरांत शिरलों.

# ३४. सुभाषितें

श्रुतोंचि कीं श्रोत्र, न कुंडलानें
दानेंचि कीं पाणि, न कंकणानें ।
साजे तसा देहहि हा न आनें
परोपकारेंचि, न चंदनानें ॥ १ ॥

बरें तें या देहीं महिवरि कडेलोट करणें
महासर्पाच्या कीं वदनि तरि हा हात धरणें ।
उडी कीं वन्हींत त्वरित जरि घालूनि मरणें
जळों तें तें लोकीं त्यजुनि तरि सच्छील फिरणें ॥ २ ॥

जो तोषवी स्वजनकास सुपुत्र तोच
जें दे पतीस सुख फार कलत्र तेंच ।
जो एकरूप सुखदुःखपणीं सखा तो
हा लाभ पूर्वसुकृताविण काय होतो ॥ ३ ॥

वानोत निंदोत सुनीतिमंत
चळो असो वा कमला गृहांत ।
हो मृत्यु आजीच घडो युगांतीं
सन्मार्ग टाकूनि भले न जाती ॥ ४ ॥

आली जरी कष्टदशा अपार
न टाकिती धैर्य तथापि थोर ।
केला जरी पोत बळेंचि खालें
ज्वाला तरी ते वरती उफाळे ॥ ५ ॥

संपत्काळीं कोवळें सज्जनाचें
होतें चित्त ज्ञाति पंकेरुहाचें।
आपत्कालीं शैलही आदळो कां
धाकेना जें गाजवी धैर्यडंका ॥ ६ ॥

तें श्वान एक तुकड्यास्तव चार नाना
दावी धन्यास जठरार्थ कसें पहाना !
दे आळवूनि जरि हस्तिप ‘ बाप ’ ‘ भाई ’
घे तोंचि घांस गजराज कशी बढाई ॥ ७ ॥

गेला तो नृप ते प्रधान अवघे ती पंडितांची सभा
गेली ते नगरी तशा शशिमुखी ज्या तप्तहेमप्रभा।
गेला तो नृपपुत्र त्या शुभकथा म्यां देखिलें सर्व जें
तें जेणें स्मरणास योग्य रचिलें कालासि त्या वंदिजे ॥ ८ ॥

विद्या हें पुरुषास रूप बरवें, कीं झांकलें द्रव्य ही
विद्या भोग सुकीर्तिदायक पहा ते मान्य मान्यासही।
विद्या बंधु असे विदेशगमनीं विद्या महादेवता
विद्या पूज्य नृपास हा नरपशू तीवेगळा तत्त्वतां ॥ ९ ॥

# ३५. पोलो-बंधु

व्हेनिस नगरीं युरोपखंडांतील प्रमुख प्रमुख आणि धनिक वणिक्-श्रेष्ठ राहात असत. अत्यंत मौल्यवान् आणि भारी किंमतीच्या मालाची देवघेव तर हे करीत असतच. शिवाय अज्ञात खंडांतील लांबलांबचे प्रवासहि रात्रंदिवस हाल सोसून, स्वतःचा जीव धोक्यांत घालून ते करीत आणि " साहसे श्रीः प्रतिवसति " या सुप्रसिद्ध सिद्धान्ताचें सत्य ज्ञान जगाला पटवून देत. अशा वणिक्श्रेष्ठांमध्यें अत्यंत श्रेष्ठ आणि सुप्रसिद्ध असे मॅफिओ पोलो आणि निकोलो पोलो नांवांचे साहसी पुरुष होऊन गेले. निकोलो पोलोचा मुलगा मार्को पोलो यानें तर बाप-चुलत्यांची परंपरा चालवून साहसी प्रवाशांमध्यें आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. व्हेनिसपासून चीनच्या पूर्व किनाऱ्यापर्यंतचा सर्व ओसाड, बर्फाच्छादित असा प्रदेश ओलांडून जाणारा आणि त्या प्रदेशाचें मनोवेधक वर्णन अगदीं बिनचूक लिहून ठेवणारा हाच पहिला प्रवासी होय.

हा प्रदेश ठिकठिकाणीं वैराण, रेताड ओसाड असा असल्यामुळें जसा रखरखीत आहे तसाच तो पुष्कळ ठिकाणीं पर्वतमय आणि बर्फाच्छादित असा असल्यामुळें अति थंडहि आहे. या प्रदेशांत जीं कांहीं सुपीक खोरीं मधून मधून विखुरलेलीं आहेत, त्यांतच शेळया, मेंढ्या, घोडीं, उंट घेऊन कधीं या खोऱ्यांत तर कधीं त्या खोऱ्यांत राहणारे रानटी लोक इतस्ततः भटकत असतात. याच लोकांच्या धाडी चीन आणि हिंदुस्थान या सुसंपन्न देशांवर अनेक वेळां येऊन पडत. हे लोक व्यापारी लोकांच्या उंटाच्या तांड्यांना वाटेंत गांठून त्यांना लुटीत; कैक वेळां त्यांना ठार मारूनहि त्यांचें असेल नसेल तें लुबाडीत. म्हणून अशा लोकांच्या प्रदेशांतून प्रवास करणें धोक्याचें, नव्हे जिवा-वरचें होतें.

पण अशा त्या प्रदेशांतूनहि प्रवास करणारे कांहीं फकीर असतच. फकीरच ते, तेव्हां त्यांना लुटारू लोकांची कसली भीति ? उलट त्यांचाच

पाहुणचार ते घेत. हे फकीर लोक चीन देश आणि तेथील सम्राट् यांच्या संपत्तीबद्दल आणि सत्तेबद्दल व्हेनिस शहराच्या व्यापारी लोकांना अशा कांहीं विलक्षण आणि मनोवेधक गोष्टी सांगत कीं, ते लोक आश्चर्यानें अगदीं थक्क होत. असा सुसंपन्न देश आहे तरी कसा हें प्रत्यक्ष तेथें जाऊनच आपण पहावें, आणि तेथील व्यापाऱ्यांबरोबर ओळखी कराव्या म्हणून निकोलो आणि मॅफिओ पोलो यांनीं प्रथम कॉन्स्टँटिनोपल शहरीं जाऊन तेथें जडजवाहीर आणि सोनें मोत्यें यांचा व्यापार करण्यास सुरवात केली, व नंतर तेथून काळा समुद्र ओलांडून व्होल्गा नदीच्या पूर्वभागीं तार्तर लोकांनीं प्रस्थापित केलेल्या राज्यांत जाऊन तेथील दरबारांत त्यांनीं प्रवेश मिळविला. हे तार्तर लोक अत्यंत क्रूर आणि रानटी म्हणून नांवाजलेले होते. तथापि आपल्या जवळचीं रत्नें तेथील राजाला नजर करून त्याला त्यांनीं खूष केलें व व्यापाराचा जम तेथें सुरेख बसविला. पण वर्षाच्या अखेरीस त्या राज्यांत अंदाधुंदी माजली व या व्यापाऱ्यांना आपल्या मालमत्तेची आणि जिवाची सुरक्षितता वाटेना. आल्या वाटेनें परत आपल्या देशीं जावें म्हटल्यास तो सर्व प्रदेश शत्रूच्या ताब्यांत गेला होता. म्हणून त्यांनीं पुढें जाण्याचें निश्चित केलें आणि कास्पियन् समुद्र ओलांडून त्याच्या पूर्वभागीं असलेल्या गवताळ प्रदेशांतील प्रसिद्ध बुखारा शहरीं जाऊन तेथें ते राहिले. सभोंवतालीं रानटी टोळ्या हिंडत असतांहि अखिल मध्यआशियांत विद्येबद्दल हें शहर त्यावेळीं अत्यंत नांवाजलेलें होतें. या शहरीं या वणिग्बंधूंना तब्बल तीन वर्षें स्वस्थ राहावें लागलें. कारण त्यांना धड मागें जातां येईना किंवा पुढेंहि जातां येईना. भोंवतालच्या सर्वच प्रदेशांत रानटी लोकांच्या बंडाचा वणवा पसरला होता.

तार्तरी हा देश कास्पियन् समुद्रापासून थेट चीन देशाच्या प्रचंड भिंतीपर्यंत पसरलेला आहे. याचे पश्चिमतार्तरी, मध्यतार्तरी व पूर्वतार्तरी असे भाग स्वाभाविकपणेंच पडतात; आणि या सर्व तार्तर लोकांचा मुख्य आधिपति बडा खान यानेंच चीन देशाचें साम्राज्य काबीज केलें होतें.

तो पेकिन शहरीं राहात होता. त्याच्याकडे राजकीय बाबतींत बोलणें लावण्याकरितां कांहीं दरबारी वकील पश्चिमतार्तरीकडून पूर्वतार्तरीकडे चालले होते, त्यांचा मुक्काम बुखारा शहरीं पडला. या युरोपियन पोलोबंधूंना बुखारा शहरीं पाहून त्यांना फारच आश्चर्य वाटलें. या बंधुद्वयांनीं त्यांच्यावर फारच छाप बसविली, तेव्हां त्या लोकांनींहि या बंधूंना असें सांगितलें कीं, " तुम्ही जर बड्या खानाच्या दरबारीं याल तर तुमचा योग्य मानमरातब होऊन तुमचा फायदाहि पुष्कळ होईल." पोलोबंधूंना बुखारा येथें राहण्याचा कंटाळा आला होता; आणि तार्तार लोकांच्या वकिलातीबरोबरच जाण्यानें वाटेंत कोणत्याही प्रकारचा धोका पोहोंचण्यासारखा नव्हता. म्हणून त्यांनीं त्यांच्याबरोबरच जाण्याचें ठरविलें.

एक वर्षभर सतत प्रवास केल्यानंतर ही मंडळी एकदांची बड्या खानाच्या दरबारीं येऊन पोहोंचली. हिंदुस्तान सोडून सर्व आशिया खंडांत खानाएवढा सम्राट् यावेळीं कोणीहि नव्हता. त्याचें साम्राज्य कास्पियन् समुद्रापासून थेट चिनी समुद्रापर्यंत हजारों मैल पसरलें होतें. पेकिंग शहर त्याची राजधानी होती. पोलोबंधूंना आपल्या दरबारीं आलेलें पाहून त्याला आनंद वाटला आणि त्यांचा त्यानें मनापासून मोठ्या प्रमानें आदरसत्कारहि केला. त्यांच्याशीं संभाषण करून आणि त्यांना निरनिराळे प्रश्न करून खानानें पुष्कळ माहिती मिळविली. युरोप खंडांतले लोक शहाणे आणि शिकलेले असतात असें खानानें ऐकिलें होतें. धर्मगुरु पोपबद्दलहि त्याला पुष्कळ माहिती होती. त्याला असें वाटे कीं युरोपियन लोकांना आणून त्यांच्याकरवीं आपल्या लोकांना शिक्षण द्यावें. पोलोबंधूंना भेटल्यावर ही त्याची इच्छा बलवत्तर झाली. त्यानें पोलोबंधूंना सांगितलें, "रोम शहरीं तुमचा धर्मगुरु पोप आहे त्याच्याबद्दल माझ्या मनांत फारच आदर आहे. तरी तुम्ही त्याच्यापाशीं जाऊन निदान शंभर धर्मशिक्षकांची माझ्या वतीनें मागणी करा. त्या लोकांनीं माझ्या दरबारीं येऊन मला आणि माझ्या लोकांना शिकवून शहाणे करावें.

माझ्या सरदारांपैकीं एकास मी तुमच्याबरोबर देतों. त्याची जातांना तुम्हांला वाटेंत मदत होईल. ”

बड्या खानाकडून पोपकडे वकील म्हणून जाण्याचा मान मिळाल्यामुळें पोलोबंधूंना मनापासून आनंद झाला. त्यांनीं ती गोष्ट एकदम मान्य केली. खानानें पोपला देण्यास एक पत्र दिलें आणि एका जाड सोन्याच्या पत्र्यावर आपल्या तार्तरी प्रजेनें पोलोबंधूंना सर्व प्रकारची मदत करावी, त्यांचा पाहुणचार करावा आणि त्यांना सत्कारानें वागवावें अशी आज्ञा लिहून दिली. यामुळें त्यांचा हा प्रवास अतिशय सुकर आणि सुखकर झाला. इ. स. १२६९ सालीं पोलोबंधु परत व्हेनिस शहरास सुखरूप येऊन पोहोंचले. त्यांनीं आपल्या बरोबर इतकी अगणित संपत्ति आणिली होती कीं, कांहीं दिवस व्हेनिस शहरांतील लोकांना बोलण्याला दुसरा विषयच नव्हता. निकोलो पोलोचा मुलगा मार्को पोलो याला तर चीनचें इतकें वेड लागलें कीं, तो आपल्या बापाशीं व चुलत्याशीं सारखा चीनसंबंधीच बोले आणि त्यांनीं आणिलेली संपत्ति आणि वस्तु पहाण्यांतच आपला सगळा वेळ घालवी. त्या वेळीं तो सारा पंधरा वर्षांचा होता. तथापि, आपल्या बापाबरोबर व चुलत्याबरोबर चीन देशास जाण्याचा त्यानें इतका हट्ट धरिला कीं, त्यांनीं त्याला दुसऱ्या खेपेस घेऊन जाण्याचें कबूल केलें.

पोपनें पाठविलेले दोन धर्मोपदेशकहि बड्या खानाकडे जाण्याकरितां त्यांच्या बरोबरच निघाले. खानानें शंभर धर्मोपदेशकांची मागणी केली होती खरी, पण सारे दोनच धर्मोपदेशक इतकें दूर जाण्यास तयार झाले. आणि हेहि धर्मोपदेशक बेटे वाटेंतूनच परत फिरले. संपत्ति दुसऱ्यांना देतां येते; पण साहस आणि धैर्य देतां येत नाहींत. तें उपजत असावें लागतें.

या खेपेस ते साडेतीन वर्षें वाट चालले. प्रथम तैग्रिस आणि युफ्रेतिस या नद्यांमधील सपीक प्रदेश जो मेसापोटेमिया तो ओलांडल्यानंतर ते

इराणच्या डोंगराळ प्रदेशांत आले. तेथून सर्व जगांत उंच असें जें पामीरचें पठार, जें नेहमीं बर्फाच्छादित असतें, तेथें येऊन पोहोंचले. हा बर्फाच्छादित प्रदेश ओलांडल्यावर पुन्हां मध्य तुर्कस्तान आणि मंगोलिआ या वालुकामय प्रदेशांतून रात्रीची कडक थंडी व दुपारचें प्रखर ऊन सहन करीत त्यांनीं एकदाचा चीनदेश गांठला. त्यांना परत आलेले पाहून बड्या खानास अतिशयच आनंद झाला. मार्को पोलोवर तर त्याचें पुत्राप्रमाणें प्रेम बसलें.

मार्को पोलोनें तार्तार भाषेचा अभ्यास मन लावून केला. आणि थोड्याच दिवसांत तो तार्तार भाषा उत्तम बोलूं लागला. मार्को पोलोची तरतरी आणि शहाणपण पाहून खान इतका खूष झाला कीं, त्यानें त्याला चीन देशाच्या एका दूरच्या प्रांतावर एका नाजूक कामगिरीवर पाठविलें. मार्को पोलो हा मोठा धोरणी होता. तो अत्यंत बारकाईनें व चौकस-बुद्धीनें देश पाहून त्या देशाबद्दलच्या साऱ्या नवलकथा आणि विचित्र गोष्टी खानास सांगे. यामुळें खान त्याला दूरदूरच्या प्रांतांवर पाठवी आणि हाहि हौसेनें जाई. कारण यायोगें दूरदूरचे देश पाहण्याची त्याची इच्छा पूर्ण होऊन त्याला आशिया खंडांतील प्रदेशाची बरीच माहिती मिळूं लागली. ही सर्व माहिती त्यानें लिहून ठेविली आहे व तीवरूनच आशिया खंडाची बरीच माहिती युरोपांतील लोकांना उपलब्ध झाली. पेकिंग शहराबद्दल तो आपल्या पुस्तकांत म्हणतो, “या शहराला बारा वेशी आहेत आणि सहा सहा मैल लांबीचे, प्रत्येक दिशेला एक, असे चार तट आहेत. प्रत्येक वेशीवर हजार हजार लढवय्यांचा अहोरात्र पहारा असतो. तो बाह्य शत्रूंच्या निवारणार्थ नसून बड्या खानाच्या सन्मानार्थ आणि चोरांपासून रक्षणार्थ ठेण्यांत आला आहे.”

जवळ जवळ वीस वर्षें याप्रमाणें खानाच्या दरबारीं काढल्यानंतर या पोलो मंडळीला आपल्या मायभूमीस परत जाण्याची इच्छा झाली. आपल्या आप्तेष्टांना व मित्रांना भेटावें असें तर त्यांना वाटत [illegible].

शिवाय खानाच्या मृत्यूनंतर आपणास चीनमध्यें सुरक्षितपणें राहतां येईल कीं नाहीं याचीहि त्यांना धास्ती वाटत होती. परत जाण्याबद्दल खानापाशीं एकदा त्यांनीं गोष्ट काढली पण खानानें मोडता घातला; आणि त्याच्या परवानगीशिवाय तार्तरींतून प्रवास करणें अशक्य होतें म्हणून चांगलीशी संधि केव्हां येईल याची ते वाटच पाहात होते. कर्मधर्मसंयोगानें अशी संधि एके दिवशीं आयतीच चालून आली.

इराण देशचा शहा हा या बड्या खानाचा नातू होता. त्यानें मोंगल घराण्यांतील एका थोर सरदाराच्या मुलीशीं लग्न केलें होतें. पण ती दिवंगत झाल्यामुळें त्याच घराण्यांतील दुसऱ्या एका सरदाराच्या मुलीशीं त्याचें लग्न ठरावयाचें होतें. या मुलीसाठीं मागणी करण्याकरितां इराणच्या पादशहाकडून कांहीं वकील आले होते. हा दुसरा सरदार बड्या खानाचा नातलगच असल्यामुळें त्यानें बड्या खानाजवळ त्या मुलीबरोबर जाण्याकरितां म्हणून पोलोची मदत मागितली. कारण त्या मुलीला खुष्कीच्या मार्गानें धाडण्यापेक्षां जलमार्गानेंच धाडणें जास्त सोईस्कर आणि कमी त्रासाचें होय, असें त्या वकील लोकांचें म्हणणें पडलें; आणि समुद्रावरून प्रवास करण्याचा अनुभव पोलोशिवाय इतरांना नसल्यामुळें या कामीं त्यांचीच मदत घेणें प्राप्त झालें. बड्या खानाला नाहीं म्हणवेना व त्यानें मोठ्या कष्टानें परवानगी दिली.

या प्रवासाकरितां तेरा गलबतें तयार करण्यांत आलीं. पुन्हा मागच्या खेपेप्रमाणेंच, खानानें सोन्याच्या पत्र्यावर आपल्या प्रजाजनांना आज्ञा लिहून दिल्या. त्याचप्रमाणें युरोप खंडांतील राजे लोकांना त्यानें मित्रत्वाचीं पत्रेंहि लिहून दिलीं. सर्व तयारी झाल्यानंतर १२९२ सालीं फोकीनच्या बंदरांतून त्यांचीं तीं चार चार शिडांचीं गलबतें निघालीं. प्रत्येक गलबतावर २५० खलाशी होते. पोलोना रत्नांची एक मोठी पिशवीच नजर केली. तीन महिने सतत प्रवास केल्यानंतर हीं गलबतें जावा बेटास येऊन पोहोंचलीं. पण वादळी हवेमुळें त्यांना पांच महिने सुमात्रा बेटां-

तच अडकून पडावें लागलें. शेवटीं एकदा तेथून निघाल्यानंतर सिलोन बेटास वळसा घालून इराणच्या आखातांत येईपर्यंत जवळ जवळ दोन वर्षें लोटलीं. इराणच्या पादशहानें पाठविलेल्या वकीलांपैकीं दोघेजण या अवधींत मृत्युमुखीं पडले होते. ज्या राजकन्येकारितां हा प्रवास करावा लागला तिची प्रकृति मात्र छान झाली होती. पण ज्या पादशहाकरितां म्हणून या राजकन्येला इतक्या दूरच्या प्रदेशांतून आणलें होतें, तो पादशहा दोन वर्षांपूर्वींच वारला होता; म्हणून त्या पादशहाच्या मुलाबरोबरच तिचें लग्न लावून दिलें! पोलोंनीं या राजकन्येची इतकी काळजी घेतली होती कीं, त्यांनीं तिला अगदीं आपल्या मुलीप्रमाणें वागविलें होतें. ज्या वेळीं ते परत जावयास निघाले, तेव्हां तिला रडूं आवरेना.

मोठ्या कष्टानेंच तिचा निरोप घेऊन पोलोमंडळी तेथून निघाली. इराणांतून ते जे निघाले ते प्रथम खुष्कीच्या वाटेनें म्हणजे मेसॉपोटेमिआ, आशियामायनर हे प्रदेश ओलांडून भूमध्यसमुद्राच्या किनाऱ्यावर येऊन दाखल झाले. त्यांना आतां घराची ओढ लागली होती. घर सोडून त्यांना जवळ जवळ २५ वर्षें होऊन गेलीं होतीं. १२९५ सालीं आपल्या स्वतःच्या मालकीच्या घरींच दरवेशांप्रमाणें हे तिघे पोलो देवडीवर दाखल झाले. त्यांना घरांत कोण घेणार? त्यांना जाऊन दोन तपें लोटल्यामुळें त्यांची आठवणहि पार बुजली होती. घराकडे येत असतां रस्त्यांतील लोकांनीं त्यांना ओळखणें तर शक्य नव्हतेंच; पण प्रवासानें मलीन झालेला त्यांचा तो पायघोळ पोषाख, त्यांची ती लांब दाढी, उंच बांधलेले फेटे पाहून आणि त्यांची निराळे हेल काढून उच्चारिली जाणारी भाषा ऐकून घरांतील लोकांनासुद्धां हे कोण असावेत याबद्दल शंका आली, व त्यांनीं त्यांना घरांत घेण्याचें साफ नाकारिलें. स्वतःच्या मालकीच्याच नव्हे, तर अलोट संपत्ति खर्च करून स्वतः बांधलेल्या घरांतच स्वतःला मज्जाव! पण करावयाचें कसें? घरांतील लोकांनीं तरी यांना घरांत कसें घ्यावयाचें? आज पंचवीस वर्षें

कोणालाच यांचा पत्ता नव्हता. प्रवासास—अत्यंत दूरच्या आणि कष्टमय प्रवासास—गेलेले हे लोक; पंचवीस वर्षांत त्यांचा कांहींच सुगावा नाहीं; तेव्हां ते जिकडे गेले तिकडेच त्यांचें बरें वाईट झालें असावें हीच सर्वांची कल्पना !

'पंचवीस वर्षांपूर्वीं घर सोडून गेलेले पोलो आपणच' अशी घरांतील आणि इतर सन्मान्य लोकांची खात्री कशी पटवून द्यावयाची ? हा प्रश्न पोलो मंडळीपुढें उभा राहिला. शेवटीं त्यांना एक युक्ति सुचली. त्यांनीं एका बड्या मेजवानीचा बेत केला आणि त्यानिमित्त पोलो घराण्यांतली सर्व लहान थोर मंडळी आणि व्हेनिस शहरांतील थोर थोर गृहस्थ यांना बोलाविलें. या प्रसंगानिमित्त त्यांनीं अतिशय उंची पोषाख केला. मेजवानीचा थाटहि अश्रुतपूर्व होता. प्रथम मेजवानीस सुरुवात होण्यापूर्वीं त्यांनीं किरमिजी रंगाचा मऊ सॅटिनचा पोषाख केला होता. मेजवानीस सुरुवात होतांच त्यांनीं हा पोषाख उतरला आणि दुसरा त्याच रंगाचा पण दमास्क कापडाचा पोषाख अंगावर घातला. नंतर त्यांनीं नोकरांस सांगितलें कीं, त्यांनीं उतरविलेल्या पोषाखाची सारखी वांटणी करावी आणि प्रत्येकानें आपल्या वांटणीचा हिस्सा घ्यावा. नंतर मेजवानी चालू असतांच पुन्हां त्यांनीं दमास्क कापडाचा पोषाख अंगावरून उतरून टाकला. पुन्हां पहिल्याप्रमाणेंच करावयास नोकरांना सांगितलें; आणि स्वतः किरमिजी रंगाचा मखमलीचा पोषाख परिधान केला. मेजवानी संपल्यानंतर पुन्हां हाहि पोषाख त्यांनीं काढून टाकिला. नंतर तो पहिल्याप्रमाणेंच वांटून घेण्यास नोकरांना त्यांनीं सांगितलें; आणि ते स्वतः अत्यंत साधा पोषाख करून आले. तेथें जमलेल्या सर्व मंडळींना याचें भारीच आश्चर्य वाटलें. अत्यंत श्रीमंत मनुष्याखेरीज दुसऱ्या कोणाहि मनुष्यास असें करणें शक्य नव्हतें, हें तर उघड दिसत होतेंच. पण 'या दरवेशांजवळ एवढी संपत्ति आली कोठून आणि ज्या दिवशीं हे आले त्या दिवशींचा यांचा पोषाख इतका मलिन आणि फाटका कां म्हणून ?' हें कोडें अद्याप उलगडलें नव्हतें. जेवणखाण

आटोपल्यावर सर्व मंडळी दिवाणखान्यांत जमली. नंतर ज्या पोषाखांत व्हेनिस शहरीं प्रथम आले होते तो पोषाख मार्को पोलोनें तेथें आणविला. त्याची शिवण त्यांनीं हळूहळू उसवली. त्यासरशीं प्रत्येक अंगरख्यांतून रत्नांचा प्रवाहच जणूं वाहूं लागावा, त्याप्रमाणें अगणित रत्नें खालीं ओतलीं गेलीं. त्यांत हिरे, माणिक, पाच, इंद्रनील, वैडूर्य वगैरे सर्वच प्रकारचीं रत्नें चमकत होतीं. तेथें जमलेल्या सर्व लोकांची खात्री झाली व निकोलो पोलो, मॅफिओ पोलो आणि मार्को पोलो यांना आपल्या घरीं पुनः आपलेपणानें राहावयास मिळालें.

याच वेळीं व्हेनिस व जिनोआ येथील लोकांची लढाई जुंपली होती. यांच्यामध्यें १२९८ सालीं एक आरमारी युद्धहि झालें. या युद्धांत मार्को पोलोला एका जहाजावर नेमलें होतें. या आरमाराचा पराजय होऊन मार्को पोलोला शत्रूच्या तुरुंग'त खितपत पडावें लागलें. तथापि तुरुंगांत असतांनाच आपल्या प्रवासांचें वर्णन त्यानें एका लेखकाकरवीं लिहून काढविलें पुढें त्याची सुटका होऊन त्याचें राहिलेलें आयुष्य ऐषआरामांत आणि ऐश्वर्यांत गेल.

त्याचा प्रवासग्रंथ उत्तम पुस्तकांत मोडतो. त्या वेळच्या लोकांना त्यांतील वर्णन इतकें आश्चर्यकारक वाटलें कीं, त्यांचा त्यावर विश्वास बसेना व तें सर्व कल्पितच असावें असें त्यांना वाटलें. तीस कोटी प्रजा ज्या प्रदेशांत पोसली जाते असा सुपीक प्रदेश असेल तरी कसा ? आणि इतकी अगणित संपत्ति त्या देशांत असेल तरी कशी ? पण पुढें ज्यांनीं या खंडांतून प्रवास केला त्यांना आढळून आलें कीं, त्याचीं वर्णनें पुष्कळ अंशांनीं खरीं होतीं. कोलंबसापूर्वी जे साहसी प्रवासी होऊन गेले त्या सर्वांत मार्को पोलो हा अत्यंत श्रेष्ठ होय.

# ३६. टॉमस आल्व्हा एडिसन

गेल्या ५०—६० वर्षांत मनुष्यजातीच्या सुखाकरितां अविश्रांत परिश्रम करणाऱ्या शास्त्रज्ञांपैकीं कोणाचें नांव जर विशेष प्रामुख्यानें जगाच्या पुढें असेल तर तें एडिसनचें होय. संपत्ति, शास्त्रीय शिक्षण इत्यादि सामुग्री फारच बेताबाताची असून केवळ स्वतःच्या खटपटीच्या जोरावर हा वर्तमानपत्रें विकणारा मुलगा लक्षाधीश झाला एवढेंच नव्हे तर त्यानें केलेल्या शोधांचा उपयोग करीत नाहीं असा मनुष्य सुधारलेल्या देशांत तरी निदान सांपडणें फारच कठीण होईल. तारायंत्र, टेलिफोन, विजेचे दिवे, फोनोग्राफ, वीज सांठवून ठेवण्याची बॅटरी असे अनेक शोध एडिसननें लावले. ऐंशी वर्षांचा हा उत्साही शास्त्रज्ञ आपलें संशोधनाचें कार्य शेवटपर्यंत पूर्वी इतक्याच जोमानें करीत असे.

एडिसनचा जन्म ११ फेब्रुवारी १८४७ मध्यें अमेरिकेंतील ओहीयो संस्थानांतील मिलन या गांवीं झाला. एडिसनचा बाप धान्य व लांकडें यांचा व्यापार करीत असे व सांपत्तिक दृष्ट्या त्याची स्थिति प्रथम प्रथम चांगली होती. एडिसन लहानपणापासून अतिशय चौकस होता व नानाप्रकारचे प्रश्न विचारून तो आपल्या आईबापांना भंडावून सोडी. एकदां त्यानें एका कोंबडीला आपलीं अंडीं उबवतानां पाहिलें व लगेच दुसऱ्या दिवशीं कांहीं अंडीं त्यानें मिळवून आणलीं आणि स्वतः तोच प्रयोग करून पाहाण्याचें ठरवलें. अर्थात् तो यशस्वी झाला नाहीं हें सांगावयास नकोच !

मिलन हें गांव एका तळ्याच्या कांठीं असल्यामुळें एडिसनला लहानपणापासून पोहोण्याचा नाद असे व त्यामुळें त्याची प्रकृति अगदीं निकोप होती. लहानपणचीं पहिलीं कांहीं वर्षें सुस्थितींत गेल्यानंतर एडिसनच्या बापाचा धंदा चांगलासा चालेना व त्याला आपलें ठाणें मिलन येथून उठवून पोर्ट ह्यूरन येथें न्यावें लागलें. या वेळीं एडिसन ७ वर्षांचा होता व शाळेंत जाण्यास त्यानें नुकतीच सुरवात केली होती. ह्यूरन येथें आल्यानंतर थोडी काटकसर करण्याकरतां म्हणा किंवा एडिसनच्या



टॉमस आल्व्हा एडिसन्

शिक्षणावर अधिक लक्ष ठेवावें म्हणून म्हणा, त्याच्या बापानें त्याला शाळेंतून काढलें व त्याच्या आईच्या देखरेखीखालीं त्याचा अभ्यास घरींच सुरू झाला. त्याची आई पूर्वी मास्तरीणच असल्यामुळें तिनें तें काम फारच आस्थापूर्वक केलें व विशेषत: एडिसनच्या चौकस बुद्धीला योग्य दिशा दाखवून दिली. एडिसनला वाचनाचा अतोनात नाद असे व तो दहा वर्षांचा असतांनाच जगाचा इतिहास, शास्त्रीय कोश इत्यादि मोठमोठीं पुस्तकें त्यानें वाचून टाकलीं होतीं.

बारा वर्षांचा असतांनाच आपल्या आईबापांना थोडी फार मदत करण्याच्या इच्छेनें एडिसननें रेल्वेमध्यें नोकरी धरली व क्वेबेकपासून शिकॅगोपर्यंत जाणाऱ्या आगगाडींत वर्तमानपत्रें, फळें इत्यादि गोष्टी विकण्याचें काम तो करूं लागला. हें काम करून शिवाय तो आपल्या गांवाहून भाजी, लोणी, अंडीं वगैरे पदार्थ डेट्रॉइट या वाटेंत लागणाऱ्या स्टेशनावर विकूनही थोडाफार फायदा मिळवी. शिवाय युरोपांतून अमेरिकेंत वसाहत करावयास येणाऱ्या लोकांकरतां जेव्हां स्पेशल गाड्या सुटत तेव्हां तो एक दोन मदतनीस हाताखालीं घेऊन बरेच पैसे मिळवीत असे.

या पैशांपैकीं कांहीं पैसे आईबापांकडे पाठवून बाकीचे पैसे एडिसन रासायनिक उपकरणें, प्रयोगाकरितां लागणारीं रसायनें, शास्त्रीय ग्रंथ व नियतकालिकें हीं विकत घेण्यांत खर्च करी व आगगाडींतल्या सामानाच्या डब्यांतच त्यानें आपली प्रयोगशाला स्थापली होती. काम करून जो कांहीं वेळ मिळेल तो सर्व रासायनिक व विद्युद्विषयक प्रयोग करण्यांत घालवावयाचा असा एडिसनचा क्रम होता. एके दिवशीं मात्र या त्याच्या ज्ञानलालसेबद्दल त्याला चांगलीच शिक्षा झाली. फॉस्फरसचे कांहीं प्रयोग करीत असतांना या ज्वालाग्राही पदार्थाचा एक तुकडा एडिसनच्या हातून आगगाडीच्या लांकडी तक्तपोशीवर पडला व लवकरच त्यानें पेट घेतला. आग लागली ही गोष्ट आगगाडीच्या गार्डच्या लक्षांत आल्यामुळें त्यानें व एडिसननें मिळून ती विझवली, पण याचा परिणाम मात्र असा झाला कीं, पुढच्या स्टेशनवर एडिसन व त्याची प्रयोगसामुग्री यांची आगगाडींतून हकालपट्टी झाली व बक्षीस म्हणून एडिसनला जी थोबाडींत मिळाली तीमुळें त्याचा कान जन्माचा अधू होऊन बसला.

अशा रीतीनें आगगाडींतली नोकरी गेल्यावर एडिसनन तारमास्तराच काम शिकण्याचा निश्चय केला व घरींच त्यानें सर्व सामुग्रीची जुळवाजुळव करून आपल्या एका मित्राच्या घरापर्यंत एक छोटेसें तारायंत्र सुरू

देखील केलें. रेल्वेंतील तारखात्यांत नोकरी मिळावी ही त्यावेळीं त्याची अतिशय उत्कट इच्छा होती व त्या दृष्टीनें त्याचे प्रयत्नही सुरू होते. लवकरच त्याला कॅनडामधील स्टॅटफर्ड या गांवीं तारमास्तराची नोकरी मिळाली. तेथें रात्रपाळीच्या मास्तराला, तो जागा आहे हें दाखवण्याकरितां, दर ३० मिनिटांनीं मुख्य ऑफिसला खुणेचा संदेश पाठवावा लागे. एडिसनला ही पद्धत अर्थातच पसंत न पडून त्यानें आपल्या सुपीक डोक्यांतून एक कल्पना काढली व घड्याळ आणि तारायंत्र यांचा मोठ्या खुबीनें संबंध जोडून दर ३० मिनिटांनीं खुणेचा संदेश आपोआपच जात राहावा अशी योजना केली. पण लवकरच खुणेचा संदेश नियमितपणें येत असून देखील विचारलेल्या प्रश्नांना उत्तरें नीट येत नाहींत असा संशय आल्यावरून मॅनेजरनें या प्रकरणाचा काळजीपूर्वक शोध केला व एडिसनची युक्ति त्याला दिसून आल्यामुळें त्यानें त्याला तावडतोब नोकरीवरून दूर केलें !

यानंतर एडिसननें निरनिराळया ठिकाणीं तारमास्तराची नोकरी केली. पण कोठें सहा महिने, कोठें एक वर्ष यापेक्षां जास्त वेळ एडिसन एका जागीं राहिला नाहीं व याचें कारण म्हणजे आहे त्या स्थितींत समाधान न मानतां त्यांत कांहींना कांहीं तरी सुधारणा करून घ्यावी ही त्याच्या मनाची धडपड होय. पगारांतून उरतील ते सर्व पैसे आपल्या प्रयोगशालेकडे तो खर्च करीत असे व झोंपेचा वेळ खेरीज करून उरलेला सर्व वेळ तो निरनिराळे प्रयोग करण्यांत घालवी. एकाच तारेचा उपयोग करून एकाच वेळीं दोन किंवा चार निरनिराळे संदेश इकडून तिकडे कसे पाठवतां येतील हें कोडें सोडविण्याचे त्याचे प्रयत्न चाललेले होते व तें सुटलें तर तारवाल्या कंपन्यांकडून आपल्याला बरेच पैसे मिळण्यासारखे आहेत अशी त्याला आशा होती कांहीं वर्षें अविश्रांत परिश्रम करून त्यानें हा प्रश्न सोडवला व त्याला त्याबद्दल न्यूयॉर्कमधील एका तारवाल्या कंपनीकडून ४००० डॉलर मिळाले !

यापुढें एडिसनची सांपत्तिक स्थिति एकसारखी सुधारत गेली. त्यानें स्वतःकरितां एक स्वतंत्र प्रयोगशाला व एक कारखानाही स्थापन केला व तारायंत्रासंबंधींचीं सर्व कामें तो तेथें करूं लागला. तार पाठवण्याचें व घेण्याचें काम यांत्रिकरीत्या करण्याचे शोध लावून दर सेकंदाला पाठवल्या जाणाऱ्या शब्दांची संख्या एडिसननें अतोनात वाढविली. त्याचप्रमाणें 'बेल'नें शोधून काढलेल्या टेलिफोनमध्येंही पुष्कळ सुधारणा करून त्यांतील आवाज स्पष्ट ऐकूं येईल अशी त्यानें योजना केली.

लवकरच एडिसनच्या प्रयोगशाळेचा व कारखान्याचा पसारा इतका वाढला कीं, न्यूयॉर्कमधली आपली जागा त्यानें सोडून दिली व तेथून पंचवीस मैलांवर मेनलो पार्क नांवाच्या ठिकाणीं चार पांच भव्य इमारती बांधून तेथें आपलें बस्तान बसविलें. टेलिफोननंतरचा एडिसनचा जगद्विख्यात शोध म्हणजे फोनोग्राफ हा होय. एका मेणाच्या नळकांड्यावर आवाजांच्या लहरीबरहुकूम चरे पाडून पुन्हां तोच आवाज उत्पन्न करतां येईल ही कल्पना अकस्मात् एडिसनच्या मनांत आली व लवकरच त्यानें ती मूर्त स्वरूपांतही आणली. हल्लीं फोनोग्राफ ही वस्तू आपल्या इतकी सरावांतली झाली आहे कीं, त्याचें फारसें कौतुक वाटत नाहीं; पण त्यावेळीं सर्व अमेरिकेंत एडिसनच्या या शोधाचा अतिशय गौरव झाला व प्रत्यक्ष अमेरिकेच्या प्रेसिडेंटनीं एडिसनला बोलावून नेऊन फोनोग्राफ कसा चालतो हें त्याच्याकडून समजावून घेतलें.

एडिसन यानें कितीतरी लहानमोठे शोध लाविले आहेत परंतु त्याला जर कोणी असा प्रश्न केला कीं, "तुमचा सर्वांत जास्त महत्त्वाचा शोध कोणचा?" तर नेहमीं एकच ठराविक उत्तर मिळे, "माझा विजेचा दिवा व तो लावण्याची पद्धति." अशा रीतीनें अभिमानपूर्वक व ठासून उत्तर देणाऱ्याची योग्यता तशीच अपूर्व असली पाहिजे यांत शंका नाहीं. एडिसन ज्या पद्धतीनें दिवे बनवीत असे ती त्यानें इतकी पूर्णावस्थेस नेलेली होती कीं, तींत सुमारें वीस वर्षेंपर्यंत कोणीही कस-

ल्हीही सुधारणा करूं शकला नाहीं. खरोखर पाहिलें तर या शोधाचें महत्त्व तसेंच जबर आहे, कारण विद्युत्शक्तीचें आकलन आणि विजेचा दिवा यांच्या अभावीं सध्याची यांत्रिक प्रगति कदाचित् झालीच नसती.

कित्येक शतकेंपर्यंत गोडें तेल व अलीकडे रॉकेल तेल दिव्यामध्यें जाळण्यांत येतें. आपल्याकडे अद्यापि कांहीं शहरांखेरीज सर्व ठिकाणीं दिव्यांत या तेलांचाच उपयोग करण्यांत येतो. अमेरिकेंत १८०४ मध्यें गॅसचे दिवे प्रथम प्रचारांत आले, व याची पुढची पायरी म्हणजे विद्युत्-शक्तीचें प्रकाशांत रूपांतर करणें ही होय.

एकाद्या धातूच्या बारीक तारेंतून विजेचा प्रवाह चालू ठेविला तर तींत उष्णता उत्पन्न होते ही गोष्ट बरेच दिवस माहीत होती; परंतु प्रवाहाचा जोर वाढून तारेचें उष्णमान वृद्धिंगत पावल्यास तिच्यापासून झग-झगीत निखाऱ्यासारखा प्रकाश मिळूं शकतो. हा शोध ग्रोव्ह यानें १८४० सालीं लाविला. त्या दिवसांत विद्युत्प्रवाह उत्पन्न करण्याचें सर्वोत्कृष्ट साधन म्हणजे रासायनिक द्रव्यांच्या साहाय्यानें चालणाऱ्या विजेच्या बॅटरीज हेंच होतें, आणि यामुळें तो महत्त्वाचा शोध अर्थातच त्या काळीं तरी प्रयोगावस्थेंतून बाहेर पडूं शकला नाहीं. १८६६ सालीं डायनामो नामक यंत्राच्या साहाय्यानें वाफेच्या शक्तीनें विद्युत्शक्तींत सुलभ रीतीनें रूपांतर करतां येऊं लागलें, तेव्हांपासून झगझगीत तारेचे विजेचे दिवे तयार करण्याच्या कल्पनेस पुन्हां एकदा चालन मिळालें.

बारीक तारेंतून जात असलेला विद्युत्प्रवाह वाढविला म्हणजे त्यांत जास्त जास्त उष्णता उत्पन्न होऊन तार प्रथम लाल, नंतर पिवळट व शेवटीं पांढरी दिसूं लागून तिचा स्वच्छ प्रकाश पडूं शकतो ही गोष्ट खरी. परंतु बहुतेक पदार्थ उष्ण होऊन प्रकाश देऊं लागण्याचे अगोदरच त्यांच्या घनावस्थेचा नाश होतो, व त्यांना द्रवरूप प्राप्त होतें. प्रखर उष्णमानांत सुद्धां द्रवरूप धारण न करणारे पदार्थ फार

थोडे आहेत. त्यांतील मुख्य म्हणजे कोळसा; त्याच्या खालोखाल प्लॅटिनमधातूचा नंबर लागतो. दुसरी अडचण अशी कीं, हवेंतील ऑक्सिजन वायूचा तारेच्या तीव्र उष्णमानामुळें तिजवर सुलभ रीतीनें घडून येणारा परिणाम फार घातुक असतो, व त्यामुळें प्रकाशमान झालेली तार एकदोन पळेंसुद्धां टिकाव धरूं शकत नाहीं; तिचे तुकडे तुकडे होऊन जातात. हवेचा संसर्ग येऊं नये म्हणून तार एका कांचेच्या बाटलींत ठेऊन तिच्यांतील सर्व हवा काढून टाकावी हा राजमार्ग वाटतो तितका सोपा नाहीं. सध्यां बहुशः याचेंच विजेच्या दिव्यांत अवलंबन केलेलें असतें, पण संपूर्ण निर्वात स्थिति कशी निर्माण करावयाची याबद्दल एडिसन यानें फारसे परिश्रम घेतलेले माहीत नाहींत. परंतु अति उष्णमानांत न वितळणारे व सतत कांहीं काळपर्यंत न तुटतां प्रकाशमान होणारे तंतू कोणच्या पदार्थांचे तयार करतां येतील याबद्दल एडिसननें फार अमूल्य शोध लावून ठेविले आहेत.

कोळसा व प्लॅटिनम या दोन्हीं पदार्थांत प्रखर उष्णमान सहन करण्याची ताकद आहे तरी दोघांमध्यें व्यावहारिक दृष्ट्या फार अंतर आहे. प्लॅटिनम धातू दुर्मिळ असून तिची किंमत सोन्यापेक्षां किती जास्त असते; कोळशाला सकृद्दर्शनीं मुळींच किंमत नाहीं. प्लॅटिनमची पाहिजे तितकी बारीक तार काढणें शक्य आहे; कोळशाची तार काढणें हें साधारण अशक्य कोटींतीलच. अशा परिस्थितींत एडिसननें अविश्रांत मेहनत करून विजेच्या दिव्यांत वापरण्याजोगे व मजबूत धागे कसले असावेत व ते कसे करावे हें शोधून काढलें तर त्या शोधांची किंमत अपार नाहीं असें कोण म्हणेल ?

१८७७ सालीं या बिकट कामास हात घातल्यापासून एडिसनला दुसरें कांहीं एक सुचेनासें झालें. एका वर्षांत त्यानें दीड लाख रुपये प्रयोगाप्रीत्यर्थ खर्चीं घातले तरी तें कोडें त्याला उमगलें नाहींच. त्याची प्रयोगाची मुख्य दिशा म्हणजे भिन्नभिन्न पदार्थांचे तंतुवजा धागे घेऊन ते कांहीं विशिष्ट पद्धतीनें जाळून त्यांच्यापासून कोळशाचे धागे निर्माण

करावयाचे, व निरनिराळ्या परिस्थितींत विद्युत्प्रवाहानें तापविल्यावर कोणचा धागा जास्त वेळ टिकाव धरून प्रकाश देत राहातो ह तपासून पहावयाचें. कित्येक प्रयत्नांतीं कापसाचा धागा वापरून पाहाण्याची कल्पना एडिसनला सुचली. अखेरीस प्रयोगशाळेंत मोठ्या आयासानें त्यानें एक धागा अगदीं मनासारखा तयार केला, परंतु त्याचा दिवा करून पाहाण्याकरितां त्यांतून वीज सुरूं केल्याबरोबर तो जळून त्याचे तुकडे झाले. अशा स्थितींत कोणाचेहि हातपाय गळाले असते. परंतु एडिसन अतिशय करारी होता; यश येईपर्यंत झोंप घेणार नाहीं अशी शपथ घेऊन त्यानें ताबडतोब पुन्हां कामास सुरवात केली. दीड दिवसांनीं दुसरा एक धागा तयार झाला परंतु दिव्यांत बसवितांना मध्येंच एक वाऱ्याची झुळूक आली व त्यांतच त्या धाग्याचा शेवट झाला. अशा वेळींच कौशल्याची व चिकाटीची खरी परीक्षा होते. पुन्हां उल्हासानें परिश्रम करून तिसऱ्या दिवशीं अखेरीस एक धागा त्यानें तयार केला. त्यास दिव्यांत बसाविलें व विद्युत्प्रवाह सुरूं केल्याबरोबर दिव्याचा प्रकाश पडूं लागला. या आनंदानें बेहोष होऊन तीन दिवसांच्या सतत मेहनतीनें व जाग्रणानें थकून गेलेल्या एडिसनला प्रयागशाळेंतच झोंप लागली. कांहीं काळानें जागा झाल्यावर दिवा अद्यापि जळत आहे हें पाहून त्याचा आनंद द्विगुणित झाला. सध्याच्या युगांतील विजेच्या दिव्यांचा हाच जन्मकाल. एडिसनचा पहिला दिवा सतत अठ्ठेचाळीस तास जळल्यावर त्यांतील धागा तुटून पडला.

आज आपण विजेचा दिवा किती सहज रीतीनें लावतों आणि या दिव्यामुळें आपल्याला किती तरी सुखसोई प्राप्त झाल्या आहेत! पण कोळशाच्या धाग्यांचा विजेच्या दिव्यांत उत्तम रीतीनें उपयोग करितां येतो ही गोष्ट एडिसननें सप्रयोग सिद्ध करून दिली.

याप्रमाण शक्याशक्यतेचा महत्त्वाचा प्रश्न मोठ्या बुद्धिसामर्थ्यानें सोडविल्यावर एडिसननें बांबूपासून धागे निर्माण करण्यास सुरवात केली.

हवा तसा बांबू मिळविण्याकरितां त्यानें चीन, जपान, ब्राझील, जमेका, हिंदुस्थान, सीलोन इत्यादि देशांतील अनेक जातींच्या बांबूंवर प्रयोग करून पाहिले. ह्या पद्धतीनें केलेले दिवे सतत वीस वर्षेंपर्यंत वापरण्यांत आल्यावर टंगस्टन नांवाच्या धातूपासूनसुद्धां धागे करतां येतील व कोळ-शाच्या धाग्यापेक्षां या धाग्यांचा-तारांचा विजेच्या दिव्यांत उपयोग होईल असें आढळून आलें. तरी पण प्रारंभ केल्याचें सर्व श्रेय एडिसनलाच दिलें पाहिजे.

यापुढचा एडिसनचा शोध म्हणजे सिनेमाटोग्राफ हा होय. फोनो-ग्राफचा शोध लागून कानाकरितां जी सोय झाली तीच डोळ्यांकरतांहि व्हावी या हेतूनें विचार करतां हालचाल करणाऱ्या व्यक्तीचे भराभर फोटो घेऊन ते जर एकामागून एक डोळ्यासमोरून नेले, तर ती हाल-चाल जशीच्या तशी आपल्या नजरेस पडूं शकेल अशी कल्पना एडिस-नच्या डोक्यांत आली. यासंबंधींचे प्रयोग करून सेल्यूलॉइडच्या फिल्मवर फोटो घेऊन एडिसननें सिनेमाटोग्राफ तयार केला. नंतर फोनोग्राफशीं त्याचा संयोग करून बोलणारीं चलच्चित्रें पडद्यावर कशीं दाखवितां येतील यासंबंधींचे प्रयोग करण्यास एडिसननें सुरवात केली!

वर दिलेल्या त्रोटक हकीगतीवरून एडिसनच्या कल्पकतेची व चिकाटीची थोडीबहुत कल्पना येईल. वर दिलेले शोध हे केवळ सामान्य मनुष्यांना समजतील असे आहेत. याशिवाय किती तरी बारीक सारीक शोध एडिसननें लावले आहेत, पण ते विशिष्ट धंद्यांतल्या किंवा शास्त्रां-तल्या लोकांच्याच उपयोगाचे असल्यामुळें इतरे जनांना त्याची फारशी माहिती नाहीं. एकट्या व्यक्तीनें मनुष्यजातीच्या सुखसोईकरतां जे हे शेंकडों शोध लावले ते पाहिले म्हणजे एडिसनला अमेरिकेंत "मेन्लो पार्कमधील जादूगार" हें नांव देतात तें सार्थ नाहीं असें कोण म्हणेल ?

## ३७. बाळ व आरसा

पुढें आरसा घेउनि बसला होता खेळत बाळ
भान राहिलें नाहीं त्याला झाली सायंकाळ ॥ १ ॥

रूप स्वताचें पुढतीं बघुनी कौतुक वाटे फार
बाळ दुजें हें कुठुनी आलें ? आला प्रश्न समोर ॥ २ ॥

हांसे त्याला पाहुनि; तेंही बाळा पाहुनि हांसे
रागाचें त्या समयीं आलें बाळा भरतें खासें ॥ ३ ।

वेडावी त्या तें वाखोल्या, उलटुनि दावी त्याला
बघतां परि हें उरली नाहीं सीमा संतापाला ॥ ४ ॥

लाली चढली डोळयावरतीं भालीं आठ्या पडल्या
शब्द फुटेना तोंडावाटें कंप शरीरा सुटला ॥ ५ ॥

आरशांतलें बाळ समयिं त्या झालें क्रोधें लाल
बघतां चढला त्वेष अधिकही, मुष्टी वळवी बाळ ॥ ६ ॥

बाळ दुजेंही मुष्टी वळवी-झाली मारामारी
समान दोघे असतां हरली परि बाळाची स्वारी ॥ ७ ॥

गंगायमुना डोळयांमधुनी गालांवरती आल्या
स्फुंदस्फुंदुनि बाळ रडे मग, दिसे न कांहीं त्याला ॥ ८ ॥

रडें ऐकुनी धांवत आली मग बाळाची आई
गोंजारोनी हृदयीं धरुनी किती चुंबनें घेई ॥ ९ ॥

अधिक उमाळा आला बाळा रुद्ध कंठही झाला
मिठी मारुनी तिच्या गळयाला बोले तो आईला ॥ १० ॥

" आई, आई तूं बघ गे
दुष्ट बाळ आरशामागें
मज वाकोल्या किती दावी
परोपरीनें वेडावी ॥ ११ ॥

मला मारलें कीं त्यानें
काय तयाचें हें करणें
शोध शोध आई त्याला
खरपूस मार द्यायाला " ॥ १२ ॥

समजुत करुनी उगी तयाला केलें मग मातेनें
चुंबन मिळतां मुख बाळाचें फुललें आनंदानें ॥ १३ ॥
फूल हांसण्या लागे तेव्हां आई त्याला देई
तोच आरसा–म्हणे तयाला, " बाळ दुजें हें पाही " ॥ १४ ॥
खेळूं लागे बाळ तयाशीं जेव्हां आनंदानें
वदली माता तेव्हां अपुल्या पुत्राला प्रेमानें ॥ १५ ॥
" ज्यानें तुजला मघा मारलें तेंच असें हें बाळ
कसा सांग मग त्याच्याशीं तूं सुखें खेळशी खेळ ॥ १६ ॥
रागवतां तूं रागवतें, हंसतांना तूं हंसतें
मार तयाला द्याया जातां मार उलटुनी देतें" ॥ १७ ॥

* * * *

जैशी वृत्ती तुझी जगाशीं तशी जगाची तुजशीं
चित्तीं आपुल्या गोष्ट धरीं तूं आईची ही खाशी ॥ १८ ॥
प्रेमानें तूं वाग सर्वदा सकलांशीं या जगतीं
आनंदाविण अन्य न कांहीं दिसेल तुजला पुढती ॥ १९ ॥

# ३८. पाऊणशें रुपयांचें लोणचें

याच वर्षी फिरत फिरत आम्ही सातारा जिल्ह्यांत गेलों. त्या दिवशींचा मुक्काम कोरेगांवीं करण्याचें ठरलें होतें. बैलगाड्या रात्रींच पुढें निघून गेल्या होत्या. आम्ही मात्र नित्याप्रमाणें सकाळीं उठून घोड्याच्या गाडींत बसून निघालों. रात्रीं उतरलेल्या मुक्कामीं चांगलें पाणी नसेल तर वाटेंत नदी किंवा चांगला ओढा लागेल तेथें प्रातर्विधि उरकून घेण्याची चाल असे. कोरेगांवच्या अलीकडे 'वसवा' नदीवर आम्हीं सर्वांनीं प्रातर्विधि उरकले. आज उशीर झाला होता म्हणून जवळ असलेल्या डब्यांतून आम्हीं दोघांनीं थोडेसें फराळाचें खाऊन बाकी राहिलेलें फराळाचें शिपाई व कोचमन यांच्या स्वाधीन करून "तिकडे जाऊन खा व डबा घांसून आणा," असें मीं सांगितलें.

इतक्यांत सांगितलें कीं, "आज उशीर झाल्यामुळें चालणें झालें नाहीं, तर असा थोडा सडकेनें पुढें होतों. तीं माणसें आलीं म्हणजे तूं गाडी जोडून लवकर ये."

पुढें जाणें झाल्यावर मी करमणुकीकरितां म्हणून तेथें असलेला घोड्याचा चाबूक हातांत घेऊन जवळच एक आंब्याचें ठेंगणें झाड होतें तेथें गेलें व चाबकानें दोन तीन फटकारे मारले. त्यांत पांच पंचवीस कैऱ्या पडल्या, पण तेवढ्यानें तृप्ति न होतां आणखी पाडाव्यात म्हणून जोरानें जो फटकारा मारला, त्यासरशीं चाबकाचा बारीक शेवट हातांतील छंदाला अडकून चाबकाच्या जोरानें छंदहि वर उडून गेलेला लागलीच समजून आला; पण वरून तो कोठें पडला हें दिसलें नाहीं. मीं आणि शिपायांनीं झाडाखालीं आसपास पुष्कळ शोध केला; पण आमचा शोधणाराचाच कीं काय, त्याजवर चुकून पाय पडून तो वाळूंत गेला किंवा झाडावरच कोठें अडकून राहिला, काय झालें कोण जाणे ? पुष्कळ शोधला, पण सांपडला नाहीं खरा !

इतक्यांत गाडी तयार होऊन आली. तींत बसून मी पुढें चाललें. आतां जवळ काय सांगावें ? छंद हरवल्याबद्दल काय वाटेल ? आपण आंबे काढण्याचा लोभ धरला हें चांगलें केलें नाहीं, असा पश्चात्ताप पावून भीति वाटली. इतक्यांत एक मैल गाडी आली, तरी स्वतःची गांठ पडली नाहीं. तेव्हां मी घाबरलें, व माझ्या वेडेपणामुळें व नादिष्ट-पणामुळें स्वतःला अशा उन्हाच्या वेळीं किती तरी चालावें लागलें, याबद्दल मला फार वाईट वाटलें. पण उपयोग काय ? दुसऱ्या मैलावर स्वतःची गांठ पडली व गाडींत बसणें झालें. गाडी चालू झाल्यावर "आज माझ्याकडून एक मोठी चूक झाली आहे," वगैरे छंदाची हकीकत मीं सांगितली. सर्व ऐकून घेतल्यावर बऱ्याच वेळानें व शांतपणानें म्हटलें, "लोकांचे आंबे तूं न विचारतां पाडलेस हें वाईट केलेंस याबद्दल तुझी तुला शिक्षा व्हावी व आठवण रहावी कीं, पुनः असें करूं नये म्हणून तुझा छंद हरवला आहे. मी त्या छंदाचा शोध करणार नाहीं व पुनः नवाहि करणार नाहीं, म्हणजे आठवण राहील."

हें बोलणें अगदीं नेहमीं सारखें चाललें होतें पण ही गोष्ट आवडली नाहीं असें मुद्रेवरून दिसत असल्यामुळें हें साधें भासणारें बोलणें मला शिक्षेसारखें वाटलें. जास्त राग येण्यास जागा होऊं नये म्हणून मी तो सर्व दिवस आपलें नित्याचें काम न चुकतां खिन्न मनानें करीत होतें. रात्रीं जेवावयास बसल्यावर नेहमींसारखें पण ब्राह्मणाला हांक मारून म्हटलें, "बजाबा, आज सकाळच्या कैऱ्यांचें पाऊणशें रुपयांचें लोणचें वाढावयास तरी आण!"

तो बिचारा काय आणील ? येवढेंसें तोंड करून उगीच उभा राहिला. लोणचें केलें होतें कोणी ? कैऱ्या सकाळपासून जागच्याजागीं पडल्या होत्या. सकाळपासून त्या आंब्याकडे नुसतें पहाणें देखील शिक्षे-प्रमाणें वाटे. कोणीच कांहीं बोलत नाहीं व लोणचेंहि कोणी आणीत नाहीं, हें पाहून मला सांगितलें, "दुसऱ्या गोष्टी ध्यानांत ठेवाव्या, पण छंद हरवला यांत इतकें खिन्न होण्याचें कारण नाहीं. माझ्याकडूनहि आज

तुझ्यासारखीच गोष्ट घडून आली आहे. आज दुपारीं माझी तपकिरीची डबी कोठें पडून हरवली. माझा एक जिन्नस हरवला व तुझा एक जिन्नस हरवला. तूं म्हणशील ती जस्ताचीच होती, तिची किंमत काय? किंमतीचा विचार या वेळीं न करतां उपयोगाचे दृष्टीनें करावा. माझा जिन्नस जास्त उपयोगाचा होता; कारण त्यावांचून अडेल. जिन्नस हरवणें म्हणजे सावधपणा व हुषारी कमी, एवढाच दोष येतो. तो न येण्यास जपावें हें बरें. पण त्यावांचून सगळा दिवस इतकें खिन्न कां व्हावें? हंसून-खेळून समाधानानें रहावें म्हणजे दुसऱ्यालाहि बरें वाटतें."

झालें. यावर पुनः त्या हरवलेल्या जिनसाबद्दल नांवहि काढलें नाहीं.

छंद= हातांतील एक दागिना.

## ३९. शिवराजदर्शन

गडावर जाऊं । शिवराज दर्शना लाहूं ॥ ध्रु० ॥

भुललों, पूर्व विसरलों सारें
अंगीं भरलें नूतन वारें
मूर्खत्वाचे तुटती तारे
सत्य तें पाहूं १

आली नयनांवर अंधारी
न दिसे, न कळे स्वकर दुपारीं
सहजच भिस्त परांवर सारी
स्वरुपां पाकूं २

खान पराचें, पान पराचें
भान, ज्ञान, स्थान पराचें
उरलें अंतीं काय स्वतःचें
शोधता धावूं ३

परतेचा दृढ घेरा पडला
स्वभाव त्या योगें अवघडला
चिंताभृंग मनाला जडला
घालवूं बाऊ ४

सद्गुरूविना सोय न दुसरी
व्यसनसागरीं ती एक तरी
निर्भय पैलतडीला उतरी
चला त्या धावूं ५

आमचा गुरु श्री शिवराणा
पुनरुज्जीवन हेतु पुराणा
महाराष्ट्रवीर्याचा बाणा
संकटीं बाहूं ६

देह तयाचा, जीव तयाचा
नेत्र, श्रवण, तयाची वाचा
सर्व तयाचें, ज्याचें त्याच्या
कारणीं लाऊं ७

घालूं लोटांगण तच्चरणीं
पाहूं रूप तयाचें नयनीं
लावूं जीव तद्गुणश्रवणीं
तद्यशा गावूं. ८

# ४०. शाप नव्हे वर

युवराज दशरथ महान् योद्धा असून अतुल पराक्रमी व ज्ञानी असल्यामुळें तो राजा झाल्यावर सुज्ञ राज्यकर्त्यांमध्यें त्याला अग्रपद मिळालें. त्याच्या राज्यांत धनधान्यसमृद्धि नांदूं लागली. रोगराईचें नांवहि ऐकूं येईना. अन्तःशत्रु औषधालाहि नव्हते. परचक्राची गोष्टच नव्हती. त्याची सर्व प्रजा संतुष्ट व सुखी असून त्याचें सर्व लक्ष राज्यवैभव वाढविण्याकडेच लागलेलें असे. तो विनोदानेंहि खोटें भाषण करीत नसे व शत्रूंनाहि कठोर शब्द बोलत नसे.

एकदा वसंतऋतूचा बहर आलेला पाहून मृगयेस जाण्याची कल्पना त्याला आली. मृगयाविहारांत होणाऱ्या व्यायामामुळें शरीर काटक होतें, चपल होतें, सुटसुटीत होतें व सहनशील होतें. धावत्या सावजावर नेम मारावा लागत असल्यामुळें शरसंधानकलेचा चांगला अभ्यास होतो; शिवाय रानावनांतल्या पशूंच्या चर्या क्रोधानें व भयानें कसकशा पालटतात हें कळून येतें; किंबहुना शिकार करण्यानेंच पशुपक्ष्यादिकांच्या स्वभावाचें सम्यक् ज्ञान करून घेतां येतें; इत्यादि हितकर गोष्टी मनांत आणून दशरथ मृगयेस निघाला. त्यानें मृगयावेष धारण केला. अंगांत झाडाच्या पाल्याप्रमाणें हिरव्या रंगाचें चिलखत चढवून गळ्यांत त्यानें धनुष्य अडकविलें. त्याचा घोडा भरधांव चालला असतां त्याचीं कुंडलें लुद्लुद् हलतांना दिसत. शिकारी कुत्रे, जाळीं वगैरे बरोबर घेऊन शिकारी पुढें गेले होतेच. तिकडेच हरणें, पक्षी, गवे, रानडुकर इत्यादि प्राण्यांनीं भरलेल्या अरण्यांत तो शिरला व मृगांचा पाठलाग करूं लागला. हरिणी जीव घेऊन पटापट उड्या मारीत पळूं लागल्या; पण घास चळघत असलेलीं हरिणशावकें हरिणींना बिलगून मध्येंच लुडबुडूं लागल्यानें त्यांना अडथळा होऊं लागला. हरिणींच्या व राजांच्या मध्यें हरिण येऊन त्यांचा जीव वांचवूं लागले. तें पाहून राजाचें अंतःकरण द्रवलें व कर्णापर्यंत खेचलेला बाण त्यानें परत घेतला.

नंतर घोड्यावरून खालीं वांकून तो झाडाला टेकून बसलेल्या रानडुकरांवर प्रहार करूं लागला. तेहि डोक्यावरचे केस उभारून त्याच्यावर हल्ला करण्याचा विचार करतात तोंच ते तेथल्या तेथें मरून पडूं लागले. इतक्यांत एक गवा दशरथावर धांवून आला असतां, त्याचा डोळाच दशरथानें शरानें विद्ध केला; त्यासरशीं तो प्राणी प्रथम भूमीवर दाणकन् आदळला व त्याच्या नेत्रांत घुसलेला तीक्ष्ण बाण आरपार जाऊन मग खालीं पडला.

याप्रमाणें राजाला मृगयेनें वेडावून सोडिलें. मृगयाविहार झाल्यावर ती रात्र त्यानें तेथेंच रानफुलांच्या शय्येवर स्वस्थ झोंपून घालविली.

दुसऱ्या दिवशीं पहाटेस उठल्यावर दशरथानें मृगयेस पुनः प्रारंभ केला व अश्वारूढ होऊन एका हरिणीच्या मागें लागून तो तमसा नदीवर आला. त्याचे अनुचर मागें राहिले होते. तेथें तीरावर कोणी एक मनुष्य पाण्यानें घडा भरीत असतां त्याचा होणारा गुड्गुड् असा ध्वनि राजाला दुरून ऐकूं आला. तो शब्द हत्तीचा असावा असें त्यास वाटलें आणि शब्दाचे अनुरोधानें त्यानें त्याच्याकडे नेमका बाण सोडला. वस्तुतः रानहत्तीवर शरसंधान करणें अयोग्य; शास्त्रानें त्याचा निषेध केला आहे. पण या प्रसंगीं राजानें शास्त्राज्ञेचें उल्लंघन केलें. सुज्ञ पुरुषहि प्रसंगीं भावनावश होऊन विपरीत कर्म करितो याचें हें उदाहरण होय.

दशरथाचा बाण सूं सूं करीत इष्टस्थळीं जाऊन पोंचतांच ‘ मेलों हो मेलों ’ अशी हृदयभेदक किंकाळी त्याच्या कानीं पडली. तो लगेच तेथें धांवत गेला व पाहतो तों, कोणी मुनिपुत्र उदकानें कुंभ भरीत आहे व त्याच्या हृदयांत बाण रुतला आहे असें त्याला आढळून आलें. त्याची ती शोचनीय अवस्था पाहतांच तो बाण जणूं आपल्याच काळजांत घुसल्यासारखें राजास दुःख झालें. तसाच तो घोड्यावरून खालीं उतरला आणि त्या ऋषिकुमाराला ‘ तूं कोण, कोणाचा मुलगा ’ असें विचारूं लागला. त्याच्या तोंडांतून अडखळतच उत्तर आलें. तें ऐकून त्याला

राजानें उचलून त्याच्या मातापितरांकडे नेलें व आपल्या हातून कसा अपराध घडला हें त्यांस सांगितलें. तेव्हां त्यांच्या हृदयांत चर्र होऊन तीं विलाप करूं लागलीं. राजानें त्यांच्या सांगण्यावरून मुलाच्या हृदयांतील शल्य उपटून काढलें; त्याबरोबर तो गतप्राण झाला. मुलाच्या वृद्ध पित्यानें अश्रुजलच हातांत घेऊन राजाला शाप दिला. तो म्हणाला—

"हे राजा, तुला वृद्धावस्था प्राप्त झाली असतां माझ्याप्रमाणेंच, 'हायरे पुत्रा, हायरे पुत्रा' असा शोक करीत प्राण सोडावा लागेल."

हा शाप ऐकून तो वृद्ध मनुष्य म्हणजे शेपटीवर पाय पडलेला व म्हणून विष ओकणारा असा सर्पच आहे कीं काय असें राजास वाटलें. तथापि शेवटीं तो त्याला म्हणाला, "महाराज, आपण मला शाप दिला खरा, परंतु पुत्रमुख पाहण्याचें भाग्य अद्यापि मला न लाभल्यामुळें माझ्या संबंधानें तो जणूं काय वरच झाला आहे! अग्नि बाह्यतः भूमीला जाळणारा वाटतो, पण त्या जाळण्यानें भूमि अधिकच उत्पादनक्षम होते. मुनिराज, मी मोठा दुष्ट खरा. माझ्या हातून झालेल्या घोर पातकाबद्दल मला वधाची शिक्षा योग्यच आहे; तरी पण आतां मीं आपणासाठीं काय करावें तेवढें कृपा करून मला सांगा."

दशरथाचें भाषण ऐकून तो वृद्ध मुनि म्हणाला, "राजा, आतां आम्हांला जगून तरी काय करावयाचें? आम्ही मुलाबरोबरच सहगमन करणार. चिता सिद्ध कर." इतक्यांत राजाचे परिजन तेथें आले. त्यांच्याकडून वृद्धाच्या सांगण्याप्रमाणें सर्व व्यवस्था करवून, एकप्रकारें उद्विग्न व एकप्रकारें उल्लसित होऊन दशरथ अयोध्येस परत आला. तथापि न कळत घडलेल्या पापाचें शल्य त्याच्या मनांत सारखें सलत राहिलें व सागरांतील वडवाग्नीप्रमाणें तें त्याला स्वास्थ्य लाभूं देईना.

## ४१. केवढें क्रौर्य हें

क्षणोक्षणिं पडे उठे परि बळें उडे बापडी,
चुके पथहि, येउनी स्तिमितदृष्टिला झांपडी;
किती घळघळां गळे रुधिर कोमलांगांतुनी,
तशीच निजकोटरा परत पातली पक्षिणी. १

म्हणे निजशिशूंप्रती "अधिक बोलवेना मला,
तुम्हांस अजि अंतिंचा कवळ एक मीं आणिला;
करा मधुर हा! चला, भरवितें तुम्हां एकदा,
करो जतन यापुढें प्रभु पिता अनाथां सदा! २

अहा! मधुर गाउनी रमविलें सकाळीं जना,
कृतघ्न मज मारितील नच ही मनीं कल्पना;
तुम्हांस्तव मुखीं सुखें धरुन घांस झाडावरी
क्षणैक बसलें न तों शिरत बाण माझ्या उरीं! ३

निघून नरजातिला रमविण्यांत गेलें वय,
म्हणून वधिलें मला! किती दया! कसा हा नय!
उदार बहु शूर हा नर खरोखरी जाहला
वधून मज पांखरा निरपराध कीं दुर्बला! ४

म्हणाल 'भुलली जगा, विसरली प्रियां लेंकरां'
म्हणून अतिसंकटें उडत पातलें मी घरा;
नसे लवहि उष्णता, नच कुशींत माझ्या शिरा,
स्मरा मजबरोबरी परि दयाघना ईश्वरा." ५

असो, रुधिर वाहुनी नच भिजो सुशय्या तरी
    म्हणून तरुच्या तळीं निजलि ती द्विजा भूवरी.
जिवंत बहु बोलकें किति सुरम्य तें उत्पल,
    नरें धरुन नाशिलें खचित धन्य बुद्धीबल ! !    ६

मातींत ते पसरिले अतिरम्य पंख,
    केलें वरी उदर पांडुर निष्कलंक;
चंचू तशीच उघडी पद लांबवीले,
    निष्प्राण देह पडला ! श्रमही निमाले !    ७

## ४२. अतिलोभो न कर्तव्यः

बाबा अबदल्ला म्हणतो—सद्धर्मप्रतिपालक महाराज, माझा जन्म बगदाद शहरीं झाला. माझा बाप व आई हीं थोड्याच दिवसांच्या अंतरानें मरण पावलीं. त्यांनीं बरेंच द्रव्य मजकरितां ठेविलें होतें. जरी मी त्या वेळीं तारुण्याच्या ऐनभरांत होतों, तरी इतर तरुण लोकांप्रमाणें मीं आपलें द्रव्य विनाकारण खर्च करण्यांत व दुर्व्यसनांत उधळून टाकिलें नाहीं; एवढेंच नव्हे, तर मोठ्या काळजीनें, दक्षतेनें व मेहनतीनें तें दिवसेंदिवस वृद्धिंगतच केलें. शेवटीं मजपाशीं इतका पैसा जमला कीं, त्याच्या योगानें मला ऐशीं उंट खरेदी करण्याचें सामर्थ्य आलें. ते मी तांडेवाले व्यापाऱ्यांस भाड्यानें देऊन त्यांजबरोबर सरकारच्या राज्याच्या हद्दींतील मुलुखांत चोहोंकडे फिरत असे. त्यापासून मला हरएक खेपेस पुष्कळ पैसा मिळे.

याप्रमाणें माझी चलती असतां, मला पैसा मिळविण्याविषयीं अधिकाधिकच हांव सुटत चालली. एके दिवशीं कांहीं व्यापारी लोकांचा माल हिंदुस्थानास जावयाचा होता; तो बसोरा शहरीं पोहोंचवून देण्याकरितां मी आपले उंट घेऊन तेथें गेलों होतों. तो माल मीं तेथें उतरून परत येत असतां आडरानांत एके ठिकाणीं पुष्कळ शानदार हिरवा चारा दृष्टीस पडला म्हणून मीं आपले उंट तेथें चारावयास सोडले, आणि विश्रांति घेत बसलों, इतक्यांत एक फकीर बसोरा येथें चालला होता तो तेथें आला, आणि माझ्या शेजारीं येऊन बसला. 'तुम्ही कोठून आलां ? व कोठें चाललां ?' वगैरे हकीकत मीं त्यास विचारिली. आम्हीं एकमेकांच्या प्रश्नांचा जबाब दिल्यावर उभयतांनीं आपापल्या बरोबरचें फराळाचें काढिलें, आणि दोघे एकत्र बसून फराळ करूं लागलों.

फराळ चालला असतां आमच्या इकडच्या तिकडच्या पुष्कळ गोष्टी झाल्यावर तो फकीर मला म्हणाला, "येथून जवळच एके ठिकाणीं द्रव्याचा मोठा खजिना असलेला मला माहीत आहे. तें द्रव्य इतकें पुष्कळ आहे

कीं, तुमचे हे ऐशीं उंट जरी सोनें व जवाहिर ह्यांनीं भरले, तरी त्यांतून कांहीं कमी झालें असें दृष्टोत्पत्तीस येणार नाहीं."

ही त्या फकीराच्या तोंडची गोष्ट ऐकून मला फारच आश्चर्य वाटलें व अतिशय हर्ष झाला. तो हर्ष माझ्या पोटांत मावेना; कां कीं, हा फकीर काळत्रयीं खोटें बोलणार नाहीं असें मला वाटलें. मीं लागलीच मोठ्या प्रेमानें त्याच्या गळयास मिठी घातली, आणि म्हटलें, 'फकीरबाबा, तुम्हांला इहलोकचें वैभव अगदीं तुच्छ आहे हें तर स्पष्टच आहे, तर हें द्रव्य तुम्हांस माहीत असल्यापासून काय उपयोग आहे बरें? त्यांतून तुम्ही पडलां एकटे, तुमच्यानें तें फारसें नेववणारही नाहीं; तर तें कोठें आहे तें मला दाखवा. मी तें आपल्या सर्व उंटांवर भरतों, आणि तुमच्या मेहेरबानीबद्दल तुम्हांस त्यांतील एक उंट देतों."

त्या फकीराला मीं एक उंट देण्याचें कबूल केलें हें अगदीं थोडें होतें ह्यांत शंका नाहीं. पण मला तें पुष्कळच वाटलें; कारण, त्या फकीरानें मला ती गोष्ट सांगितल्या वेळेपासून मला द्रव्याचा इतका लोभ सुटला कीं, त्याला कांहीं सीमाच नाहीं! मला वाटलें कीं, ह्या फकीराला एक उंट मी देणार तो जाऊन बाकीचे एकूणऐशीं मला राहतील, त्यांत मला म्हणजे कांहीं म्हणण्यासारखें मिळालें असें मुळींच नाहीं.

माझा हा हावरेपणा त्या फकीराच्या लक्षांत आला; पण त्याबद्दल यत्किंचित्‌ही राग मनांत न आणतां तो शांतपणें मला म्हणाला, "भाई-साहेब, माझ्यापासून तुमचा जो कांहीं फायदा होणार, त्याच्या मानानें मला जें तुम्हीं देऊं केलें तें कांहींच नाहीं, हें तुमच्याही सहज लक्षांत येईल. समजा कीं, मीं ह्या द्रव्याची वार्ता तुम्हांला मुळींच सांगितली नसती, आणि तें सगळें एकट्यानेंच घेतलें असतें, तर तुम्हांला काय मिळालें असतें बरें? पण मीं तुमच्याशीं कांहीं एक प्रतारणा न करितां मोकळ्या मनानें सर्व गोष्ट तुम्हांला सांगितली ह्यावरून माझें मन कसें आहे तें तुम्हीं जाणलेंच असेल. असो. मी इतकेंच सांगतों कीं, आपलें दोघांचेंही कल्याण व्हावें

व तुम्ही जन्मभर माझी आठवण काढावी असें माझ्या मनांत फार असून तें करण्याचें सामर्थ्य मला आहे; तर या संबंधानें आपणां उभयतांसही जास्त फायदेशीर व रास्त अशी एक गोष्ट मला सुचली आहे, ती मी तुम्हांला सांगतों. ती मान्य करणें अगर नाकारणें हें तुमच्या मर्जीवर आहे. तुमच्यापाशीं जे ऐशीं उंट आहेत म्हणून तुम्ही म्हणालां, ते घेऊन आपण ज्या ठिकाणीं तें द्रव्य आहे त्या ठिकाणीं जाऊं; आणि प्रत्येक उंटाच्यानें जितकें सोनें व जवाहिर नेववेल तितकें आपण त्यांजवर भरूं. याप्रमाणें सर्व उंट भरून झाले म्हणजे त्यांतून निम्मे तुम्हीं माझ्या स्वाधीन करावे, व निम्मे तुम्हीं ठेवावे; आणि मग ज्याला जिकडे वाटेल तिकडे त्यानें ते घेऊन जावें; हें करणें मला रास्त दिसतें. त्यापासून दोघांनाही कुरकूर करण्याला जागा राहणार नाहीं. आतां तुम्हांला आपले चाळीस उंट मला द्यावे लागणार हें खरें, पण त्यांत तुमचा मुळींच तोटा नाहीं; कां कीं, माझ्या योगानें जें द्रव्य तुम्हांला मिळेल, त्या द्रव्यानें तुम्हांला आणखी हजारों उंट विकत घेतां येतील. ”

फकीराचें हें म्हणणें अगदीं वाजवी होतें; सबब त्यावर मला बोलण्याला मुळींच जागा राहिली नाहीं. तथापि फकीराचें म्हणणें कबूल केल्यापासून आपला केवढा फायदा होणार हें लक्षांत न आणतां, मी आपले चाळीस उंट जाणार म्हणून मनांत मोठें दुःख करूं लागलों. त्यांतही विशेषेंकरून, जेव्हां हा फकीर आपणाप्रमाणें श्रीमंत होणार हें माझ्या लक्षांत आलें, तेव्हां तर मला फारच दुःख वाटलें ! तो बिचारा अत्यंत उदारबुद्धीनें माझें कल्याण करण्यास तयार झाला, याबद्दल त्याचे उपकार मीं अगोदरच अशा प्रकारें फेडले ! असो. याप्रमाणें माझें मन द्विधा झालें; तथापि त्या वेळीं विचार करण्यास अवकाश नव्हता. एक तर फकीराचें म्हणणें मुकाट्यानें कबूल करावें, नाहींपेक्षां एवढी अपार संपत्ति मिळण्याची संधि अनायासें आली असतां ती आपण होऊन फुकट घालविली म्हणून सर्व जन्मभर पश्चात्ताप करीत बसावें; याखेरीज दुसरी तोडच नव्हती.

मग लागलेच मीं आपले सर्व उंट एकत्र केले, आणि ते घेऊन तो फकीर व मी असे उभयतां निघालों. आम्ही थोडें पुढें गेलों तो आम्हांला एक मोठी थोरली दरी लागली. तींत जाण्याची वाट अगदीं अरुंद होती, म्हणून तींतून एकेकच उंट आंत नेतां आला. ज्या दोन पर्वतांच्या योगानें ही दरी झाली होती ते जेथें एकमेकांस मिळाले होते, तेथें अर्ध-वर्तुळ झालें होतें. ते अतिशय उंच व नीट सुळासारखें गेलें असून त्याजवर इतकी किर्र झाडी होती कीं कोणी मनुष्य तेथें येऊन आम्हांस पाहील याची तिळप्रायही भीति आम्हांला नव्हती.

ह्या दोन पर्वतांच्या मध्यें आम्ही आल्यावर फकीर मला म्हणाला, "आतां ह्या उंटांना तुम्ही खालीं बसवा, म्हणजे आपणांला त्यांजवर ओझीं लादायला बरें पडेल. तुम्ही त्यांना बसवितां तों मी इकडे द्रव्य काढण्याच्या तजविजीस लागतों."

फकीरानें सांगितल्याप्रमाणें मीं उंटांना खालीं बसविलें आणि लागलाच त्याच्याकडे गेलों. त्यानें हातांत सनकाडी व चकमक घेतली होती व विस्तव पेटविण्याकरितां तो काटक्याकुटक्या जमा करीत होता. त्यानें विस्तव पेटविला, आणि त्यावर थोडासा ऊद टाकिला. नंतर त्यानें कांहीं मंत्राचा उच्चार करतांच तेथें धुराचा मोठा काळा कुळकुळीत ढग बनून तो आकाशांत खूप उंच गेला. तो ढग त्यानें दुभागला, तों तत्काळ असा चमत्कार झाला कीं, एवढा मोठा सुळासारखा नीट गेलेला तो पर्वत जसा एखादा दरवाजा फट्दिशीं उघडतो, त्याप्रमाणें दुभंग झाला; आणि आंतल्या बाजूस एक अत्यंत सुशोभित व भव्य असा वाडा दिसूं लागला, हें कृत्य खरोखर मानवांचें नसून यक्षादिकांचेंच असलें पाहिजे; कां कीं, असला अचाट उद्योग मानवांच्या बुद्धीच्या व शक्तीच्या अगदीं बाहेरचा होय!

हें त्या वाड्याच्या संबंधानें जें मीं म्हटलें तें पुढें पुष्कळ वेळानें माझ्या मनांत आलें; कां कीं त्या वेळीं इकडचा तिकडचा कांहीं विचार

माझ्या मनांत आलाच नाहीं! फार काय सांगूं? त्या वाड्यांत चोहोंकडे जी अपार संपत्ति मोठ्या व्यवस्थेशीर रीतीनें ठेविलेली होती, ती पाहून मी क्षणभरही आश्चर्य करीत राहिलों नाहीं! तर ज्याप्रमाणें गिधाड आपलें भक्ष्य नजरेस पडतांच त्याजवर तत्काळ झडप घालतें, त्याप्रमाणें, मला तेथें प्रथमच जी एक मोहोरांची रास दिसली तींतील मोहोरा एकेका पोत्यांत मी भराभर भरूं लागलों. पोतीं चांगलीं मोठमोठीं व मजबूत होतीं. तीं मीं मोठ्या आनंदानें तोंडोतोंड भरलीं असतीं, पण तीं तितकीं भरिलीं असतां उंटांच्यानें नेववणार नाहींत असें जाणून निरुपायास्तव मला त्यांच्या शक्तीच्या मानानें तीं भरावीं लागलीं. फकीरानेंही माझ्याप्रमाणेंच केलें; पण त्यानें सोन्यापेक्षां हिरे, माणकें इत्यादि रत्नेंच पुष्कळ भरिलीं. त्यानें तसें करण्याचें कारण मला सांगितलें, त्यावरून मींही मग त्याच्याप्रमाणें केलें. एकंदरीनें आम्हीं उभयतांनींही सोन्यापेक्षां रत्नेंच जास्त भरलीं. आम्हीं सर्व पोतीं भरून उंटांवर चढविल्यावर, त्या वाड्याचा दरवाजा बंद करून आपला रस्ता धरण्याखेरीज आम्हांला दुसरें कांहीं एक करावयाचें राहिलें नाहीं. आतां परत येण्याकरितां निघावयाचें, इतक्यांत तो फकीर पुन्हां आंत गेला, आणि एके ठिकाणीं लहानमोठ्या व तऱ्हतऱ्हेच्या सोन्याच्या बरण्या पडल्या होत्या, त्यांपैकीं एकींतून त्यानें एक लहानशी लांकडी डबी काढून घेतली. तींत फक्त कांहीं एका प्रकारचें मलम होतें. तें त्यानें मला उघडून दाखविलें आणि ती डबी खिशांत घातली.

हें झाल्यावर, पूर्वीं दरवाजा उघडण्याकरितां जो विधि त्यानें केला होता, तोच फिरून केला. नंतर कांहीं मंत्राचा उच्चार करितांच तो दरवाजा खट्दिशीं बंद होऊन गेला, आणि डोंगर पूर्ववत् जशाचा तसा दिसूं लागला.

नंतर आम्हीं ते उंट निमेनिम वांटून घेतले, आणि दरींतून आल्या वाटेनें बाहेर पडलों. नंतर मोठ्या सडकेला लागे तोंपर्यंत आम्ही एकत्र

चाललों तेथून आमचा रस्ता फुटत होता—त्याचा बसोऱ्याकडे व माझा बगदादकडे—सबब मीं त्याचा निरोप घेतला. त्या वेळीं, त्यानें मजवर केलेल्या ह्या महदुपकारांबद्दल मीं त्याचे फार फार आभार मानिले. मग आम्हीं एकमेकांस मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें, आणि आपल्या रस्त्यानें चालते झालों.

इतकें होत आहे तों, मी आपल्या उंटांना रस्त्याला लावून दिलें होतें, ते शेंपन्नास पावलें दूर गेले. त्यांना मी जाऊन गांठतों आहें, इतक्यांत कृतघ्नता आणि मत्सर ह्या पिशाच्चांनीं माझ्या अंतःकरणांत संचार केला. माझे ते चाळीस उंट गेले, याबद्दल मला मोठें वाईट वाटलें; त्यांत विशेषें-करून, त्यांजवर असलेलें द्रव्य आपणाला मिळालें नाहीं, याबद्दल फारच वाईट वाटलें! मीं मनांत म्हटलें, "त्या फकीराला हें द्रव्य नेऊन काय करावयाचें आहे? तो त्या एकंदर भांडाराचा मालकच आहे, त्या अर्थी आणखी हवें तेवढें त्यांतून त्याला नेतां येईल." असें म्हणून ते चाळीस उंट व त्यांजवरील सर्व ऐवज त्या फकीरापासून घेण्याचा अत्यंत दुष्ट विचार मीं मनांत आणिला.

मग हा बेत सिद्धीस नेण्याच्या कामास मी लागलों. प्रथमतः मीं आपले उंट उभे केले, आणि नंतर त्या फकीराला खूप मोठ्यानें हांका मारीत, व 'तुम्ही आपले उंट उभे करा' असें हातानें खुणावीत, त्याच्या मागें धांवत चाललों. माझी हांक ऐकतांच तो आपले उंट उभे करून माझी वाट पहात राहिला.

मी त्याच्याजवळ जाऊन त्यास म्हणालों, "फकीरबाबा, मीं मघाशीं तुमचा निरोप घेतला न घेतला इतक्यांत माझ्या मनांत एक गोष्ट आली. तिचा आपण पूर्वीं दोघांनींही विचार केला नव्हता. ती गोष्ट अशीः- तुम्ही पडलां साधु; तुम्हांला इहलोकचे सर्व व्यवसाय सोडून देऊन सर्वकाळ ईश्वरभजन करीत एकांतीं राहण्याची संवय; तेव्हां हे इतके उंट संभाळण्यास किती त्रास पडेल याची कल्पना तुमच्या मनांत आली नसेल. म्हणून माझें ऐकाल

तर, तुम्ही यांपैकीं तीस उंट ठेवा, आणि बाकीचे माझ्या स्वाधीन करा. हे तीसच तुम्हांला संभाळतां संभाळतां पुरेसें होईल. माझी गोष्ट निराळी. मी ह्या कामांत घटावलेला असल्यामुळें मला तें कांहींच कठीण नाहीं!"

हें माझें बोलणें ऐकून फकीर बिचारा अगदीं निरुत्तर झाला, व त्याला माझें म्हणणें कबूल करावें लागलें. तो मला म्हणाला, "तुम्ही म्हणतां तें कांहीं खोटें नाहीं असें मलाही वाटतें. ह्यापूर्वीं ही गोष्ट माझ्या मनांत मुळींच आली नाहीं. तुम्हीं हें सांगितल्यापासून मला मोठी काळजी लागून राहिली आहे. तर आतां ह्यांतले जे दहा उंट तुमच्या पसंतीस येतील ते तुम्ही घेऊन जा कसे!"

मीं त्यांतून दहा उंट निवडून घेतले; आणि बाकीच्या उंटांमागें त्यांनाही लावून दिलें. फकीर हे दहा उंट देण्याचें इतके लौकर कबूल करील असें मला वाटलें नव्हतें; परंतु त्यानें ते देण्यास मुळींच आढेवेढे घेतले नाहींत, ह्यामुळें मला जास्तच लोभ सुटला. मीं मनांत म्हटलें, 'ह्याच्यापासून आणखी दहा उंट उपटण्यास कांहीं कठीण नाहीं;' म्हणून हे जे त्यानें दहा दिले, त्याबद्दल त्याचे आभार मानण्याचें सोडून मीं त्यास म्हटलें, "बावाजी, तुम्हीं जे हे तीस उंट आपणाकरितां ठेविले आहेत, ते तरी त्यांच्यावरच्या ऐवजासुद्धां संभाळणें हें तुमच्या-सारख्या अनभ्यस्तास किती कठीण आहे ह्याचा तुम्ही आणखी एकवार विचार करावा, असें माझें म्हणणें आहे; कां कीं, तुम्हांस यत्किंचित्‌ही त्रास होईल तर त्यापासून मला अपरिमित दुःख होणार आहे; व म्हणूनच मी हें तुम्हांस म्हणतों. तेव्हां माझें ऐकाल तर, तुम्ही ह्यांतले आणखी दहा उंट माझ्या स्वाधीन करा. मी आपल्या फायद्याकरितां हें तुम्हांस सांगत नाहीं. तर तुमचा त्रास चुकवावा म्हणून सांगतों. तर मग करा कसे आणखी दहा माझ्या स्वाधीन, आणि व्हा मोकळे! मला म्हणाल तर त्यांचा कांहींच त्रास नाहीं—एक संभाळणें काय आणि शंभर संभाळणें काय, सारखेंच!"

माझें बोलणें त्या फकीराला रुचलें, व त्यानें लागलेच आणखी दहा उंट माझ्या स्वाधीन केले. याप्रमाणें त्याच्यापाशीं फक्त वीसच उंट राहिले, आणि माझे एकंदर साठ झाले. तेव्हां मोठमोठ्या राजांपेक्षांही आपण श्रीमंत झालों असा मला अभिमान वाटूं लागला. आतां तरी माझ्या मनाची तृप्ति व्हावी कीं नाहीं ? पण तसें कोठून होणार ? उलट असें झालें कीं, ज्याप्रमाणें एखादा जलोदर झालेला मनुष्य जों जों पाणी पितो तों तों त्याला अधिकाधिकच तहान लागते त्याप्रमाणें हे उंट मिळाल्यावर तर मला अधिकच हावरेपणा सुटला; व फकीराजवळचे बाकी राहिलेले वीसही उंट आपल्याला मिळावे अशी मला इच्छा उत्पन्न झाली.

मग मीं त्या फकीराची आणखी पुष्कळ प्रकारें मनधरणी करून, त्याजपाशीं राहिलेल्या वीस उंटांपैकीं दहा उंट तर घेतले. आतां बाकी दहा राहिले, त्याजकरितां मी त्याच्या पायां पडलों, त्याची दाढी धरिली, आणि कसें तरी करून एवढी मला भिक्षा घालाच, म्हणजे तुमचे मजवर अनंत उपकार होतील, अशी त्याला गळ घातली. त्या बिचाऱ्यानें तेंही जेव्हां कबूल केलें, तेव्हां माझा आनंद त्रिभुवनांतही मावेना ! तो म्हणाला, " भाई, यांचा नीट सांभाळ करा, आणि सदोदित ही एक गोष्ट ध्यानांत ठेवा कीं, आपण आपल्या संपत्तीचा अनाथांस साहाय्य करण्याकडे उपयोग न केल्यास परमेश्वर ती आपणापाशीं कधींही राहूं देणार नाहीं; कां कीं, ती देणें आणि हरण करणें हीं दोन्ही त्याच्याच हातांत आहेत. जे संपन्न असतील त्यांनीं दारिद्र्यांस धर्म करून परलोकीं त्याच्या शेंकडों-पट सुख प्राप्त होण्याचें साधन करून ठेवावें, एवढ्याचकरितां परमेश्वरानें जगांत दारिद्र्य ठेविलें आहे. "

मला लोभ अमर्याद सुटला होता, तेव्हां असल्या परमार्थाच्या गोष्टी कोठून रुचणार ? माझे सर्व उंट मला मिळाले, आणि शिवाय एवढी अपार संपत्ति मिळाली, तरी माझ्या मनाची तृप्ति झाली नाहीं. माझ्या

मनांत आलें कीं, ही एवढी संपत्ति जी ह्या फकीराच्या योगानें आपल्याला मिळाली, तिजपेक्षांही त्याच्याजवळ जी मलमाची डबी आहे तिचें महत्त्व अधिक आहे. ती डबी संभाळून ठेवण्याविषयीं त्याची तत्परता, व जेथून त्यानें ती काढिली तें स्थळ, ह्यांचा विचार करतां मला असें दिसून आलें कीं, तिच्यांत कांहीं तरी लोकविलक्षण गुण असावा ह्यांत संशय नाहीं. म्हणून तीही हरयुक्ति करून हस्तगत करण्याचा मीं निश्चय केला. मी त्याला आलिंगन दिलें, व सलाम करून निघालों; पण लागलीच कांहीं आठवण झाल्यासारखें करून पुनः परतलों, आणि त्यास म्हणालों, "बाबाजी, तुमच्याजवळ जी ती लहानशी डबी आहे, ती तुम्हांला काय करावयाची आहे बरें? तेवढी मला देऊन टाकाना परती? मला वाटतें, ती जवळ बाळगण्यापासून तुम्हाला यत्किंचित् देखील उपयोग नाहीं; कां कीं, तुमच्यासारख्या सर्वसंगपरित्याग केलेल्या मनुष्याला मलमाचें कधीं कारण पडणार."

ती डबी त्यानें मला दिली नसती तर फार चांगलें झालें असतें! पण उपयोग काय? तो नाहीं म्हणता तर मीं जबरदस्ती करून ती घेतली असती; कारण मी त्याच्यापेक्षां बळकट होतों!

परंतु फकीरानें मला डबी देण्याचें नाकारिलें नाहीं; एवढेंच नव्हे, तर ती त्यानें तत्क्षणीं आपल्या खिशांतून काढून मोठ्या आनंदानें माझ्या स्वाधीन केली, आणि म्हणाला, "भाई, घ्या ही. आतां तुमची इच्छा पूर्ण झाली ना? आणखी कांहीं हवें असेल तर सांगा. संकोच धरूं नका. माझ्या हातचें असेल तें देण्यास मी अगदीं सिद्ध आहें. तुमच्या तोंडांतून शब्द निघण्याचा मात्र अवकाश!"

मीं डबी उघडली, आणि तिच्यांतील मलमाकडे पाहून त्यास म्हटलें, "ज्या अर्थीं तुम्ही मजवर एवढे उपकार केले व आणखीही करूं इच्छितां त्या अर्थीं ह्या मलमाच्या अंगीं काय गुण आहे तेवढा कृपा करून मला सांगा."

फकीरानें उत्तर केलें, " ह्याच्या अंगचा गुण फारच चमत्कारिक व अद्भुत आहे. ह्याचा थोडासा अंश जर तुम्ही आपल्या डाव्या डोळ्याच्या भोंवतीं व त्याच्या पापणीला लावाल, तर पृथ्वीच्या पोटांतील रत्नादिकांचीं सर्व भांडारें तुमच्या नजरेस पडतील; पण तेंच जर किंचित् उजव्या डोळ्याला लावाल, तर त्यापासून तुम्हांला अंधत्व येईल. "

मीं फकीराला म्हटलें, "बरें तर, मी त्याची प्रतीति घेऊन पाहतोंच." असें म्हणून मीं ती डबी त्याच्या हातांत दिली, आणि म्हटलें, "ह्यांतलें थोडेंसें मलम माझ्या डाव्या डोळ्याला लावा. माझ्यापेक्षां तें तुम्हांला चांगलें लावितां येईल. हं, लावा लौकर. हा अलौकिक प्रकार कसा घडतो तें पाहण्याची मला फारच उतावळी झाली आहे. "

मग मीं आपला डावा डोळा मिटला, आणि फकीरानें तें मलम त्याजवर चोळलें. तें त्यानें चोळतांच मीं डोळा उघडला, आणि पाहतों तों फकीरानें सांगितलेली गोष्ट खरीच ! रत्नादिकांचीं अपरंपार भांडार हजारों प्रकारच्या नाण्यांच्या पर्वतप्राय राशी मला दिसूं लागल्या ! त्या अत्यंत भव्य व सुंदर देखाव्याचें यथातथ्य वर्णन करणें केवळ अशक्य आहे. असो. पण उजवा डोळा मिटून धरावा लागल्यामुळें मला फार त्रास होऊं लागला, सबब थोडेंसें मलम त्याही डोळयास लावण्याविषयीं मीं फकीरास विनंति केली.

त्यानें उत्तर केलें, मजकडून कांहीं हरकत नाहीं, पण मीं पूर्वीं काय सांगितलें आहे त्याचा फिरून विचार करा. जर तें तुम्हीं उजव्या डोळ्याला लावाल, तर तुमच्या दोन्ही डोळयांच्या तावडतोब सांचा झाल्यावांचून कधींही राहाणार नाहींत, असा त्याचा विपरीत गुण आहे."

हें फकीराचें बोलणें मला खरें वाटलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर माझ्या मनांत उलटें असें पाप आलें कीं, त्या मलमांत आणखी कांहीं अद्भुत गुण असून तो आपल्याला सांगूं नये असें त्याच्या मनांत आहे. यास्तव मीं त्यास हंसून म्हटलें, " बाबाजी, तुम्ही मला फसवूं पाहतां असें मला

स्पष्ट दिसतें. एकमेकांस अत्यंत विरुद्ध असे दोन गुण ह्या एकाच मलमाच्या अंगीं असतील हें मुळींच संभवत नाहीं."

फकीरानें उत्तर केलें, "तें कांहीं असो; पण मी ईश्वरास स्मरून सांगतों कीं, मीं जें तुम्हांस सांगितलें तें अगदीं खरें आहे. तुम्ही कांहीं एक अंदेशा मनांत आणूं नका. प्राण गेला तरी मी खोटें बोलणार नाहीं."

अशा प्रकारें तो बिचारा फकीर जीव तोडतोडून जरी सांगूं लागला तरी त्याचा मला भरंवसा वाटेना. पृथ्वीच्या पोटांतील अपार संपत्ति यथेच्छ पाहण्याविषयीं व लागेल तेव्हां तिचा उपभोग घेण्याविषयीं मला जी अनिवार इच्छा झालेली होती, तिचा माझ्या मनावर इतका पुरा अंमल बसला होता कीं, त्याच्या कानउघाडणीकडे माझें बिलकुल लक्ष जाईना, व त्याचें बोलणें खरें असावें असें माझ्या मनांत भरेना. शेवटीं त्याच्या बोलण्याची प्रतीति दुर्दैवेंकरून मला लौकरच आली.

माझ्या डोक्यांत असें वेड भरलें कीं, ज्या अर्थीं तें मलम डाव्या डोळ्याला लावल्यानें मला पृथ्वीच्या पोटांतील सर्व संपत्ति दिसली, त्या अर्थीं तें उजव्या डोळ्याला लाविलें असतां ती माझ्या हातीं लागावी असा कदाचित् त्याच्यांत गुण असेल कशावरून ? तेव्हां तें मलम आपल्या उजव्या डोळ्याला त्यानें लावावें असा मीं दुराग्रह धरिला पण तो कांहीं केल्या ऐकेना. तो मला म्हणाला, "भाई, मीं तुमचें इतकें चांगलें केलें असून आतां तुमचा असा घात करण्याला माझा हात कसा वाहील बरें ? सर्व इंद्रियांत श्रेष्ठ जें नेत्रेंद्रिय त्याच्या सुखास दुर्दैवेंकरून जे मुकतात, त्यांना किती दुःख होत असेल याचा आपल्या मनाशीं तुम्ही पुरता विचार करा; आणि ज्या कृत्याच्या योगानें तुमच्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुम्हांला दारुण पश्चात्ताप होणार आहे, तें करावयास मला लावूं नका."

इतकें त्यानें सांगितलें तरी मीं आपला दुराग्रह सोडिला नाहीं. मीं त्यास म्हटलें, "बाबाजी, मी तुम्हांला हात जोडतों; तुम्ही आतां ह्या

अडचणी मला सांगूं नका. आतांपर्यंत जें जें तुम्हांस मीं म्हटलें, तें तें तुम्ही परम उदार बुद्धीनें मान्य केलें, आणि आतां शेवटीं ह्या असल्या क्षुल्लक गोष्टीसाठीं तुम्ही माझें मन खट्टू करणार ? तुम्हांला देवाची शपथ आहे, तुम्ही कसेंही करून एवढी माझी शेवटची विनंति मान्य केलीच पाहिजे. ह्यापासून कसाही परिणाम होवो, त्याचा दोष माझ्या माथीं आहे; तुमच्याकडे त्याचें कांहीं नाहीं."

मीं आपला दुराग्रह सोडावा म्हणून फकीरानें आपली पराकाष्ठा करून पाहिली. शेवटीं आपण ह्याचें ऐकिलें नाहीं तर हा आपणावर जबरदस्ती केल्यावांचून राहणार नाहीं, असें त्यास दिसून आल्यावरून तो म्हणाला, "ज्या अर्थीं तुम्ही आपला हेका सोडीतच नाहीं त्या अर्थीं तुमचें मला ऐकणें भाग आहे." असें म्हणून मीं आपला उजवा डोळा मिटला होता त्याजवर त्यानें थोडेंसें मलम चोळलें. मग काय उशीर. मी डोळा उघडून पाहतों तों सर्व अंधार! दोन्ही डोळयांच्या पार खांचा होऊन गेल्या; त्या ह्या वेळेपर्यंत तशाच आहेत.

"मीं हंबरडा फोडून म्हटलें, फकीरबावा, तुम्हीं सांगितलेली गोष्ट अगदीं अक्षरशः खरी झाली. कोणीकडून हो मला ही दुष्ट बुद्धि सुचली ? हाय हाय! ह्या अनिवार द्रव्यलोभानें कसें मला दुःखसमुद्रांत लोटन दिलें. मीं आपण होऊन आपल्या पायांवर धोंडा पाडून घेतला, हें मला आतां समजून आलें. पण आतां उपयोग काय ? बाबा, तुम्ही उदार व धार्मिक आहां, व तुम्हांला अद्भुत गुणकारी अशा हजारों चिजा माहीत आहेत. त्यांत जिच्या योगानें माझी दृष्टि फिरून येईल अशी एखादी नाहीं काय?"

फकीर म्हणाला, "चांडाळा, कपाळकरंट्या, माझें जर ऐकतास तर कशाला ही दशा तुला प्राप्त झाली असती ? तूं विचारांध झालास, म्हणून तुझ्या कपाळीं हें अंधत्व आलें आहे, समजलास. संपत्तीचा उपभोग घेण्याची तुझी योग्यताच नाहीं. तूं अरण्यवासच करून रहावेंस. अद्भुत

गुणकारी अशा अनेक चिजा मला माहीत आहेत म्हणून जें तूं म्हणालास तें खरें आहे; व तुझा माझा जो अल्पकाल समागम झाला, तितक्यांत ह्या गोष्टीचा अनुभवही तुला आला आहे. पण जिच्या योगानें तुझी दृष्टि तुला फिरून प्राप्त होईल, अशी त्यांत एकही चीज नाहीं. आतां यास एकच उपाय आहे; तो हा कीं, जर ईश्वर म्हणून कोणी आहे असें तुला वाटत असेल, तर त्याचा धांवा कर. त्याच्याशिवाय कोणाच्याही हातांत ती गोष्ट आतां राहिली नाहीं. त्यानें तुला संपत्ति दिली, पण तिच्या उपभोगास तूं पात्र नव्हतास, यास्तव जे तिच्या उपभोगास पात्र असतील त्यांस ती माझ्याद्वारें देण्याकरितां त्यानें तुजपासून परत घेतली!"

फकीर पुढें चकार शब्द बोलला नाहीं; व मलाही त्यास उत्तर देण्यास जागा राहिली नाहीं. त्यानें मला तसेंच एकटें पडूं दिलें, व सर्व उंट गोळा करून त्यानें बसोऱ्याचा रस्ता धरिला. 'व्यापारी लोकांचा एकादा काफला चालला असेल तेथपर्यंत तरी मला नेऊन पोहोंचवा,' अशाविषयीं मीं पुष्कळ त्याच्या हातांपायां पडून त्याला सांगितलें. पण त्यानें तिकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं. तेव्हां मला जें दुःख झालें तें सांगतां पुरवत नाहीं. आतां पुढें काय करावें तें मला कांहींच सुचेना. पैशापरी पैसा गेला, आणखी डोळेही गेले. याप्रमाणें माझें सर्व कांहीं जाऊन मला कोणाचाही आश्रय राहिला नाहीं. अशा स्थितींत दुःखामुळें व अन्नपाणी न मिळाल्यामुळें मी मरावयाचाच, पण दुःखांत सुख एवढेंच समजावयाचें कीं, दुसरे दिवशीं बसोऱ्याहून कांहीं व्यापारी लोक परत येत होते, त्यांनीं कृपा करून मला उंटावर बसवून बगदाद येथें आणून सोडिलें.

अशा प्रकारें, सामर्थ्यानें नव्हे तरी संपर्कानें, मोठमोठ्या राजांची बरोबरी करण्यासारखें वैभव मला प्राप्त झालें असतां तें एकाएकीं सर्व नष्ट झालें व फिरून तें प्राप्त होण्याचीही आशा समूळ नाहींशी झाली; आणि

मला शेवटीं भिक्षा मागण्याखेरीज दुसरी तोडच राहिली नाहीं. ती स्थिति मी हा वेळपर्यंत भोगीत आहें. सारांश, याप्रमाणें मीं परमेश्वराचा मोठा अपराध केला आहे. सबब जो धार्मिक गृहस्थ मजवर दया करील त्याजकडून मी आपल्या अपराधाचें प्रायश्चित्त म्हणून, कान-शिलांत चापट मारून घेण्याचा नियम केला आहे.

सद्धर्मप्रतिपालक राजाधिराज, आपल्याला जी माझी कृति इतकी विलक्षण वाटली, व जिच्याबद्दल आपली मजवर इतराजी होणें अगदीं साहजिक आहे, ती करण्यांत माझा हेतु कोणता तो मीं ह्या चरणांपाशीं निवेदन केला. मी आपला दास आहें, व आपण महासमर्थ प्रभु, क्षमेचें केवळ माहेरघर आहां; तर मला खचित वाटतें कीं, मीं आपल्याला जी ही शिक्षा लावून घेतली आहे, ती माझ्या अपराधाच्या मानानें फारच कमी आहे, असें आपल्या ध्यानीं आल्यावांचून राहणार नाहीं.

याप्रमाणें बाबा अबदल्ला ह्यानें आपली हकीकत सांगितली. ती ऐकून कालीफ म्हणाला, " बाबा अबदल्ला, तुझ्या हातून फार मोठें पाप घडलें ह्यांत संशय नाहीं. व त्याबद्दल तुला पश्चात्ताप होऊन तूं आपल्याला शासन करून घेत आहेस हें फार चांगलें आहे. तुला अशी बुद्धि झाली याबद्दल तुला परमेश्वराचे आभार मानले पाहिजेत. तथापि आजपर्यंत तूं आपल्याला जें शासन करून घेतलेंस तेवढें पुरें आहे. मात्र तूं निमाज पढण्याचे वेळीं दररोज परमेश्वरापाशीं आपल्या सर्व अपराधाची क्षमा मागत जा. तुला निर्वाहाकरितां भिक्षा मागावी लागल्यामुळें कदाचित् ह्या तुझ्या नियमांत अंतर पडेल म्हणून आजपासून तुझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत दररोज तुला एक होन देण्याविषयीं मी वजिरास हुकूम करितों. तर तूं आतां इतक्यांत जाऊं नको. वजीर तुला आजची खैरात आणून देईपर्यंत थांब. "

हें ऐकून बाबा अबदल्ला ह्यानें फिरून कालिफास साष्टांग नमस्कार घातला; आणि त्याचे मोठे उपकार मानून त्यास दुवा दिला.

# लेखक परिचय

**श्रीपाद कृष्ण कोल्हटकर** ( १८७१ )

प्रतिभावंत नाटककार, मार्मिक टीकाकार व विनोदी लेखक म्हणून हे प्रसिद्ध आहेत. यांनीं कांहीं लघुकथा व दोन कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. विनोदी लेख लिहिण्याची नवीन प्रथा यांनीं पाडली. यांच्या विनोदी लेखांत सामाजिक व्यंगांवर प्रच्छन्न हल्ला चढविलेला आहे; परंतु विनोदामुळें तो तितकासा झोंबत नाहीं. हे कट्टे सुधारणावादी आहेत. यांच्या बहुतेक लिखाणांतून सामाजिक किंवा धार्मिक सुधारणांचा पुरस्कार केलेला आढळतो. यांच्या लिखाणांत कधीं सुंदर कल्पनांनीं नटलेली, तर कधीं साधी व सहज, कधीं विद्वत्ताप्रचुर तर प्रसंगीं रुक्ष सुद्धां, अशी विषयानुरूप भाषा लिहिलेली आढळून येते.

**मधुप**

मराठींतील अगदीं पहिले कथालेखक जे होऊन गेले त्यांपैकीं कृष्णाजी केशव गोखले हे एक असून त्यांच्या बऱ्याच लघुकथा मासिक मनोरंजनांतून प्रसिद्ध झाल्या आहेत. इंग्रजी कादंबऱ्या व गोष्टी यांना मराठी पेहराव देण्यांत यांचें कौशल्य दिसून येतें. हे कट्टे सुधारक असून स्त्रीशिक्षण, स्त्रियांचा समाजांतील दर्जा, स्त्रियांची कायदेशीर दुर्दशा वगैरे प्रश्नांचा यांनीं मोठ्या कळकळीनें पुरस्कार केला आहे. यांच्या बऱ्याचशा लघुकथा रूपांतरित असून कांहीं थोड्या स्वतंत्र असाव्यात. यांची भाषा साधी व सुबोध आहे.

**रामदास** ( १६०८–१६८१ )

निजामाच्या राज्यांत गोदावरीच्या कांठीं जांब नांवाचें गांव आहे. तेथें रामदासस्वामींचा जन्म झाला. रामदासांचें पहिलें नांव नारायण असें होतें. इच्छेविरुद्ध आईनें लग्न ठरविलें म्हणून ते ऐनवेळीं पळाले आणि नाशिकजवळील पंचवटींत राहून त्यांनीं तपश्चर्या केली. पुढें रामाची ते उपासना करूं लागले म्हणून त्यांचें नांव रामदास असें पडलें. रामदास हे आजन्म ब्रह्मचारी राहिले व महाराष्ट्रांत धर्मजागृति करण्याकरितां ' रामदासी पंथ ' नांवाचा स्वतंत्र पंथ त्यांनीं काढून, ठिकठिकाणीं मठस्थापना केली. स्वराज्यसंस्थापक छत्रपति शिवाजी महाराज हे रामदासांचे शिष्य होते आणि रामदासांच्या सांगण्यावरूनच भगवा झेंडा हें मराठ्यांचें राष्ट्रीय निशाण झालें.

रामदास हे सातान्याजवळील परळी किल्ल्यांत रहात असत. त्यालाच लोक सज्जनगड म्हणूं लागले. 'दासबोध,' 'मनाचे श्लोक,' 'स्फुट ओंव्या,' 'करुणाष्टकें' इत्यादि ग्रंथ त्यांनीं रचिले आहेत. त्यांपैकीं 'दासबोध' हा त्यांचा महत्त्वाचा ग्रंथ असून रामदासांच्या शिकवणीचें सार त्यामध्यें आलें आहे. प्रपंच आणि परमार्थ यांची योग्य सांगड कशी घालावी याचा बहुमोल उपदेश दासबोधांत आला आहे. माघ वद्य ९ शके १६०३ या वर्षी रामदास स्वामींनीं सज्जनगडावर समाधि घेतली.

## गोपाळ गणेश आगरकर ( १८५६-१८९५ )

आगरकरांचा जन्म सातारा जिल्ह्यांतील टेंभू या गांवीं झाला. विद्यार्थीदशेंत असतांना त्यांना दारिद्र्याबरोबर बरेंच झगडावें लागलें. प्रतिकूल परिस्थितींतून वाट काढीत काढीत ते एम्. ए. झाले व चिपळूणकर व टिळक यांच्या सहाय्यानें न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना त्यांनीं केली. फर्ग्युसन कॉलेज स्थापन झाल्यावर तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान हे विषय ते शिकवीत व पुढें प्रि. आपटे यांच्या मृत्यूनंतर ते प्रिन्सिपाल झाले. सामाजिक सुधारणेकडे यांचा प्रथमपासून ओढा. 'केसरी' पत्रांतून या विषयावर ते प्रथम लिहीत असत. नंतर आपल्या मताच्या प्रसाराकरितां त्यांनीं 'सुधारक' नांवाचें स्वतंत्र वर्तमानपत्र काढलें. सुधारकामधून लिहिलेले त्यांचे निबंध प्रसिद्ध आहेत. त्याशिवाय शेक्सपिअरच्या हॅम्लेट या नाटकाचें भाषांतर, डोंगरी तुरुंगांतील १०१ दिवस, वगैरे पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर महाराष्ट्रांत लोकजागृति करण्याचें कार्य ज्या पुढाऱ्यांनीं केलें त्यांत आगरकरांची गणना प्रमुखत्वानें करावी लागेल. यांची भाषा मोठी जोरदार व प्रखर आहे; त्यांत आवेश व ओज आहे. त्यामुळें मराठी वाङ्मयांत त्यांच्या निबंधांना कायमचें स्थान मिळालें आहे.

## नारायण वामन टिळक ( १८६४-१९१९ )

टिळक मूळचे नासिकचे राहणारे. ख्रिश्चन धर्माचीं तत्त्वें पटल्यामुळें त्यांनीं तो धर्म स्वीकारला. प्रसाद हा यांच्या कवितेचा विशेष आहे. मुलें आणि फुलें यासंबंधीं मनोरम काव्यें यांनीं केलीं असल्यामुळें यांना 'मुलांफुलांचे कवि' असें म्हणतात. शृंगार किंवा वीर या रसांपेक्षां करुण, वत्सल, व शांत या रसांकडे कवीचा विशेष ओढा. यांची 'अभंगाञ्जलि' भक्तिरसपूर्ण आहे. रचना करतांना यांनीं नव्यांप्रमाणें जुन्या वृत्तांचाहि स्वीकार केला आहे.

भाषा साधी, सरळ व गोड आहे. सोप्या शब्दांत तत्त्वज्ञानप्रचुर विचार मांडण्याचें चांगलेंच कौशल्य या कवीमध्यें दिसून येतें.

## वासुदेव गोविंद मायदेव (१८९४)

हे मुंबई विश्वविद्यालयाचे एम्. ए. असून प्रो. धों. के. कर्वे यांच्या महिला-विद्यालयांत अध्यापक आहेत. कांहीं किरकोळ लेख त्यांनीं लिहिले असून 'गरिबांची गोष्ट,' 'अभिनयगीत' आणि 'भावतरंग' अशीं कवितांचीं पुस्तकें त्यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. नित्याच्या जीवनांतील साधेसुधे प्रसंग घेऊन त्यांवर रचिलेलीं त्यांचीं कवनें हृदयंगम व बालमनाचें यथार्थ आविष्करण करणारीं अशी उतरलीं आहेत. कल्पनेच्या उत्तुंग भराऱ्या किंवा नवविचारांचा प्रवाह नसला तरी हें साधें स्वरूपच आल्हाददायक वाटतें. यांच्या कांहीं विनोदी कविताहि आहेत.

## गिरीश (१८९३)

श्री. शंकर केशव कानेटकर हे आपली कविता 'गिरीश' या टोपण नांवानें प्रसिद्ध करतात. यांचें मूळ गांव सातारा जिल्ह्यांतील रहिमतपूर. हे एम्. ए. असून 'अभागी कमल,' 'कला,' 'आम्बराई' हीं खण्डकाव्यें यांनीं लिहिलीं आहेत. यांच्या स्फुट गीतांचा संग्रह 'काञ्चनगङ्गा' या नांवानें प्रसिद्ध झाला आहे. गिरीशांना कुणबाऊ भाषा चांगली साधते. त्यांचा सामाजिक विषयाकडे कल असून स्त्रियांचीं गाऱ्हाणीं त्यांनीं आपल्या काव्यांतून जनतेपुढें मांडलीं आहेत. रचना रेखीव असून भाषा प्रसादपूर्ण आहे. अपरिचित शब्द किंवा कर्णकटु शब्दप्रयोग सहसा आढळत नाहींत. त्यांचीं कांहीं भावगीतें गेय असल्यामुळें बरींच लोकप्रिय झालीं आहेत.

## राजाराम परशुराम सबनीस (१८९३)

शिक्षणप्रसारक मंडळी, पुणें, या संस्थेचे हे आजीव सेवक असून सर परशुराम भाऊ कॉलेजांत अर्थशास्त्र, गणित, इतिहास हे विषय ते शिकवितात. महाराष्ट्राचा इतिहास व संस्कृति यांबद्दल त्यांना विशेष अभिमान वाटतो. यांनीं फार लिहिलेलें नाहीं, परंतु जें लिहिलें आहे तेंच विचारपूर्वक लिहिलें असल्यामुळें त्याला एक प्रकारचें महत्त्व आहे. स्वाभिमान व परगुणग्रहण या इष्ट प्रवृत्तींचें मिश्रण यांच्या ठायीं दिसून येतें. 'जगाचें वाङ्मय' या नांवाचीं दोन पुस्तकें यांनीं प्रसिद्ध केलीं असून त्यांमध्यें निरनिराळ्या देशांतील लेखकांचे उत्कृष्ट उतारे संग्रहित केले आहेत.

## मोरोपंत ( १७२९-१७९४ )

या कवीचें सबंध नांव मोरेश्वर रामचंद्र पराडकर. यांचें लहानपण कोल्हापूरनजीक पन्हाळगडास गेलें. पाध्ये नांवाच्या गुरूपाशीं मोरोपंत संस्कृत शिकले. त्यांच्या वडिलांनीं बारामती येथील सुप्रसिद्ध सावकार बाबूजी नाईक यांजकडे नोकरी धरली; तेव्हां मोरोपंतही बारामतीस आले आणि त्यांची योग्यता लक्ष्यांत घेऊन बाबूजी नाईकांनीं त्यांना आश्रय दिला. पंतांची बहुतेक सर्व काव्यरचना बारामतीस झाली. त्यांचे मुख्य काव्यग्रंथ म्हटले म्हणजे आर्याभारत, एकशें आठ रामायणें, मंत्रभागवत, हरिवंश वगैरे होत. स्फुट प्रकरणेंहि त्यांनीं पुष्कळच लिहिलीं आहेत.

पंतांच्याइतकी विपुल कविता फारच थोड्या कवींनीं केली आहे. बहुतेक काव्यें आर्यावृत्तांत असल्यामुळें त्यांना आर्यापति असें कौतुकानें लोक म्हणत. त्यांची भाषा व्याकरणशुद्ध व विविध प्रकारच्या शब्दार्थालंकरांनीं युक्त अशी आहे. संस्कृत शब्दांचा विशेष भरणा असल्यामुळें त्यांची कविता प्रायः दुर्बोध आहे. परंतु मराठी भाषेला समृद्ध करून तिचें वैभव वाढविणारांमध्यें पंतांची प्रमुखत्वानें गणना केली पाहिजे यांत शंका नाहीं.

## गोविंद चिमणाजी भाटे ( १८७१ )

डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद व विलिंग्डन कॉलेज, सांगली, या संस्थेचे माजी प्रिन्सिपाल. हे कर्ते सुधारक म्हणून प्रसिद्ध आहेत. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या भागांत यांनीं प्रवास केला असून तत्संबंधीं लेख व पुस्तकें वेळोवेळीं लिहिलीं आहेत. १९२९ सालीं हे विलायतेलाहि गेले होते आणि विलायतच्या प्रवासाची वर्णनपर विस्तृत लेखमाला त्यांनीं मनोरंजनांतून प्रसिद्ध केली आहे. मराठीमध्यें प्रवासवर्णनपर विपुल वाङ्मय यांच्याइतकें दुसरें कोणीं लिहिलें नाहीं. याखेरीज 'प्रेम कीं लौकिक,' 'अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें,' 'सौंदर्य व ललितकला,' 'कँट व शंकराचार्य,' 'स्कॉटचें चरित्र' इत्यादि विविध प्रकारचीं पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. यांचें अवलोकन सूक्ष्म असून वर्णनपद्धति मोहक असते. भाषा सजविण्याकडे यांचें विशेष लक्ष नाहीं. सुंदर शब्दांपेक्षां अर्थवाहक शब्द उपयोगांत आणल्यामुळें यांची भाषाशैली स्वाभाविक वाटते.

## गंगाधर रामचंद्र मोरे ( १८५७-१९१५ )

मुंबई येथील एल्फिन्स्टन् हायस्कुलांत प्रवेशपरीक्षेपर्यंत शिक्षण झालें. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें शिक्षणक्रम सोडून नोकरी धरावी लागली. मोगरे यांची काव्यरचना

जुन्या वळणाची आहे. आर्याछंद कवीचा विशेष आवडीचा दिसतो. उपहासात्मक काव्यें लिहिण्यास मोगरे यांनींच प्रथम सुरवात केली. मराठी भाषेबद्दल यांना अत्यंत अभिमान वाटत असून सुशिक्षित पदवीधरांकडून होत असलेली मायभाषेची हेळसांड यांना पाहवत नसे. यांची सर्व कविता 'मोगऱ्याचीं फुलें' या नांवानें प्रसिद्ध झाली आहे.

## महिपति ( १७१५–१७९० )

नगर जिल्ह्यांतील ताहराबाद या गांवचे हे राहिवासी. ताहराबादचें कुलकर्णीपण महिपतीच्या पूर्वजांकडे असे. वडील निवर्तल्यानंतर कुलकर्णीपण महिपतीकडे आलें. देवाच्या भजनपूजनांत व्यत्यय येतो म्हणून त्यांनीं आपलें हें वतन सोडून दिलें. महिपतींनीं संतांचीं चारित्रें लिहिलीं आहेत. भक्तिविजय, भक्तलीलामृत, संतविजय, संतलीलामृत या ग्रंथांत हीं सर्व चारित्रें लिहिलीं आहेत. याखेरीज त्यांनीं आणखीहि लहान मोठे ग्रंथ लिहिले आहेत. तथापि संतचरित्रकार म्हणून ते विशेष प्रसिद्ध आहेत. त्यांची ग्रंथरचना ओवीवृत्तांत असून भाषाशैली सोपी व प्रेमळ आहे.

## श्रीपाद रामचंद्र पारसनीस ( १९०१ )

हे मुंबई विश्वविद्यालयाचे एम्. ए. असून डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद आहेत. सांगली येथील विलिंग्डन कॉलेजांत संस्कृत व मराठी या विषयांचे ते अध्यापक होते. सध्यां सोसायटीनें चालविलेल्या सातारा येथील न्यू इंग्लिश स्कूलचे सुपरिंटेंडंट आहेत. 'न्यूटनचें चरित्र,' 'ना. गोखले यांचें चारित्र' हीं पुस्तकें व वाङ्मयटीकात्मक कांहीं लेख यांनीं लिहिले आहेत.

## वासुदेव वामनशास्त्री खरे ( १८५८–१९२४ )

यांचा बहुतेक सर्व जन्म मिरजेस गेला. तेथील इंग्रजी शाळेंत ते संस्कृताचे शिक्षक होते. त्यांनीं कविता व सहासात नाटकें लिहिलीं आहेत तरी इतिहास-संशोधक म्हणून त्यांची प्रख्याति आहे. उत्तर पेशवाई म्हणजे पानिपतोत्तर काला-संबंधीं पटवर्धनी दप्तरांतील महत्त्वाचे कागद संशोधून प्रसिद्ध करण्यांत त्यांनीं आपल्या आयुष्याचीं अठ्ठावीस वर्षें खर्चीं घातलीं. याखेरीज 'नाना फडणाविसाचें चारित्र', 'अधिकार–योग,' 'इचलकरंजी संस्थानचा इतिहास' इत्यादि ऐतिहा-सिक पुस्तकेंहि यांनीं लिहिलीं आहेत. खरेशास्त्री यांच्या संशोधनकार्यासंबंधीं

श्री. न. चिं. केळकर यांनीं पुढील उद्गार काढले आहेत. "जुन्यापुराण्या पत्रांच्या भाराभर गळाठ्यांतून नेमकीं महत्त्वाचीं पत्रें निवडून काढणें व मग त्यांतला वेंचक भाग वाचकांपुढें व्यवस्थितपणें मांडणें ह्यामुळें त्यांचें ऐतिहासिक शोधनकार्य भरीव व सुव्यवस्थित झालें आहे. त्यांच्या लिहिण्यांत सुबकपणा, सुव्यवस्थितपणा व उपयुक्तता दिसून येते."

**राम गणेश गडकरी ( १८८५–१९१९ )**

हे आपली कविता 'गोविन्दाग्रज' या नांवानें आणि आपले विनोदी लेख 'बाळकराम' या नांवानें प्रसिद्ध करीत. कवि, विनोदी लेखक व नाटककार या तिन्ही नात्यांनीं गडकऱ्यांचें नांव मराठी वाङ्मयांत स्थिरपद पावलें आहे. यांची सर्व स्फुट कविता 'वाग्वैजयंती' या पुस्तकांत संकलित केली आहे. त्याखेरीज 'प्रेम संन्यास,' 'पुण्यप्रभाव,' 'भावबंधन,' 'एकच प्याला' इत्यादि नाटकें यांनीं लिहिलीं आहेत. यांच्या काव्यांत कल्पनेच्या भराऱ्या पुष्कळ असतात. भाषा सजविण्याकडे लक्ष फार. जुन्या शब्दांचा उद्धार जसा यांनीं केला तसेंच कांहीं नवीन शब्दप्रयोगहि त्यांनीं भाषेंत रूढ केले.

**माधवानुज ( १८७२–१९१७ )**

यांचें मूळ नांव काशिनाथ हरि मोडक. धंदा डॉक्टरीचा पण वाङ्मयाकडे स्वाभाविक कल असल्यामुळें इंग्रजी कवींच्या कृतीचा उत्तम परिचय त्यांना झाला होता. रवीन्द्रनाथ टागोर यांच्या गीतांजलीचें यांनीं केलेलें भाषांतर आतांपर्यंत झालेल्या सर्व प्रयत्नांत सरस आहे. काव्यरचना करतांना जुन्या वृत्तांप्रमाणेंच नवीन चालींचाहि त्यांनीं स्वीकार केला आहे. नित्याच्या जीवनांतील मनोवेधक प्रसंगांची निवड करून त्यांवर काव्य करण्याकडे माधवानुजांची प्रवृत्ति असे. करुणरस त्यांच्या काव्यांत प्रमुखत्वानें आढळतो.

**नारायण केशव बेहेरे ( १८९० )**

यांचें सर्व शिक्षण नागपूर येथें झालें व मध्यप्रांत व वऱ्हाड प्रांताच्या शिक्षणखात्यांत नोकरी झाली. यांची वाङ्मयसेवा विपुल आणि विविध आहे. गोष्टी, कादंबऱ्या, चरित्रें व ऐतिहासिक प्रबंध यांनीं लिहिले असून यांच्या कविता व स्फुट लेख शेंकडों आहेत. यांचें सर्वच लिखाण आवेशयुक्त असतें. केवळ कलाविलासाकरितां लिहिलेलें वाङ्मय निर्जीव अतएव त्याज्य; खरें वाङ्मय संदेशवाहक असलें पाहिजे अशी यांची वाङ्मयासंबंधीं कल्पना आहे.

## ग. र. दंडवते ( १८८६ )

हे गृहस्थ बडोदा येथील सेंट्रल लायब्ररीचे व्यवस्थापक आहेत. मराठी वाङ्मयाच्या निरनिराळ्या विभागांचा संकलित आढावा घेणारीं कांहीं पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. यांचीं 'कादंबरीची गोष्ट,' 'मराठी नाट्य वाङ्मय,' 'अर्वाचीन मराठी वाङ्मय' इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध आहेत.

## केशवसुत ( १८६६–१९०५ )

यांचें सबंध नांव कृष्णाजी केशव दामले. त्यांचें शिक्षण पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलमध्यें प्रवेशपरीक्षेपर्यंत झालें. त्यानंतर त्यांचें सर्व आयुष्य खानदेशांत शाळामास्तरची नोकरी करण्यांत गेलें. १९०५ सालीं हुबळी येथें प्लेगनें ते वारले. अर्वाचीन मराठी काव्याला नवीन जोमदार व स्वतंत्र वळण लावणाऱ्या कवींमध्यें केशवसुतांना अग्रस्थान द्यावें लागेल. १८८५ ते १९०५ पर्यंतच्या वीस वर्षांच्या काळांत त्यांनीं सुमारें १५० भावगीतें लिहिलीं. यांपैकीं थोडीं भाषांतरात्मक असून बाकी सर्व स्वतंत्र आहेत. त्यांच्या कवितेंत नादमाधुर्य कमी असलें तरी ओजस्विता व स्फूर्तिदायकता हे गुण भरपूर आहेत. नव्या कल्पना व जोरकस भाषा यांमुळें केशवसुतांच्या कवितेंत जिवंतपणा वाटतो; व त्यांतील भावनांची उत्कटता वाचकांच्या हृदयाला जाऊन भिडते.

## करमणूक

हें साप्ताहिक पत्र प्रसिद्ध कादंबरीकार हरि नारायण आपटे हे लिहीत असत. त्यांनीं आपल्या बऱ्याच कादंबऱ्या या पत्रांतूनच प्रथम प्रसिद्ध केल्या. करमणूक, ज्ञान व उपदेश यांचें योग्य संमिश्रण या पत्रांत असल्याकारणानें तें आबालवृद्धांस प्रिय असे. हें साप्ताहिक पत्र इ. स. १८९० पासून १९१७ पर्यंत प्रसिद्ध होत असे.

## म. वि. काथवटे ( १८५५ )

हे नगर जिल्ह्यांत सबजज्जाच्या नोकरीवर होते. सध्यां पेन्शन घेतलें असून वाईस असतात. 'प्राचीन हिंदुस्थानचा इतिहास' व 'पारशांचा इतिहास' हीं त्यांचीं मुख्य पुस्तकें असून त्याशिवाय कांहीं लहान पुस्तकें व लेख यांनीं लिहिले आहेत.

## तुकाराम ( १६०८–१६४९ )

प्राचीन संतकवींपैकीं साधुवर्य तुकाराम हे प्रमुख होत. पुण्यापासून १८ मैलांवर देहू नांवाचें गांव आहे तेथील हे रहिवासी; आणि तेथेंच वाण्याचा धंदा हे करीत. तुकाराम महाराज सदेह वैकुंठाला गेले अशी भाविक भक्तांची समजूत आहे. ज्ञानेश्वरानंतर महाराष्ट्रांत भक्तिप्रधान वारकरी संप्रदाय बराच फोंफावला. तुकाराम

महाराज स्वतः वारकरी पंथाचे असल्यामुळें अज्ञजनांत त्याचा प्रसार करण्याचें कार्य त्यांनीं केलें. त्यांनीं सुमारें ५००० अभंग रचिले आहेत. त्यांची अभंग-वाणी सहजस्फूर्त आहे. रचनेच्या ठाकठिकीकडे त्यांचें फारसें लक्ष नसे, पण अंत-रींचा उमाळा अभंगांत प्रतिबिंबित झाल्यामुळें त्यांच्या भाषेंत जिवंतपणा ओतप्रोत भरला आहे. व्यवहारांतील दाखले देऊन नीतिपर तत्त्वें अभंगांत गोंवण्याची कला तुकारामांना चांगली साधली होती. त्यांच्या अभंगांतील पुष्कळ चरण मराठींमध्यें म्हणीवजा होऊन बसले आहेत.

## हरि नारायण आपटे ( १८६४-१९१९ )

मराठींतील आद्य कादंबरीकार म्हणून हरिभाऊंचें नांव विश्रुत आहे. कॉलेज-मध्यें असल्यापासूनच त्यांच्या वाङ्मयसेवेला सुरुवात झाली आणि परीक्षेच्या अभ्यासापेक्षां इतर वाचनाकडे त्यांचा विशेष ओढा असल्यामुळें कॉलेजचें शिक्षण अर्धेंच राहिलें. हरिभाऊंनीं सामाजिक व ऐतिहासिक मिळून २०।२१ कादंबऱ्या लिहिल्या. त्याखेरीज स्वतःच काढलेल्या ' करमणूक ' नांवाच्या साप्ताहिकांत किती तरी ल्हान मोठ्या गोष्टी त्यांनीं लिहिल्या आहेत.

हरिभाऊंच्या कादंबऱ्यांनीं मराठी भाषेंत क्रांति घडवून आणली. निबंधमालेनें मराठी भाषेचें ओज जसें सर्वांच्या प्रत्ययास आणिलें तसेंच इंग्लिशमधील कादंब-ऱ्यांच्या तोडीच्या कादंबऱ्या मराठींत लिहिणें कसें शक्य आहे हें हरिभाऊंनीं दाखविलें. मराठी वाङ्मयाचा दर्जा वाढण्यास त्यांच्या कादंबऱ्या बऱ्याच अंशानें कारणीभूत झाल्या. टिळक-आगरकरांनीं वर्तमानपत्रांच्या द्वारां लोकजागृति केली. हरिभाऊंनी ललित वाङ्मयाच्या साहाय्यानें नवीन कालाला अनुरूप अशीं देशहि-ताचीं अनेक ध्येयें समाजापुढें मांडलीं, समाजांतील दुष्ट चालीरीती वेशीवर टांगल्या व समाजाला सर्वांगीण उन्नतीचा मार्ग दाखविला. मराठी भाषेचें साधें, शुद्ध परंतु रमणीय स्वरूप हरिभाऊंच्या वाङ्मयकृतींत पाहावयास सांपडेल. पुष्कळ नवीन शब्दांची भर त्यांनीं घातली, तसेंच खासगी बोलींतील कित्येक शब्दांना वाङ्मयाच्या क्षेत्रांत पावन करून घेतलें.

## सदाशिव काशिनाथ छत्रे ( १७९८-१८३० )

यांचा जन्म मुंबईस झाला. इंग्रजी अंमल सुरु झाल्यानंतर लगेच जे लेखक झाले त्यांत छत्रे हे प्रमुख आहेत. ' बाळमित्र ' व ' इसापनीति ' हीं भाषांतरात्मक पुस्तकें यांनीं लिहिलीं. सोप्या व रसाळ मराठी भाषेचा नमुना या पुस्तकांत पहाव-

यास सांपडतो. हीं पुस्तकें स्वतंत्र नसून भाषांतरें आहेत असें समजूनहि येत नसे. मुंबईस इंग्रजी शाळा स्थापण्याच्या कामीं यांनीं बराच पुढाकार घेतला होता.

## दत्त ( १८७५–१८९९ )

दत्तात्रय कोंडो घाटे हें यांचें सबंध नांव. यांचें शिक्षण अहमदनगरास झालें. नोकरीनिमित्त ते बडोद्यास गेले व तेथेंच प्लेगला बळी पडले. त्यांनीं निसर्गवर्णनपर व देशभक्तिपर काव्यें लिहिलीं असलीं तरी त्यांचें वैशिष्ट्य शिशुगीतांत आहे. त्यांची कविता सुबोध व करुण आहे. भाषा नादमधुर आहे. ते आणखी कांहीं वर्षे जगले असते तर या उत्कृष्ट गुणांचा परिपाक झालेला दृष्टीस पडला असता.

## नरसिंह चिंतामण केळकर ( १८७२ )

एल्एल्. बी. झाल्यानंतर साताऱ्याला वकिलीला सुरुवात केली होती, परंतु लिहिण्याची हौस त्यामुळें 'केसरी' व 'मराठा' या वर्तमानपत्रांकडे टिळकांनीं मुद्दाम बोलावून घेतलें. टिळकांच्या हयातींत आणि नंतर हीं पत्रें त्यांनीं उत्कृष्टपणें चालविलीं. वर्तमानपत्री लेखनाचा दर्जा केळकरांनीं आपल्या व्यासंगानें वाढविला. मराठी गद्याचें ऐश्वर्य वाढविण्यास त्यांचें विपुल लेखन सर्वस्वीं कारणीभूत झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. केसरी व मराठा या पत्रांतून वेळोवेळीं नानाविध विषयांवर त्यांनीं लेख लिहिले आहेत. त्याखेरीज 'मराठे व इंग्रज,' 'राज्यशास्त्र,' 'टिळकांचें विस्तृत चरित्र,' 'आयर्लंडचा इतिहास,' 'ग्यारिबाल्डीचें चरित्र' इत्यादि पुस्तकें व 'तोतयाचें बंड' वगैरे सात आठ नाटकें त्यांनीं लिहिलीं आहेत. त्यांच्याइतकें विपुल व विविध लेखन फारच थोड्या लेखकांचें असेल.

## वामनपंडित

यांच्या जन्मकाळाविषयीं निश्चित माहिती नाहीं. तथापि तुकाराम–रामदासांचे हे समकालीन होते यांत शंका नाहीं. वामनपंडित या नांवाचे एकापेक्षां अधिक कवि होऊन गेले असें कांहीं टीकाकारांचें मत आहे. यथार्थदीपिका नांवाची गीतेवर विस्तृत टीका यांनीं लिहिली आहे. रामचरित्र व कृष्णचरित्र यांतील कित्येक प्रसंगांवर लहान लहान रसपूर्ण आख्यानें यांनीं रचिलीं आहेत. भाषाशुद्धीकडे वामनपंडितांचें फारसें लक्ष असल्याचें दिसत नाहीं. संस्कृत शब्दांचा बराच भरणा यांच्या काव्यांत सांपडतो. पण शब्दालंकार व प्रासयुक्त भाषा यांमुळें वामनी श्लोक कानाला गोड लागतो. संस्कृतामधील वृत्तें मराठींत आणण्याचें श्रेय वामनपंडितांकडे आहे.

## विश्वनाथ आबाजी मोडक (१८९१)

प्रो. धों. के. कर्वे यांच्या हिंगणे येथील अध्यापिका पाठशालेंतील एक शिक्षक. हे बी. ए., बी. टी. असून यांनीं भूगोल या विषयाचा विशेष अभ्यास केला आहे. 'भूगोलावरील साहसी प्रवासी,' 'भूगोलावरील विचित्र प्राणी' अशीं भूगोलविषयक पुस्तकें त्यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत.

## गोपाळ रामचंद्र परांजपे (१८९१)

हे मुंबई विश्वविद्यालयाचे एम्. एस्‌सी. असून सध्यां मुंबई येथील रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स, या संस्थेमध्यें पदार्थविज्ञानशास्त्राचे प्रोफेसर आहेत. कांहीं मित्राच्या साहाय्यानें केवळ शास्त्रीय विषयास वाहिलेलें 'सृष्टिज्ञान' नांवाचें मासिक हे चालवीत असतात. शास्त्रीय विषय सामान्य वाचकांना सहज कळतील अशा सुबोध रीतीनें मांडण्यांत यांचें कौशल्य विशेष दिसून येतें.

## रमाबाई रानडे

प्रसिद्ध न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांच्या या पत्नी. यांनीं 'आमच्या आयुष्यांतील आठवणी' म्हणून आत्मचरित्रपर एक पुस्तक लिहिलें आहे. न्या. रानडे यांच्या खासगी जीवनासंबंधीं पुष्कळच माहिती या पुस्तकावरून कळते. दररोज घडणारे साधेसुधे प्रसंग घरगुती भाषेंत वर्णन केल्यामुळें पुस्तक हृदयंगम झालें आहे. स्त्रियांच्या उन्नतीकरितां सेवासदन सोसायटी, पुणें, ही संस्था रमाबाईनीं स्थापन करून नांवारूपास आणली.

## विनायक (१८७२-१९०९)

यांचे सबंध नांव विनायक जनार्दन करंदीकर. जन्म व शिक्षण धुळें येथें झालें. केशवसुत व टिळक यांचेबरोबर विनायकांनीं अर्वाचीन मराठी कवितेला नवीन वळण लाविलें. विनायकांना आधुनिक, राष्ट्रीय व ऐतिहासिक कवितेचे जनक म्हणण्यांत येतें तें अगदीं सार्थ आहे. देशाची दुरवस्था पाहून त्यांचें हृदय पिळवटून निघत असे; ऐतिहासिक कालांत ज्या शूर स्त्रियांनीं अतुल पराक्रम किंवा स्वार्थत्याग दाखविला अशा स्त्रियांचीं चारित्रें त्यांनीं आदरपूर्वक गायिलीं आहेत. सोपी परंतु उत्कट भावनांनीं ओथंबलेली कविता लिहिण्याचें त्यांचें कौशल्य इतरांना क्वचि-त्च साधलें आहे.

**नीळकंठ शंकर नवरे ( १८९६ )**

हे बी. ए., बी. टी. असून सध्यां सोलापूर येथील सरकारी हायस्कूलमध्यें शिक्षक आहेत. संस्कृतमधील नाटकें, बाणाची कादंबरी व रघुवंशकथा यांचा परिचय मराठी वाचकांना करून देणारीं गोष्टीरूप पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. यांची भाषा सरळ व सुबोध असून मूळांतील रसाची हानि न करतां रूपांतर करण्याची हातोटी वाखाणण्यासारखी आहे.

---

# अर्थबोधक टीपा

---

**महाराष्ट्रगीत**

गगन—आकाश. गिरि—पर्वत. तुरंग—घोडा. अणु—थोडेसुद्धां. जलाशय—सरोवर. प्रासाद—राजवाडा. पौरुष—पराक्रम. नृमणिखनि—नररत्नांची खाण. खड्ग—तलवार.

चतुरंग चमू—पायदळ, अश्वदळ, हत्ती व रथ ह्या चार अंगांनीं युक्त असलेली सेना.

यन्नामा—ज्याच्या नांवाला. जवें—वेगानें. शमितबल—सामर्थ्य नष्ट झालेला. शतगुणित—शंभरपट. विक्रम—पराक्रम. विस्मयावहा—विस्मय उत्पन्न करणारी. गिरा—भाषा. स्पृहा—इच्छा. धृति—धैर्य. दीप्ति—तेज. मर्म—रहस्य.

**मनाचे श्लोक**

सज्जना—हें मनाचें विशेषण आहे. भक्तिपंथ—भक्तिमार्ग. स्वभावें—सहज.

नीववावें—संतोषवावें. तनू—शरीर, देह. त्यागितां—टाकल्यावर.

पूर्वसंचीत—पूर्व जन्मीं केलेलीं बरीं वाईट कर्में. मतिमंद—निर्बुद्ध.

वियोगें— ( सुख देणाऱ्या गोष्टींच्या ) वियोगामुळें. दिन—दीन, गरीब, दुबळे.

मिथ्या—निरर्थक, विनाकारण. विवेक—विचारानें. अभ्यंतरीं—अंतःकरणांत.

काय वेचें—काय जातें, काय खर्च होतें. वाचाळता—वायफळ बोलणें.

## अनाथ बालिकाश्रमांतील आरंभीची खोली

प्रो. धों. के. कर्व्यांनीं अनाथ बालिकाश्रम हिंगणें येथें नेला तेव्हां प्रथम एक लहानशी खोली त्यांनीं बांधिली. त्यानंतर त्याच ठिकाणीं मोठया इमारती उभ्या राहिल्या. पण ही जुनी खोली होती तशीच डागडुजी करून ठेविली आहे. ती पाहून निरनिराळे विचार मनांत येतात. त्यांतले कांहीं कवीनें या कवितेंत मांडिले आहेत.

कौतुकतें–कौतुक वाटतें. ( कौतुक या नामापासून कवीनें क्रियापद बनविलें आहे. अशीं क्रियापदें संस्कृतांत बनतात. मराठींत बनवीत नाहींत पण हरि नारायण आपटे यांनीं हा वाक्प्रचार सुरू केला ). तरंगिणी–नदी.

उगमरम्यता–नदीच्या उगमाजवळील शोभा. कार्यभव्यता–कार्याचा व्याप.

वीची–लाटा. आतुरते–( आतुर या शब्दापासून क्रियापद ) उत्सुकता वाटतें.

## विदुलासंजयसंवाद

युद्ध सोडून संजय परत आलेला पाहून त्याच्या मातेनें रागें भरून परत पाठविला त्यावेळीं झालेला विदुला व संजय यांचा संवाद पुढील आर्यांत वर्णन केला आहे.

१ भगवान्–श्रीकृष्ण. गोघृत–गाईचें तूप. आतेला–कुंतीला.

२ यदूद्वह–यदुकुलांतील श्रेष्ठ ( श्रीकृष्ण ). सुतमार्दव–मुलाचा ( धर्मराजाचा ) मऊपणा.

३ मत्तनय–माझा मुलगा. कमळनयना–हे कमळनयना कृष्णा. नाकीं–स्वर्गलोकीं. सुरगीत–देवांनीं गायिलेला. अमळनय–निष्कलंक वागणूक ( नय ).

४ सुभट–योद्धा. विप्रसेवनीं–ब्राह्मणांच्या सेवेंत ( तपश्चर्येंत ). वर्षोष्णसह–पाऊस व उष्णता सहन करणारा. जटिलवर–जटाधारी मुनिवर्ग.

५ सिंधुराजविजितस्वसुतातें–सिंधुदेशच्या राजानें जिंकलेल्या मुलाला. यदुकुळकमळाकराचिया विधुला–यादवांचें कुळ हाच कमळांचा समुदाय त्याला प्रफुल्लित करणाऱ्या चंद्राला ( कृष्णाला ).

६ क्लीबा–नपुंसका. अयशस्कर–दुष्कीर्ति आणणारा.

७ वृत्यर्थ–उपजीविकेकरितां. ८ यशोर्थ–यशाकरितां. लोष्ठसा–दगडासारखा.

९ परमानुचित–( परम+अनुचित ) आतिशय अयोग्य. १० विहित–योग्य.

भीती–भितात. ११ बाहुजं–क्षत्रिय. मत–मान्य. १२ काळा–हे मृत्यो !
१४ परासु–मृत, मेलेला. परासुता–मृत्यु. समर–युद्ध.
शतपुत्रा–शंभर मुलगे असणारी. परा–दुसरी.
१५ उभयलोकानुपयुक्त–इहलोकीं आणि परलोकीं उपयोगी न पडणारें (अपत्य).
१६ समरशील–युद्धाची हौस असणारा. सांगन–(अंगनेसह) बायकोसह.
सदास–नोकरासह. १७ निशाकर–चंद्र. नीवतो–शांत होतो.
१८ सिंधुर–हत्ती. विदुलोक्त–विदुलेनें सांगितलेलें. जाला–जगला.
१९ त्वत्सूतकीं–तुझ्या जन्माच्या वेळीं. स्वसख्यासि–अर्जुनासी. पद–राज्यपद.
वाणी–वाण, कमीपणा.
२० पुरांतक–शंकर. वीरसू–वीरपुत्रांना जन्म देणारी माता. श्रीस्त्रीकीर्त्यपहारकाम–लक्ष्मी, स्त्री (द्रौपदी), कीर्ति यांचा अपहार करण्याची इच्छा करणारे (कौरव). २३ तळमळ–तळांतील गाळ. तडाग–सरोवर. २५ तोक–लहान मूल. धाम–घर. २६ मूर्तमह–मूर्तिमंत उत्साह. २७ सर्वसहा–पृथ्वी.
२८ क्षम–समर्थ. २९ व्यसनगर्तलीन–संकटाच्या खांचेंत बुडालेले.

## रानांत एकटेंच पडलेलें फूल

आमोद–सुगंध. योग्यता असलेला पुरुष बाजूस पडला तरी कीर्ति दिगंत पसरते व तो जेथें राहतो तेंच स्थान पवित्र क्षेत्र बनतें.

## सह्याद्रि

तारापथ–ताऱ्यांचा मार्ग, आकाश. विंध्याद्रि-व्रत–विंध्य पर्वत आकाशांत उंच वाढला आणि सूर्याचा मार्ग त्यानें अडवला अशी पुराणांत कथा आहे. त्याचें अनुकरण सह्याद्रि पर्वत करीत आहे अशी कल्पना कवीनें केली आहे.

भार्गवराम–परशुराम. मार्गण–बाण. जो–जो समुद्र. मुली–नद्या. तटिनी–नदी. अचल–पर्वत. घोष–आवाज.

अच्छोदक–निर्मळ पाणी. शारदेंदुकिरणा–शरद् ऋतंतील चन्द्राचीं किरणें. महीरुह–पर्वत. निःसार–पाणी नसलेलें. रुचिरता–सौंदर्य. हिमालयसुता–गंगा. (नाशिकजवळील सप्तशृंगीच्या डोंगरावर गंगा येते अशी प्रसिद्धि आहे.)

स्फटिकभा–स्फटिकाची शोभा. शारदेंदु–शरदतूंतील चंद्र. बौद्धादिकांच्या कृती–बुद्धाच्या अनुयायांनीं कोरलेलीं लेणीं व विहार. संगरीं–रणांत, युद्धांत.

शिवा– कोल्ही. प्रतापतरणी– पराक्रमरूपी सूर्य. जावळीचा कवि– रामदास. धृति–धैर्य. असुख– दुःख.

## एकनाथ चरित्र

वैष्णव–विष्णुभक्त. अपार–पुष्कळ. व्रतबंध–मुंज. विस्मित–आश्चर्ययुक्त. संबोखून–हांक मारून. मधुरोत्तर–गोड भाषण. प्रपंच ममता–संसाराचा लोभ.

साचार–हा शब्द जुन्या कवितेंत शब्दभरतीसाठीं वापरतात. त्याचा अर्थ खरोखर ' ' तत्काल ' असा असतो. आवडी–आवडीनें.

निजप्रेमें–माझें आपल्यावर प्रेम असल्यामुळें. अनुपम्य–अप्रतिम.

निजभावेंसी–अंतःकरणपूर्वक. लवलाहें–चटकन्, तत्काल.

द्वैपायन–व्यास. ( व्यासांनीं महाभारत रचिलें, तथापि त्यांना समाधान प्राप्त झालें नाहीं तेव्हां नारदमुनींनीं त्यांना सल्ला दिला कीं, आपण भागवत रचावें म्हणजे परमेश्वरस्तुतीनें मनाला शांति मिळेल. )

भावार्थ–हेतु, ध्येय. विनत–नम्रभावानें. उच्छिष्टें–उष्टें.

स्वरूपीं–परमेश्वर स्वरूपाकडे. भरण–( तेलाची ) भर. आडका–पैसा. हरुष–हर्ष. सन्निध–जवळ. सन्मुख–समोर. कोडें–आवडीनें.

कडोविकडी–निराळ्या तऱ्हेनें. रोकडी–रोकठोक, ( ताबडतोब ).

चोखडी–हटकून. हेत–हेतु. अनसूयासुत–दत्तात्रय. श्रुति–वेद.

मथित–सार ( मंथन करून काढलेलें ). प्राकृत–मराठीमध्यें.

पदपदांतरें–निरनिराळीं काव्यें. प्रतिष्ठान–पैठण.

निमिष–क्षण ( पापणी लवण्याला लागणारा वेळ ). अनुचित– अयोग्य.

## गाई घरा आल्या

कृष्णाला घरीं येण्यास उशीर झाला त्यामुळें यशोदेला काळजी वाटूं लागली. तिच्या मनःस्थितीचें चित्र कवीनें येथें रेखाटलें आहे.

सांद–हांक. कातरवेळ–संध्याकाळ; किर्र असा आवाज ऐकूं येण्याची वेळ.

पाल चूक चूक करी–पाल चुकचुकली म्हणजे संकटाची सूचना अशी जुनी समजूत.

## कुबडीतीर्थ

कुबडी—रामदासी पंथाच्या लोकांजवळ ही कुबडी असते. तिच्या साह्यानें रामदासांनीं एकदां पाणी निर्माण केलें ती कथा येथें सांगितली आहे.

विपिन—वन. तेजोनिधि—तेजाचा सांठा. वेला—वेळ. दिनमणी—सूर्य.
उदेला—उगवला. तोख—संतोष. स्वन—आवाज. गहन—खोल.
उपल—दगड. कंटक—कांटा. प्रतीति—अनुभव. हर्षोदधि—आनंदसागर.
अंशुमाली—सूर्य. किंकर—सेवक. निर्झर—झरा. वदनपंकज—मुखकमल.
पाणी—हात. धाला—समाधान पावला. विमल—पवित्र.

## घड्याळ

घड्याळाची टिक्‌टिक् आपणाला सारखी ऐकूं येते. त्यावर कवीनें अशी कल्पना केली आहे कीं, घड्याळ त्या आवाजाच्या द्वारां आपणाला उपदेश करीत आहे.

अविरत—न थांबतां, संतत.

## रामाच्या बाललीला

रूपचतुष्टय—दशरथ राजाचे राम, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न असे चार पुत्र होते. हे चारही विष्णूचेच अंश अशी पौराणिक कल्पना आहे.

लीलामनुष्याकृति—लीलेसाठीं मनुष्याचा अवतार घेतला आहे ज्यानें.

वक्त्र—तोंड. मंदाकिनी—स्वर्गातील गंगा नदी. नीरज—कमल.
स्मित—हंसणें. आलय—घर. नाक—स्वर्ग. धात्री—दाई. उक्त—सांगितलेलें.
सभाजन—सभेंतील लोक. सभाजन—कौतुक. मर्त्यकृतावतारक—मनुष्यावतारी (राम).
तत्प्रतिबिंब—भूमीवर पडलेलें रामचंद्राचें प्रतिबिंब. पक्ष्म—डोळ्याच्या पापण्या.
तारक—डोळ्यांतील बुब्बुळ. चतुर्वर्ग—धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष यांचा वर्ग.
तुला—तुलना. दिवस्पती—स्वर्गाचा राजा, इन्द्र.

भूभार—( पाप वाढल्यामुळें ) पृथ्वीला झालेला भार. पण—प्रतिज्ञा.
महादरें—मोठ्या आदरानें. चंद्रप्रभा—चांदणें. पांडुर—पांढरें.
रत्नविराजिकंकणें—रत्नखचित बिंदली घातलेल्या ( हातानें ).

## स्फुट अभंग

वर्म—अंतरंग, मुद्द्याची गोष्ट. गति—सद्गति. अनर्गळ—प्रतिबंध नसलेला
निर्मल—निष्कपट. आत्मानुभव—परमात्मसुख.

आपणासी डोळे दृश्य नाहीं—स्वतःला डोळ्यांनीं दिसत नाहीं.

काया कुरवंडी तयां—त्यांच्यावरून देह ओवाळून टाकीन.

पात्र—योग्यता. उपतिष्ठेकारण—जेथें उपयोग होण्यासारखा असेल तेथें. निकें—योग्यप्रकारें. क्षीर—खीर. मुक्ताफल—मोती. खर—गाढव. सूकर—डुकर. चोजविली—चोपडली. महिमान—महत्त्व. कोड—आवड.

## उत्तरगोग्रहण

१ मत्स्यपुर—विराटाची राजधानी. सुयोध—योद्धे.

२ व्रज—गौळवाडा. षष्टिसहस्र—साठ हजार. कुरुकुळचंदनद्रुभुजग—कौरवकुलरूपी चंदनाच्या झाडावर असलेला साप ( दुर्योधन ).

३ गोपाध्यक्ष—मुख्य गवळी. कुर्वधमा—( कुरु + अधमा ) कुरुकुळांतील नीच पुरुषा ! ४ उत्तराख्य—उत्तर नांवाच्या. अनय—अन्याय.

५ सवतें—वेगळें, स्वतंत्र. ६ खिजावें—चिडावें (अर्जुन सारथि झाला म्हणून).

७ कृष्णा—द्रौपदी. मारुत—वारा. पलाल—पांचोळा. खळबळ—दुष्टाचें ( शत्रूचें ) सैन्य. ८ सूत—सारथि. विजय—अर्जुन.

९ भगिनी—उत्तरा. अतिसहवासिवच—विशेष परिचय असलेल्या व्यक्तीचें भाषण. कतक—निवळीचें बीं. कलुषित—गढूळ. वन—पाणी.

१० कटक—सैन्य. १२ कदर्यु—कृपण. १३ विटवील—दुखवील. आली—मैत्रीण.

१४ सहोत्तरा आली—उत्तरेसह मैत्रिणी. १५ हेर—पहा. १६ स्वपरबळाबळ—आपलें आणि दुसऱ्याचें बळ. बालिश—पोरकट. १७ कल्पांतसिंधु—सृष्टिनाशाच्या वेळीं होणाऱ्या सागराप्रमाणें. १८ पट—वस्त्र. १९ रणक्षिति—रणभूमि. २० सदसी—( सत्+असि ) चांगली तरवार.

२१ पितृकरतळस्थ—बापाच्या तळहातावरील. २२ कांपाला—भीतीनें कांपण्यास. पाला—झाडाचा पाला. २३ दहन—अग्नि. समीरण—वारा.

२४ वैराट—विराटाचा मुलगा ( उत्तर ). अनृत—खोटें. आण—शपथ

२५ वृष्णिमूर्तमहदेव—यादवांचा मूर्तिमंत उत्साहच असा देव कृष्ण.

२६ धृतरश्मि—लगाम हातांत धरलेला. दारुक—कृष्णाचा सारथि. मातलि—इन्द्राचा सारथि. मातलीला—जी माजली आहे तिला

२७ देवदत्त दर–देवदत्त नांवाचा (अर्जुनाचा) शंख. दत्तदर–भयदायक, भयंकर. २८ कौशकेतु–कपिध्वज. २९ भट–योद्धे.

३० गुरुनंदन–द्रोणाचार्यांचा मुलगा अश्वत्थामा. पितामह–आजोबा भीष्म.

३१ शकुनिचा भाचा–दुर्योधन. संग्राम–युद्ध.

३२ प्राणत्राणपरायण–प्राणसंरक्षणाची काळजी लागलेला. त्रपा–लज्जा. अग्रणी–पुढारी. निरपत्रपाग्रणी–निर्लज्जांचा पुढारी.

३३ तुरग–घोडा. अरुण–सूर्याचा सारथि. ३४ अनुज–धाकटा भाऊ. भीमसे नाचा–भीषण नृत्य करा. ३५ पश्यतोहर–दरवडेखोर. वश्य तो हर हो–शंकर (हर) तुमच्या बाजूला (वश्य) असला तरी.

३६ बाहुशब्द करून–दंड ठोकून. मद्धनुःसदब्द–माझें धनुष्यरूपी मेघ (अब्द)

३९ नर–अर्जुन. कुंजर–हत्ती (दुर्योधन). तप्तलोहशंकुशतें–तापलेल्या लोखंडाच्या शेंकडों खिळ्यांनीं. ४० पर–शत्रू. तक्षक–साप.

४१ नदीज–गांगेय भीष्म. वामपार्श्वी–डाव्या बाजूला. ४० बाणासुर-सहाय–बाणासुराला मदत करणारा (शंकर). द्रुत–लौकर. यो–येवो.

४५ हरिजन–कृष्णाचे भक्त. विरवी–नाहींसे करतो

## विश्वामित्रीच्या कांठीं

धालें–तृप्त झालें. रजत–रुपें. चंद्रमणि–चंद्र उगवला असतां तेज पाझरणारा मणि. निराकारिणी–आकार नसलेली, अशरीरिणी. सूक्ष्म–पातळ, तलम. तटिनी–नदी. वल्कल–झाडाच्या सालीचें वस्त्र. जातिपुष्प–जाईचें फूल. मेखला–कमरपट्टा. दर्शनदुर्लभ–सहसा न दिसणारी.
तटवनभूमी–नदीच्या दोन्ही बाजूची जागा.

## सुभाषितें

श्रुत–विद्या. श्रोत्र–कान. कुंडल–कानांतील अलंकार. पाणि–हात.
आनें–अन्य, दुसरें. कलत्र–बायको. सखा–मित्र. पोत–पेटलेली मशाल.
पूर्वसुकृत–पूर्वजन्मीं केलेलें पुण्य. वानोत–स्तुति करोत.
पंकेरुह–कमल. सुनीतिमंत–नीतिनिपुण. शैल–पर्वत.

धाकेना–भीत नाहींत. श्वान–कुत्रें. हस्तिप–माहात. जठर–पोट.

शशिमुखी–चन्द्रानना, सुन्दर स्त्रिया. तप्तहेमप्रभा–तापलेल्या सोन्याप्रमाणें शोभायमान असणाऱ्या ( स्त्रिया ). शुभकथा–चांगल्या ( पराक्रमाच्या गोष्टी ). स्मरणास योग्य रचिलें–स्मृतिशेष केलें. ते–ती.

## बाळ व आरसा

दुजें–दुसरें. मुष्टी–मुठी. भालीं–कपाळीं. रुद्ध–भरून आला.

' जैशी वृत्ती तुझी जगाशीं तशी जगाची तुजशीं ' हें या कवितेचें तात्पर्य.

## शिवराजदर्शन

लाहूं–मिळवूं. स्वरूपा पाहूं–स्वतःला ओळखूं. खान–खाणें. भान–विचारशक्ति. परता–परावलंबिता. चिंताभृंग–भुंग्याप्रमाणें ( मनाला ) पोखरणारी चिंता. बाऊ–भीति. व्यसनसागर–संकटाचा समुद्र. तरी–होडी.

पैलतडीला–पलीकडील तीराला. धाऊं–ध्याऊं. पुराणा–जुना. बाहूं–बोलवूं.

## केवढें क्रौर्य हें

रुधिर–रक्त. कोटर–घरटें. कवळ–घांस. नय–न्याय. द्विजा–पक्षीण. उत्पल–कमल. शेवटला श्लोक निराळ्या वृत्तांत रचिला आहे. कां ?

---